गौरव-ग्रंथमाला, पुष्प १३१ वें

# चोरबाजारांतील चिजा

( तीस तऱ्हेवाईक गोष्टी )



नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण

लेखक

शामराव नीलकण्ठ ओक

१॥ रु. ] किंमत [ कागदी १। रु.

## अपरिहार्य—

'ललितवाङ्मय', 'विदग्ध–साहित्य', 'लघुकथातन्त्र', अशा कोणत्याही महत्त्वाकांक्षी कलाविशिष्ट पदवीसाठीं या गोष्टींची उमेदवारी नाहीं, ही ग्वाही पाहून मला उत्तेजन देण्यास टपलेल्या बऱ्याच ज्येष्ठ साहित्यिकांना फसल्यासारखें वाटेल —अशी मला आशा आहे. 'मनोविश्लेषण', 'भूमिकाविकास', 'शैली'–फार काय, भाषेसारख्या भानगडींतसुद्धां मुद्दाम न पडण्याची सावधगिरी मीं अगाऊच घेतलेली आहे. 'सहेतुक वाङ्मया'च्या शास्त्रशुद्ध तपशिलानुसार लिहिलेलें कांहीं पुढील पानांत आढळणार नाहीं—ग्रामीण जीवनावर प्रकाश पाडणें माझ्या गांवींही नाहीं, समतेची जागृति करणें स्वप्नांतसुद्धां नाहीं, किंवा श्रमजीवी वर्गाचीं दुःखें वेशीवर टांगण्याचे परिश्रम मीं जाणूनबुजून घेतलेले नाहींत. वाचकांची करमणूक करणें इतपतच या कथांचा माफक रोख आहे. कोमल कलाविलास किंवा जाज्वल्य जीवनकलह या दोनही तत्त्वांविषयीं लेखकाचा अंगचोरपणा, गोष्टींची (व संग्रहाच्या नांवाची) निवड करण्यापासूनच झाला, असे त्या त्या पंथाच्या अनुयायांना वाटण्याचा संभव आहे. पण चार-चौघांच्या मनोरंजनासाठीं त्यांच्यामधल्याच एकानें सांगितलेल्या या गोष्टी, हें लक्षांत घेतल्यावर, 'जीवन' व 'कला' या निशाणांखालीं समोरासमोर सज्ज असलेल्या पलटणींमधून, जीव मुठींत धरून निसटून जायला मला वाट मिळेल अशी आशा आहे.

या संग्रहांतील पहिल्या तीन गोष्टी नवीन आहेत; या तीन, चौथी 'टॅक्सीवाला' ही गोष्ट (जी मरहूम 'प्रवासी' साप्ताहिकांत आली होती) व शेवटच्या बावीस गोष्टी (ज्या 'प्रतिभा' पाक्षिकांत क्रमशः प्रसिद्ध होऊन गेल्या) या सर्व विदेशीय कथांचीं रूपांतरें आहेत. पांच, सहा, सात, व आठ या गोष्टी 'मौलिक' (!) असून त्या अनुक्रमें 'चित्रा' साप्ताहिकांत (५,६,७) व 'यशवंत' मासिकांत येऊन गेल्या आहेत.

आतां पुढें वाचकांनीं आपापल्या जोखमीवर वाचावें.

शामराव ओक

# अनुक्रमणिका




| | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | पैसेवाली बायको | १ |
| २ | तीर—कमान | ६ |
| ३ | राजमान्य | ११ |
| ४ | टॅक्सीवाला | १६ |
| ५ | विषाची परीक्षा | २४ |
| ६ | स्वार्थ आणि त्याग | ३६ |
| ७ | विश्रामबागेंतली विहीर | ४३ |
| ८ | इंटरचा डबा | ५० |
| ९ | पूजेंतला रुपया | ५७ |
| १० | किंचित् घोटाळा | ६९ |
| ११ | हृदयाचे पाश व कायद्याचे पाश | ७४ |
| १२ | झोंपी गेलेला जागा झाला | ७८ |
| १३ | तरुणी शिक्षण नाटिका | ८४ |
| १४ | नाटकी भाषा | ९१ |
| १५ | शीर शिकारी | ९४ |
| १६ | विद्वत्ता आणि प्रेम | १०३ |
| १७ | जोगेश्वरीचा जोगी | १०९ |
| १८ | सुखभूमि | ११८ |
| १९ | उलटलेली चाळिशी | १२५ |
| २० | भाऊचा धक्का | १२९ |
| २१ | किन्नराश्रमांतील पाहुणे | १३६ |
| २२ | चिक्कीवाल्याची प्रणयकथा | १४१ |

| | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|
| २३ | एक हजार रुपये | १५० |
| २४ | कल्पनेबाहेर यश | १५६ |
| २५ | शास्त्रीय दृष्टि | १६२ |
| २६ | कौमुदी | १६५ |
| २७ | संगमावरचा पुजारी | १६९ |
| २८ | तो भुक्कड भीमराव | १७३ |
| २९ | अवतार | १७७ |
| ३० | पिंजऱ्यांतले काळे पोपट | १८० |

चोरबाजारांतील चिजांवर

गु ज रा ण क र णा ऱ्या

माझ्या गरीब बिचाऱ्या

सिनेमाच्या धंद्यास ...

( कथानक -- हक्क नव्हेत --

पण या कथांची नीति, )

सादर

— समर्पण —

# १. पैसेवाली बायको

डेक्कन क्वीन जवळ जवळ रिकामीच होती. गाडीनें पुणें सोडल्यावर बॅरिस्टर अकमार आपल्या अटॅशे-केसमधून 'टेस्ट केसेस्'चें एक पुस्तक काढून वाचीत बसले. त्यांच्यासमोर बसलेला गृहस्थ त्यांच्याकडे सारखा पहात होता; हें लक्षांत आल्यावर बॅरिस्टरसाहेबांनीं पुस्तक जरा वर धरलें. लोणावळ्याला ते रेस्तरां कारमध्यें चहा घ्यायला गेले. त्यांच्यासमोरचा मनुष्य येथेंही त्यांच्यासमोर येऊन बसला. बॅ. अकमार कपाळाला आंठ्या घालणार इतक्यांत तो मनुष्य नम्रपणें म्हणाला, 'माफ करा, पण बॅरिस्टर अकमार आपणच ना?'

बॅरिस्टरांनीं मान वांकवून कबुली दिली.

'मी मुंबईस आपल्याकडेच निघालों होतों. माझ्या घटस्फोटाचा कज्जा आपण चालवावा अशी माझी विनंति आहे. माझें नांव दयाळ जोसेफ उन्हाळे. हे पन्नास रुपये माझी केस ऐकून घेण्यासाठीं आपण स्वीकारावे–'

बॅरिस्टरनीं त्या नोटा घेऊन आंतल्या खिशांत ठेवल्या.

'सांगा,' म्हणून ते कपांत दूध, साखर व चहाचें पाणी ओतून घेऊं लागले.

उन्हाळे यानेंही आपला चहा बनवला व त्याचा एक घोंट घेऊन त्यानें आपला कज्जा बॅरिस्टरपुढें मांडण्यास सुरुवात केली.

मी पुण्यांतच लष्करांत वकिली करतों, दहा बारा वर्षें झालीं. सुरुवातीचीं दोन-चार वर्षें बरींच कष्टांत काढलीं. त्यावेळीं नोकरीचा विचार मनांत येऊन मी वर्त-

## चोरबाजारांतील चिजा

मानपत्रांतल्या जाहिराती पाहात असें. एके दिवशीं सहज एका जाहिरातीकडे माझें लक्ष गेलें. 'पांच हजार रुपयांची माया जवळ असलेली एक सुंदर अँग्लो-इंडियन तरुणी सभ्य व सुसंस्कृत गृहस्थाशीं लग्न करायला तयार आहे' असा त्या जाहिरातीचा सारांश होता. दिवसभर माझ्या डोक्यांत ती जाहिरात घोळत होती; संध्याकाळीं एका मित्राकडे जेवायला गेलों होतों तेथेंही हा विषय काढला. तेथें आलेले दुसरे एकदोन मित्र हंसले, पण एकजण म्हणाला,

'कांहीं नेम नाहीं, पुष्कळदां लॉटरी लागते—' नंतर त्यानें अशीं जाहिराती-वर लागलेलीं कांहीं लग्नें कितीं सुखकर झालीं याचीं उदाहरणें सांगितलीं.

जेवून परत आल्यावरही तोच विचार माझ्या डोक्यांत घोळत होता. पांच हजार रुपये—सुंदर बायको.......त्या रात्रीं थंडी बरीच होती. माझ्या जागेत मी एकटाच राहात होतों, त्या घराचा उजाडपणा, गारठा, मला फार जाणवला. 'या घराला संसाराची ऊब असती तर—' असा विचार माझ्या मनांत येऊं लागला.

आठदहा दिवस माझ्या डोक्यांत ती बाईच घोळत होती. ती कशी असेल, इतके पैसे तिच्याजवळ कसे आले असतील, वगैरे तर्ककुतर्क स्वतःशीं करीत बसण्यांत माझा वेळ जात होता. अखेर एके दिवशीं मला राहवेना. त्या जाहिरा-तीच्या पत्त्यावर मीं एक पत्र टाकलें.

मी जसा कांहीं एकाद्या अशिलाच्याच तर्फे लिहीत आहें असें दाखवून त्या बाईला मीं भेटीला बोलावलें.

तीन चार दिवसांनीं एक तरुण अँग्लो-इंडियन बाई माझ्या घरीं आली. बाहेरच ऑफिसच्या खोलींत मी तिला भेटलों.

'मी जाहिरात देणारी—'

'बसा, त्या लग्नाच्या बाबतींत—'

'होय, स्वतांच आलेलें बरें, असें मीं पाहिलें—'

'बरोबर. आपल्या कुटुंबाची मंडळी—'

ती खालीं पाहून हलक्या आवाजांत म्हणाली,

'मला कोणी नाहीं—जिवंत असें—'

'अरेरे! मोठी दुःखाची गोष्ट–पण–ती–रक्कम सर्वस्वीं आपल्या हक्काची आहे ना?'

'अर्थात्–'

'मी अशिलातर्फे बोलतों आहें, माफ करा—'

'तें ठीक आहे–माफीचा कांहीं प्रश्न नाहीं–पण आपला अशील आहे तरी कोण?'

'ते—ते एक मध्यम वयस्क सुस्थितींतील गृहस्थ आहेत—जरा बाहेर गांवीं गेले आहेत हवा पालटण्यासाठीं—'

'म्हणजे प्रकृति बरी नसते वाटतं त्यांची?'

'नसे नाहीं–तुम्ही दोन तीन दिवस राहिलांत तर दिसेलच तुम्हांला–राहांत असलांत तर पहा—'

'मी शेली होटेलमध्यें आहे—'

'तुम्हांला कंटाळा यायचा नाहींना–हवी तर मी सोबत करीन तुम्हांला—'

'उपकार आहेत आपले, येतें आतां—'

'मग संध्याकाळीं येऊं का होटेलकडे? डिनरला जाऊं कोठेंतरी—

'जरूर—साडेसहाला तयार आहें मीं—'

संध्याकाळीं डॉनेलीच्या भपकेदार होटेलमध्यें मीं तिला डिनर दिलें. होते नव्हते तेवढे पैसे त्या दिवशीं खर्च केले. दोघेजण पेयें प्यालों.

जेवण झाल्यावर मी म्हणालों, 'तुमच्या जवळच्या रकमेबद्दल पुरावा काय, असे माझ्या अशिलानें विचारलें तर काय सांगूं?'

'ती रक्कमच तुम्हांला दाखवतें म्हणजे झालं—'

आम्ही दोघें तिच्या खोलींत गेलों; तिनें ट्रंकेचें कुलूप काढून पांच हजार रुपयांचे सरकारी कर्जरोखे माझ्यापुढें धरले. इतकी संपत्ति पाहून मला इतका हर्ष झाला कीं त्याच्या भरांत त्या बाईचें मीं चुंबन घेतलें—पण तिनें तें नाकारलें नाहीं.

घाई घाईनें मी तेथून परत निघालों. रात्रभर माझ्या डोक्यांत शंकाकुशंकांचें काहूर उठलें होतें. दोन तीन तासांतच चुंबन घेऊं देणारी स्त्री कितपत विश्वसनीय आहे, पांच हजार रुपयांना किती गुन्हे माफ आहेत इत्यादि विचार करतां

करतां मला झोंप लागली. स्वप्नें देखील तिच्या तरुण मूर्तींचीं आणि पांच हजार रुपयांचींच पडत होतीं.

सकाळीं माझ्या मनाचा निश्चय झाला. मी तिच्या होटेलवर गेलों. मीं तिला म्हटलें,

' मिस् सिंजॉल, मीं काल अपराध करून माझ्या अशिलाशीं बेइमान झालों व तुमचाही फाजील फायदा घेतला. याचं प्रायश्चित्त म्हणून मला एकच गोष्ट शक्य आहे—विवाहाची मागणी. मिस् सिंजॉल—जेनी, तूं माझी होशील का ?'

ती हो म्हणाली. लौकरच आमचा विवाह होऊन मी जोसेफ उन्हॉल या नांवानं संसार करूं लागलों.

सहा महिने सगळें सुरळीत चाललें. माझी वकिली थोडी बरी चालत होती, व पैसे दोघांच्याही नांवावर होते.

हळूहळू माझ्या ध्यानांत येऊं लागलें कीं जेनी दर आठवड्याला एक दिवसभर कोठें बाहेर जाते. पुढें पुढें पाहिलें, तर एकदां गुरुवारीं व एकदां शुक्रवारीं ती जात असे असें दिसलें.

एके दिवशीं ती बाहेर पडली तेव्हां मी बॉयचा पोषाख करून तिच्या पाठोपाठ निघालों. ती सरळ पुण्याच्या स्टेशनवर आली. वाटेंत बारकाईनें ती आजुबाजूला व मागें पहात होती, कोणी ओळखीचें मनुष्य दिसलें तर त्याचें तोंड चुकवायची; मला मात्र तिनें पाहिलें नाहीं.

तिच्यानंतर थोड्या वेळानं मीही प्लॅटफॉर्म तिकीट काढून स्टेशनांत गेलों. ती प्लॅटफॉर्मवर उभी होती; मीही एका खांबाआड उभा राहिलों.

मुंबईकडची एक गाडी आली. तिचा कोणी दोस्त उतरून तिला भेटेल या संतापानें मीं तिच्यावर पाळत ठेवली होती.

पण गर्दीतून जाऊन तिनें एका डब्यामधून निघणाऱ्या तीन चार वर्षांच्या मुलीला उचलून तिचे पटापट मुके घेतले व नंतर आय्याच्या कडेवरचें दुसरें एक मूल घेऊन त्याचे मुके घेतले. मी चिडून घरीं निघून आलों.

ती घरीं आल्याबरोबर मीं तिला एकदम विचारलें, 'मुलं कोणाचीं ?'

'कोणतीं मुलं ?'

'स्टेशनवरचीं—'

तिनें एकदम बेशुद्धीचें सोंग केलं; तिच्या डोळ्यांना मीं पाणीबिणी लावलें व तिला कोचावर बसविलें. मग रडतरडत तिनें कबूल केलें कीं तीं तिचींच मुलें –आणखी दोघं आहेत, व पुढल्या शुक्रवारीं ती त्यांना भेटणार होती. हीं दोघें खडकीहून येतात व शुक्रवारचीं दोघें वानवडीकडून येतात.

तिच्याजवळच्या पैशांचें रहस्य याप्रमाणें मला समजलं. त्या चार पोरांच्या बापांच्या पैशांनीं माझा हुंडा उभा राहिला होता—

' सांगा बॅरिस्टरसाहेब, अशा परिस्थितींत मीं काय करावें ?'

बॅरिस्टर धकमार यांनीं गंभीरपणें चष्म्याच्या वरून अशील उन्हाळे यांच्याकडे पाहिलं.

'चारही मुलं घरीं आणून ठेवा, म्हणजे बायकोला बाहेर जाण्याचें कारण उरणार नाहीं.' त्यांनीं पोक्त सल्ला दिला.

## .२. तीर-कमान

होमी हंडीवाला आजकाल खुषींत होता. महा महिन्याच्या मंदीनंतर आतां त्याच्या 'रेजिना व्हरायटी थिएटर'ला पुन्हां तेजी येऊं लागली होती. टॉकीजूचा जमाना सुरू झाल्यापासून बहुतेक थिएटर्स थंडावलीं होतीं; पण होमीनें चिकाटी धरून, हजार लटपटी लढवून रेजिना चालू ठेवलें होतें. एक महिन्याला गुजराथी नाटकें तर पुढल्या महिन्याला नाचगाणें, पुन्हां उर्दू 'ड्रामे', त्याच्या पाठोपाठ जादूचे प्रयोग, कधीं सिनेमा प्रोग्राम तर कधीं सर्कशीसुद्धां—अशा अनेक उचापतींनीं त्यानें पीलाहाऊसकडच्या रसिकांचें ध्यान खेंचून ठेवलें होतें. तरीपण इतके दिवस तो कसाबसा जीव धरून होता इतकेंच; आतां मात्र त्याच्या 'न्यू व्हरायटीज'-मुळें थिएटर चांगलेंच जोरांत चालूं लागलें होतें. या त्याच्या 'विविध कार्यक्रमां'त नाच-गाणें, शक्तीचे प्रयोग, जादूचे चमत्कार, सिनेमा फिल्म, व एक फार्स हे सर्व नमुने होते. या कार्यक्रमांतलें मुख्य आकर्षण—'तीर-कमान' हा साऱ्या मुंबईत आश्चर्याचा विषय झाला होता. तीर—कमान ही एक तिरंदाजांची जोडी होती; त्यांच्या करामतीनें प्रेक्षकांत अभूतपूर्व खळबळ उडाली होती. त्यांची कीर्ति फॅशनेबल लोकांपर्यंत जाऊन पोहोंचली होती, व दिवसानुदिवस रेजिना थिएटरच्या बाहेर लागणाऱ्या मोटरींच्या रांगा पाहून होमी हंडीवाला कृतार्थ होत होता.

महालक्ष्मी बॅटरीवरच्या एका टुमदार बंगल्यांत चंचलगौरी जांभया देत आपल्या मित्रमंडळीशीं गप्पा मारीत होती. तिला कंटाळा आला होता. कसल्याही गोष्टींत

गोडी किंवा नाविन्य वाटत नव्हतें. तिचे पति खंडूभाई कांहीं कामासाठीं कलकत्त्याला गेले होते–आणि ते असते तर चंचलचा कंटाळा जास्तच वाढला असता; कारण त्यांची उमर तिच्यापेक्षां वीस वर्षांनीं जास्त होती, आणि तरुण, सुंदर व रसिक पत्नीपेक्षां लाखाचे दोन लाख करण्यांत त्यांना जास्त मौज वाटत होती.

'आजकाल शहरांत नवी नवलाई तरी आहे का कांहीं?' तिनें आळस देत विचारलं.

'रेजिनामधल्या तीर-कमानच्या खेळाबद्दल सगळीकडे बोलबाला आहे,' कोणीसे उत्तर दिलं.

'हो हो, मीं पाहिला तो खेळ, कमाल आहे बुवा!' एक फॅशनेबल तरुण उद्गारला,

'दर क्षणाला एकाचा जीव धोक्यांत असतो—'

'पण दुसऱ्याचा बाण कधीं चुकत नाहीं—'

'रेजिना म्हणजे कोणत्या बाजूला?'

'पीला हौस—'

'मग आपल्याला काय उपयोग? कुलीन स्त्रियांनीं जाण्यासारखी बाजू नाहीं ती—'

'आमच्याबरोबर येत असलांत तर—'

'तें शक्य नाहीं, शेटजी गांवांत नाहींत—'

'त्या लोकांचें कसब पाहण्यासारखें आहे—'

'आणि देखणे पण असे आहेत दोघेजण–अगदीं अश्विनी कुमारांची जोडी—'

'रेखीव नीटस चेहरे आणि पीळदार अंगकाठी—'

'करामतदेखील अचाट आहे–छातींत धडकी भरते! जरा चुकलं तर काय होईल, कल्पना करवत नाहीं—'

'शेटजी आल्यावरच पाहूं,' चंचल म्हणाली.

परंतु दुसऱ्या कोणाचा जीव धोक्यांत असलेला पाहणें ही एक मानवी मनाची विचित्र हौस आहे. त्याच प्रमाणें चोरून एकादी गोष्ट करण्याचा अपराधी आनं-

दही मोठा उन्मादकारक आहे; त्यांतून, पापाची छटा असलेलें एकादें कृत्य करण्या-सारखें उत्तेजक आळशी मनाला दुसरें कोणतेंही नाहीं. या सगळ्या कारणांमुळेंच चंचल रात्रीं मुकाट्यानें बंगल्याच्या बाहेर पडायला प्रवृत्त झाली. ती एक काळी साडी नेसली होती. डोक्यावरून तिनें एक काळी जाळी गुंडाळली होती, गळ्या-भोंवतीं एक काळा रेशमी गळपट्टा गुंडाळला होता. एक टॅक्सी करून ती थिएटर-वर ( खेळ सुरू झाल्यावर ) गेली व एक बॉक्स घेऊन मागें अंधारांत बसली.

कांहीं किरकोळ कार्यक्रम झाल्यावर तीर-कमान खेळ सुरू झाला. दोघां खेळाडूंनां कर्ण व अर्जुन यांच्यासारखे पौराणिक पोशाख केले होते. दोघेही सुंदर होते, मर्दपणा दोघांच्याही नसा नसांत भरलेला दिसत होता. आळीपाळीनें ते आपली धनुर्विद्येची करामत दाखवीत होते. त्यांच्या पीळदार दंडाचे स्नायू व रुंद छातीची ठेवण मोठी मनोवेधक दिसत होती. त्यांच्या कसबाच्या प्रत्येक प्रयोगाला उत्साही प्रेक्षक टाळ्यांचा प्रचंड कडकडाट करून आपली पसंती दाखवीत होते. त्यांचा शेवटचा खेळ फारच धोक्याचा—आणि आकर्षक होता. एका मोठ्या पुठ्ठ्यापुढें 'कर्णाला' उभा करून, 'अर्जुनानें' त्याच्या शरीराच्या कडेकडेनें बाण मारले, व एकवीस बाणांत कर्णाची आकृति मागच्या पुठ्ठ्यांतून कातरून निघाली.......

चंचलेच्या हृदयांत कलीनें प्रवेश केला. बॅगमधून आपली छोटी डायरी काढून एक पान तिनें फाडलें व पेन्सिलीनें लिहिलें, 'थिएटरच्या मागील दारापुढें एका बंद टॅक्सींत आपल्यासाठीं तळमळणारी एक स्त्री आपली वाट पाहात आहे.'

एक रुपया देऊन आइसक्रीमवाल्या पोराबरोबर तिनें ती चिठ्ठी अर्जुनाला पाठ-विली व ती थिएटरच्या बाहेर पडली—

बंद टॅक्सींत जवळ जवळ एक तास ती बसून राहिली होती. खालीं केलेल्या काळ्या पडद्याच्या फटींतून तिनें आपली दृष्टी थिएटरच्या मागच्या दारावर लावली होती. अखेर एकदांचा खेळ संपला. पहिल्यानें बरेचसे दुसरे लोक बाहेर पडले. लौकरच अर्जुन हांसत हांसत बाहेर आला; त्याला ही सगळी थट्टा वाटत होती; पण उभी असलेली गाडी पाहून तो थबकला, व धाडस करून टॅक्सीचें दार उघडून आंत येऊन बसला. पापी वासनेनें बेछूट झालेली ( व थोडी भ्याले-लीही ) चंचला त्याला अगदीं खेटून बसली. त्याला वाटलें कीं एकादी मामुली वारां-गनाच आपल्यावर खूष झाली असावी.

आणि 'जॉकी होटेल' या हलक्या पथिकाश्रमांतील एका स्वतंत्र खोलींत दोघें गेल्यावर सुद्धां त्याचा गैरसमज दूर होण्यास जरा वेळ लागला. तो कांहीं मोठा संत नव्हता, पण तोसुद्धां भेदरूनच गेला.........

त्याच आठवड्यांत चंचलनें कर्णाची ओळख त्याच मार्गानें करून घेतली. आणि यापुढें या दोन पुरुषांना ती आलटून पालटून भेटूं लागली. एकाचें रहस्य दुसऱ्याला कळूं न देण्याची सावधगिरी तिनें घेतली होती. दोघांनाही हें गुपित न फोडण्याची शपथ तिनें घेण्यास लावलें होतें.

कर्ण भावनाप्रधान होता; तो या लपवाछपवीच्या व्यवहारावर संतुष्ट राहिला नाहीं. ती कोण आहे, कोठली, वगैरे विचारण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला, पण तिनें पत्ता लागूं दिला नाहीं. तिनें त्याची गंमत मात्र उडविली. त्याला कल्पना नव्हती कीं ही स्त्री 'प्रेम' वगैरे कांहीं ओळखीत नाहीं, कीं आपण हिच्या हौसेचें बाहुलें आहोंत. तिनें त्याला बजावलें होतें कीं 'फार चौकशा केल्यास तर मी तुला कधींही भेटणार नाहीं.'

तरी एके दिवशी तिला तो म्हणाला,

'तुमच्या सारख्या मोठ्या घराण्यांतल्या बाईनें प्रेम करण्याइतका मी भाग्यवान् झालों हें मला खरें देखील वाटत नाहीं! —रागावूं नका, मीं तुमच्या मागें येऊन तुमचा पत्ता काढला, तुम्ही किती श्रीमंत व घरंदाज आहां हें मला कळलें —माझ्यासारख्या गरीब कसरती इसमाचें केवढं नशीब हें!'

'मूर्ख मनुष्या,' ती चवताळून ओरडली, 'लोकांनीं तुला थापा दिल्या, सगळें खोटें आहे तें—मी तशी कोणी नाहीं—'

त्याला तिनें घालवून दिलें.

या दुहेरी कारस्थानाचा तिला आतां कंटाळा आला होता. शेटजी कलकत्त्याहून परत येण्याचे दिवस होते. या दोघां अडाण्यांना वाटेला लावण्याची आतां जरूरी होती. तिनें बराच विचार केला ...

पुन्हां अर्जुनाशीं संकेतानें ती जेव्हां भेटली, तेव्हां कठोरपणें त्याला दूर उभा करून तिनें सांगितलें,

## चोरबाजारांतील चिजा

'हें पहा, तुला फसवायची माझी इच्छा नाहीं; तुझ्या जोडीदारावर माझें प्रेम बसलें आहे. मीं आपला दिल त्याला दिला आहे, तो आतां माझा प्रियकर आहे. आतां तुझ्याशीं संबंध ठेवण्याची माझी इच्छा नाहीं—'

क्षणभर तिचा तो खून करणार अशी त्याची मुद्रा झाली; पण आपल्या शक्तीचा उपयोग त्या कोमल देहाला कुसकरण्यासाठीं करण्यास त्याचें मन धजलें नाहीं— त्याच नाजुक देहाला त्यानें हलुवारपणें कुरवाळलें होतें. आटोकाट प्रयत्न करून त्यानें आपला संताप आवरला; शून्य दृष्टीनें चमत्कारिक आवाजांत तो म्हणाला,

'ठीक आहे, तुझी अशी इच्छा आहे, तर माझें तोंड तुला कधींही दाखविणार नाहीं-' तो निघून गेला ......

त्या रात्रीं रेजिना थिएटरमध्यें एक शोचनीय अपघात झाला. तीर-कमान कार्यक्रमाचा शेवटचा खेळ चालू असतां अर्जुनाचा एक बाण चुकून कर्णाच्या छातींत आरपार घुसला. अर्जुनाच्या डोळ्यांत वेड लागल्याची चमक आली होती- व बॉक्समध्यें बसलेली चंचल संथपणें वारा घेत थिएटरमध्यें उडालेल्या कहराकडे पाहात होती.

दुसऱ्या दिवशीं महालक्ष्मी बॅटरीवर खड्डूभाई शेठच्या बगल्यांत नेहमींची मंडळी गप्पा मारीत बसली होती.

'काय भयंकर अपघात काल रेजिनामध्यें—'

'हो कोणसासा मेला म्हणतात—'

'त्या तीर-कमानवाल्यांतला एक—'

'मोठा धोक्याचाच खेळ होता तो—'

'काय नांव बरं त्याचं ?'

'कर्ण का अर्जुन होता म्हणतात कोणीसा—' चंचल जांभई देत म्हणाली !'

[illegible]

## ३. राजमान्य

कांहीं कांहीं माणसांची अपेक्षा असते कीं एकाद्या गोष्टीबद्दल नुसता विचार केला कीं ती आपल्याला प्राप्त व्हावी. प्रयत्न किंवा मेहनत करण्याच्या ते भानगडीत पडत नाहींत. दाजीबा दुपट्टे या गृहस्थांना लहानपणापासून एकच तळमळ होती—सरकारी मान्यता मिळविण्याची. आपल्याला एकादी पदवी, किताब किंवा कसलेंतरी मानाचें चिन्ह मिळावें ही त्यांची महत्त्वाकांक्षा अगदीं समजायला लागल्यापासून होती. बालपणीं वडिलांचें बोट धरून रस्त्यानें चालतांना त्यांच्या मखमलीच्या डगल्यावर पत्र्याचे बिल्ले लावलेले असत. मोठमोठ्या अम्मलदारांना मिळणाऱ्या 'राज्य–रक्षक' या मानाच्या तलवारीची लांकडी आवृत्ति ते तेव्हां कमरेला लटकावून हिंडत असत.

दाजिबा पाणघोडा संस्थानचे रहिवासी होते. हें देशी राज्य मोठें प्रगतीपर होतें; सुधारणेच्या आघाडीला आपल्या प्रजेस नेऊन पोहोचविण्याचा राजेसाहेबांनीं चंग बांधला होता; व सरकारी ( म्हणजे संस्थानी ) नोकरांनीं ईर्ष्येनें काम करावें म्हणून राजेसाहेब दर वाढदिवसाला लहानमोठ्या पदव्यांची खैरात करीत असत. या खैरातींतलें सर्वांत सवंग नाणें म्हणजे 'राजमान्य' हा किताब होता; व हा किताब धारण करणाऱ्या भाग्यवन्ताला, संस्थानच्या निशाणाची किनार लावलेला जांभळा शेला वापरण्याचा हक्क होता. याच मानचिन्हावर दाजिबा दुपट्टयांचा डोळा बरेच दिवस होता.

शिक्षणांत विशेषशी प्रगति होत नाहीं हें पाहून दाजिबांनीं एका श्रीमंताच्या

मुलीशीं लग्न केलें होतें व राजधानींतच बारखळी खात्यांत एक लहानशी नौकरी पकडून आपला मुक्काम ठेवला होता. मोठमोठ्या अम्मलदारांकडे ओळखी जमवून दरबारच्या नजरेला आज नाहीं उद्यां येण्यास ही सोय बरी होती.

पंधरा वर्षांच्या नौकरीनंतर दोन बड्या अम्मलदारांची व त्यांची जानपछान झाली खरी, पण मानाच्या पदवीला चढण्यात त्यांचा फारसा उपयोग झाला नव्हता. दाजिबांचें कुटुंब मागेंच वारलें होतें. म्हणून घरीं फारसे न राहतां एकुलती एक मुलगी मंजुळा हिला घरीं सोडून, दाजिबा फावल्या वेळांत रस्त्यानें हिंडण्यांत वेळ घालवीत होते; व हिंडतां हिंडतां मानचिन्हांनीं नटलेल्या लोकांची खानेसुमारी ठेवणें हा एकच त्यांचा उद्योग होता. त्यांच्यापेक्षां कमी उमरीच्या कित्येक लोकांच्या अंगावर राजमान्य या पदवीचा शेला त्यांना दिसे, व तो पाहून ते अगदीं चिडून जात; कारण त्यांच्या स्वतःच्या प्रयत्नांस बिलकूल यश येत नव्हतें.

डमरूधराचें मंदिर हें राजघराण्याचें दैवत होतें, व त्या मंदिराच्या कट्टयावर राजेसाहेबांच्या आप्तवर्गाच्या कृपाकटाक्षावर टपलेले बहुतेक मानकरी घोंटाळत असत. पदव्या व किताब धारण करणाऱ्यांची तेथें नुसती गर्दी माजली होती. येथेंच येण्याचा दाजिबांनीं क्रम ठेवला होता, व कालांतरानें इथल्याच एका इसमानें त्यांची खाजगी कारभाऱ्यांशीं ओळख करून दिली होती. तेव्हांपासून दाजिबांचा उत्साह दुणावला होता.

कारण खाजगी कारभारी मानाजीराव सुरवारे मोठा निगर्वी मनुष्य निघाला. तो दाजिबांचा पाहुणचार खुल्या दिलानें घेत असे. मंजुळेची देखील मोठ्या आस्थेनें विचारपूस करायचा. तो चाळीशीच्या सुमाराचा गृहस्थ, पण एव्हांना स्वतः राजमान्य होऊनही गेला होता ! शिवाय दाजिबांना किताब मिळवून देण्याचेंही त्यानें आश्वासन दिलें होतें. दरबारच्या—विशेषतः दिवाणसभेच्या नजरेला येण्यासारखें कांहीं करून दाखवा म्हणून मानाजीरावांनीं सुचविलें.

तेव्हां पहिली पायरी म्हणून दाजिबांनीं आपल्याला राजमान्य करण्याबद्दल दिवाणसभेला अर्ज केला ! ही गंमत शाळाखात्याच्या सचिवांनीं सुरवारेसाहेबांना सांगितली; तेव्हां मानाजीरावांनीं स्वतः दाजिबांना कांहीं विधायक सूचना केल्या. 'या राज्यांत शिक्षणाला फार महत्त्व आहे, तेव्हां शिक्षणप्रचाराचा एकादा मसुदा

तयार करून दाखवा, व प्रयत्न चालू ठेवा,' असें सांगून दाजिबांना जरूर ती मदत करण्याकरितां मानाजीराव वरचेवर त्यांचे घरीं येऊं लागले. पुष्कळदां दाजिबा घरीं-सुद्धां नसत, पण मंजुळेशीं बोलण्यांतही खासगी कारभारी संतुष्ट होते.

त्यांच्या सूचनेबरहुकूम दाजिबांनीं वेगवेगळ्या विषयांवर निबंध लिहून ते विद्याखात्याकडे व दिवाणसभेपुढें पाठविण्याचा सपाटा लावला. त्यांनीं मांडलेल्या योजना पुढील प्रकारच्या होत्या :—

सहकारी पतपेढ्यांचा प्रचार पोलीस खात्यातर्फे करणें;

प्राथमिक शिक्षणांत लष्करी शिक्षणाचा अंतर्भाव;

सर्व्हिस मोटारींच्या बरोबर फिरत्या लायब्ऱ्या ठेवण्याची सोय;

कैद्यांना जमीनमहसुलाबद्दल शैक्षणिक चित्रपट दाखविण्याची योजना इ. इ. इ.

हे प्रबंध छापवून तलाठ्यांपर्यंत सर्व अंमलदारांना पांच पांच प्रति पोहचविण्याची व्यवस्था दाजीबांनीं केली होती. इतक्या श्रमानंतर देखील कांहीं वळण्याचीं चिन्हें दिसेनात. एक वेळ मॅजिक लॅटर्नचा सेट घेऊन स्वतःच्या खर्चानें तमाम राज्यांत व्याख्यानें देत हिंडावें असें दाजिबांच्या मनांत आलें. पुन्हां वाटलें कीं राजेसाहेबांच्या वाढदिवशीं त्यांच्या स्तुतिपर कविता रचून वाचाव्यात; पण फिरून मनांत आलें कीं शिक्षणसचिवांना तरी एकदां भेटावें. भेटीचा वशिला सुरवारेसाहेबांनीं लावून दिला, पण खुद्द सचिव भेटलेच नाहींत. एका चिटणिसांनीं दाजिबांना मुलाखत दिली व सांगितलें कीं, आपलें कार्य चालू ठेवा, आम्ही मोठ्या कौतुकानें पाहात आहोंत. योग्य वेळीं आपली शिफारस करण्यांत येईल.

थोडे हिरमुसले होऊन दाजिबा घरीं आले. मानाजीराव त्यांची वाटच पाहात होते; त्यांनीं त्यांना बाजूला नेऊन सांगितलें कीं 'मीं वशिला लावून तुम्हांला खास कामगिरीवर नेमण्याची व्यवस्था केली आहे. तुम्ही सरकारी खर्चानें खेडो-पाडीं जाऊन गांवांतल्या जुन्या पोथ्यांची यादी बनवायची—सरकारची लौकरच मेहरनजर होईल.'

दाजिबा उद्याच्या मारीत आपल्या नव्या कामगिरीवर गेले. गांवागांवांतून त्यांचा दौरा होऊं लागला. खेडेगांवांतल्या निरपराध प्रजेला त्यांनीं हैराण करून सोडलें.

## चोरबाजारांतील चिजा

जवळ जवळ तीन वार बाहेरगांवीं काढल्यावर त्यांना प्रवासांतल्या हालांचा कंटाळा आला. राजधानीला परत येऊन एक दोन दिवस विश्रांति घेऊन जाण्याचें त्यांच्या मनांत आलें. लगेच संध्याकाळीं निघून ते रात्रीं पाणघोड्याला येऊन पोंहोचले. मंजुळेला चकीत करण्याचा त्यांनीं निश्चय केला होता. एकदम जाऊन त्यांनीं दार ठोठावलें.

आंत कोठेंतरी पाय वाजले, कांहीतरी पडल्याचा आवाज आला, कुजबूज ऐकूं आल्यासारखें वाटलें, क्षणभर मागलें दार वाजल्याचा देखील त्यांना भास झाला.

'काय धांदरट पोर आहे!' ते स्वतःशींच हांसून मनांतल्या मनांत म्हणाले, 'काय घाबरली! पाडलन् वाटतं कांहीतरी! स्वतःशींच बडबडली काय—आणि जाऊन मागचंच दार उघडलन् वाटतं! हा हा हा!'

त्यांनीं पुन्हा दार ठोठावलें.

अस्ताव्यस्त कपडे सांवरीत, केस नीटनेटके करीत, कपाळावरचा घाम पुशीत, धांपा टाकीत मंजुळेनें दार उघडलें.

'कोण—बाबा?'

'होय, मी, मीच! कां घाबरलीस होय?'

'नाहीं—नाहीं घाबरलें नाहीं, पण बाबा या वेळेला—'

घरांत जात जात दाजिबा हांसले,

'म्हटलं फार दिवस झाले, पोरगी कंटाळली असेल—' त्यांनीं आपल्या खांद्यावरचा इतमामाचा शेला–शेला कसला उपरणेंच—खुर्चीवर टाकलें.

चूळबीळ भरून टाकून ते पुन्हां दिवाणखान्यांत आले. मंजुळा गप्पच होती. खुर्चीवरचा शेला उचलून ते तोंड पुसूं लागले—

'हें काय–हा शेला कोणाचा—'

'तो–तो—'

तो 'राजमान्य' किताबाचा जांभळा शेला होता. सरकारी निशाणाची त्याला किनार होती—

'हा शेला इथें कसा आला?'

'बाबा तें एक गुपित आहे-तुम्हांला कळूं द्यायचं नव्हतं—'

'आणि हें नांव कोणाचं याच्यावर या कोपऱ्यांत-मा० सु० ?'

'तो आजच येऊन पडला आहे—राजमान्यपदवीचा शेला-मानाजीरावांनींच तुमच्यासाठीं करवून आणला आहे-तुम्हांला नजर करायला!'

काय ?'

'तुम्हांला किताब मिळाला आहे-त्यांना खाजगी रीतीनें कळलं-तुम्हीं दौऱ्या-वरून आल्यावर एकदम दाखविण्याकरितां-आजच दुपारीं आणून टाकला त्यांनी—"

'काय ? काय म्हणतेस काय पोरी ?' दाजिबांनीं हर्षाचा हंबरडा फोडला. 'मी राजमान्य झालों ! जय डमरूधरदेवा ! महाराजांचं कल्याण होईल ! अहाहा ! धन्य झालों मी !'

आणि लौकरच 'पाणघोडा दरबार गॅझेट' मध्यें 'खास कामगिरीबद्दल' दाजिबा दुपटे यांना 'राजमान्य' हा किताब देण्यांत आल्याचें जाहीर झालें.

मानाजीरावांना मात्र हातोहात नवीन शेला बनवून घ्यावा लागला.......

## ४. टॅक्सीवाला

बाळारामाला आज कृतकृत्य वाटत होतें. आज त्याच्या मोहबतीची उमेदवारी संपली होती. ज्या गोष्टीमागें सहा महिने तो चिकाटीनं लागला होता, ती गोष्ट साध्य झाली होती. रुक्माबाईची मुलगी केसर आज त्याला मिळाली होती. सुमारें तीस वर्षांच्या वयापैकीं पंधरा वर्षांच्या त्याच्या जाणत्या वयांत, बरेच दिवस एके ठिकाणीं मन टिकून राहिलें असें हें पहिल्यानेंच. 'कलिंदर' म्हणून धंद्याला सुरवात केली तेव्हां साजू मोलकरणीवर त्याचें मन पहिल्यानें गेलें होतें. त्यानंतर किरिस्ताव्याची मेरी, पेस्तनजी शेठची आय्या यल्ला, करीम ड्रायव्हरची बहीण मोनी, असे प्रतिलोम प्रयोग करीत करीत पंधरा वर्षांच्या अवधींत त्यानें...पण जाऊं द्या मोठ्यांचीं नांवें कशाला—अनेक अनुलोम अनुभवांपर्यंत मजल मारली होती.

पण त्याच्या दिलाला आराम मिळेनासा झाला होता. टॅक्सीड्रायव्हर झाला तरी स्टिअरिंग व्हीलच्या मागें झोंप तरी किती दिवस घ्यायची ? पावणा कप अन् 'बुरून म्हसक्या' वर भूक किती दिवस भागवायची ? खाकी कोटपाटलोणींतच किती दिवस हिंडायचें ? जिवाला स्थिरपणा यावा असें त्याला वाटूं लागलें होतें. बेजबाबदार 'ब्रह्मचर्या' चा त्याला कंटाळा आला होता. घर व घरधनीण करावीशी इच्छा होऊं लागली होती.

असें त्याला वाटायला लागण्याच्या सुमारासच पानतंबाखूवाल्या रुक्माबाईचें बिऱ्हाड त्याच्या गॅराज शेजारीं आलें होतें. पहिल्यानें केसरवर लक्ष गेलें तेव्हां

त्यानें नेहमींच्या सर्व युक्त्या करून पाहिल्या. मोटर धुण्यासाठीं पाणी मागण्यापासून ओळख केली. फुलांच्या वेण्या आणून देण्याचा प्रयत्न केला, महालक्ष्मीच्या दर्श-नाला मोटारींतून नेऊं केलें, पैसे देऊन रुक्माबाईकडे जेऊं देखील लागला; पण रुक्माबाई मोठी खबरदार! केसरची ओळख करण्याचा बाळारामाचा बेत तिनें एकदांही साधूं दिला नाहीं. उलट तिनें आपल्या बोलण्यांत स्पष्टपणें सुचविलें कीं, माझी केशर एकाद्या चंगीभंगी माणसासाठीं नाहीं. मीं तळहाताच्या फोडासारखी तिला जपली, शाळेंत पाठवून चार बुकें शिकवलीं, नीटनेटकी ठेवली, ती एकाद्या उठाव-गिराच्या नादीं लागण्यासाठीं नव्हे; तिचें लगीन करायचें आहे. चांगला ठावठिकाणा असलेला, चार पैसे बाळगणारा, गृहस्थी मनुष्य पाहीन नि त्याच्या स्वाधीन माझी पोरगी करीन.' बाळारामावर रुक्माबाईच्या या सडेतोड शब्दांचा फार परिणाम झाला होता. केसरला नुसतीच 'उचलायचा' ठराविक विचार सोडून, लगीन करून तिच्यासह घर मांडायची त्याच्या इतक्या दिवसांच्या शिरस्त्याला न शोभणारी कल्पना त्याच्या डोक्यांत घोळूं लागली होती.

या व्यवहारी विचाराबरोबर केसरची काव्यमय स्फूर्तीही त्याला होतीच. तशी ती शेजारीं राहून देखील दृष्टीस पडणें मुष्कील होतें—रुक्माबाईची नजर मोठी तिखट, तरीपण काय आठपंधरा दिवसांनीं केसर त्याच्या डोळ्यांसमोर चमकून जायची तेव-ढ्यावरच त्याची उमेद वाढायची. अशा उमद्या छोकरीबरोबर संसार मांडून शहाजोग-पणें रहाण्याची तळमळ 'उत्कर्षाच्या सोपानावर' त्याला एकेक पायरी चढवूं लागली. खाकी पोषाख देखील तो स्वच्छ व नीटनेटका ठेवूं लागला; आपली गाडीही त्यानें लखलखीत केली; 'लैसना'वर शेरे पडूं द्यायचे नाहींत असा निश्चय केला; प्रत्येक पोलिसाला तो सलाम करूं लागला; 'पाशिंजरा'शीं बेसुमार अदबीनें वागूं लागला. संध्याकाळीं 'तयार' झालेले शेटलोक लांबच्या रस्त्यानें घरीं पोहोंचवून त्यांना आस्थापूर्वक हात धरून दारापर्यंत सोडून, बक्षिशीसह त्याची कमाई त्यानें जशी वाढविली, तशीच निशाणाला रुमाल बांधून ठरावानें भाडें करून अवांतर मिळ-कतींतही भर टाकली. स्वतःच्या वागणुकींतही त्यानें शिस्त आणली. संध्याकाळचे कार्यक्रम एकदम बंद केले; बाटलीऐवजीं कपबशींतूनच मिळणारी हुशारी त्याला पुरूं लागली; पैसे लावून पत्ते खेळणें सोडलें; इतकेंच नव्हे तर 'विकली फिगर' वरची 'डेली' पावली देखील मोठ्या नाखुषीनें बंद केली.

चोरबाजारांतील चिजा

असें सुमारें सहा महिने चालल्यानंतर काय झालें असेल हें धूर्त वाचकांस सांगायला पाहिजे काय? सद्वर्तनाचें फळ काय मिळतें हें दाखविणाऱ्या गोष्टी (तात्पर्यासह) आपण लहानपणापासून वाचीत आलोंच आहोंत; नीतिशास्त्राच्या-कोणत्याही 'गाईडबुकां'त सच्छीलपणाचे जे फायदे दर्शविलेले असतात, ते बाळा-रामाला मिळाले. थोडथोडे पैसे शिल्लक टाकीत अखेर एके दिवशीं सात सीटची 'सेकंडहँड' गाडी खरेदी करून, त्यानें स्वतःची टॅक्सी बनवली, व खाकी कपडे झुगारून देऊन आगबोटीवरच्या अम्मलदारासारखे सफेत रुबाबदार कपडे धारण केले—तो 'टॅक्सीमालक–ड्रायव्हर' झाला.

ध्येयसिद्धीच्या तेजानें चकाकणारा चेहरा घेऊन तो तडक रुक्माबाईकडे गेला. तिलाही त्याच्या उद्योग, उत्साह व उन्नतीचें कौतुक वाटत होतेंच. तिनें त्याचें स्वागत करून त्याला 'चाय' दिल्यावर तो म्हणाला, 'रुक्माबाई, बाहेरची गाडी पहा' ती माझी स्वतःची आहे. आतां रोजची कमाई होईल तीही सगळी माझी. संथपणानें धंदा करायला मला घर पाहिजे–संसार पाहिजे–बायको पाहिजे. आतां बोला, केसरचें माझ्याशीं लगीन लावून देतां, कीं देशावर जाऊन मी घरधनीण करून आणूं?.'

रुक्माबाईच्या केसरबद्दलच्या कल्पना पूर्वीपेक्षां बदलल्या होत्या. आपल्या पोरीला आय. सी. एस. (म्हणजे त्यांच्या दृष्टींतला तितक्याच भावाचा जांवई) मिळत नाहीं, हें त्यांना कळून चुकलें होतें; शिवाय ज्या लग्नसंस्थेविषयीं त्यांचा इतका आग्रह होता ती तेवढी वगळून केसरबद्दल बोलणें करणारीं माणसेंच तिला मुंबईंत जास्त भेटलीं होतीं. तेव्हां स्वतःचें व बायकोचें पोट भरणारा—व स्वतःची मोटर ठेवणारा जांवई फार चांगला असा पोक्त विचार तिनें केला, व बाळारामाच्या मागणीला रुकार दिला.

आज सकाळीं एका पळशी ब्राह्मणानें केसरचा बाळारामाशीं विवाह लावून दिला होता; आणि साहजीकच बाळारामाला आज कृतकृत्य वाटत होतें.

—ही एक बोधपर कथा आहे असा वाचकांनीं दुष्ट संशय घेऊं नये; त्यांना बेसावधपणें नादीं लावून 'सदाचरणाचें फळ' या विषयावर नीतिपर गोष्ट सांगून शेवटीं उद्बोधक तात्पर्य काढायचा हा डाव नव्हे. येथें कहाणीचा शेवट नाहीं. ही नुसती सुरवात आहे.

# टॅक्सीवाला

सहा महिन्यांच्या व्रतस्थ आयुष्याची अनिवार्य प्रतिक्रिया बाळारामाच्या मनावर होऊं लागली होती, आणि तें मनुष्यस्वभावाला अनुसरूनच होतें. क्षत्रियाचा ब्राम्हण होण्यासाठीं विश्वामित्रानें केलेल्या तपाच्या रासायनिक क्रियेनंतर त्याला असाच ऊत आला होता. सत्याग्रहांत बंदीवास पत्करून नंतर बाहेर आलेल्या कित्येक हौशी तरुण देशभक्तांच्या मनानें अशीच उलट खाल्ली होती. महात्माजीं-बरोबर एक दिवसाचा सहानुभूतिपर उपास करून दुसऱ्या दिवशीं पहांटेच अच्छेर शिरा बडविणाऱ्या गृहस्थासारखा बाळाराम हपापला होता. ध्येयसिद्धीनंतर आलेल्या उन्मत आवेशांत त्यानें ठरवलें कीं एकदां–अगदीं एकदांच–आपल्या जुन्या सवंगड्यांसह आपल्या कठोर व्रताचें उद्यापन करायचें.

लग्नाचा मामुली विधी, जेवण वगैरे चार पांच वाजेपर्यंत संपल्यावर बाळाराम 'मुहूर्ताची एक फेरी करून येतों' म्हणून झेंडूच्या फुलांच्या माळांनीं शृंगारलेली 'टॅक्सी' घेऊन घराच्या बाहेर पडला. 'लौकर परत या हो' असें निक्षून रुक्मा-बाई ओरडून सांगत असतां खिडकींतून केसरच्या लाजऱ्या पण प्रेमळ दृष्टीनेंही त्याला तेंच सुचविलें होतें. त्यामुळें बाळारामाचा हुरूप जास्तच वाढला होता. रंगांत येऊन, 'वाट पाहतां तनू माझी सुकली' असें कांहींतरी गुणगुणत तो इष्टमित्रांशीं ठरलेल्या मैफलीच्या ठिकाणीं जोरांत चालला.

रंगांत आलेल्या टॅक्सीवाल्याच्या लीला (त्याच्या मार्गातून जिवानिशी बचाव-लेल्या) पांथस्थांना माहितच आहेत. यावेळीं बाळारामानें अगदीं दंगलच उडवून दिली; एकदां तो 'साठावर' जाई तर लगेच ब्रेकांच्या किंकाळ्या काढीत एकाद्या गाफिल वाटसराच्या पाठीशीं गाडी नेऊन टेंकवी. कधीं 'एक्झॉस्ट' खोलून भयंकर कोलाहल उडवी तर कधीं आस्तेच उजव्या हातानें जाऊन कांहीं पदस्थांना जीव घेऊन पळायला लावी, केव्हां हॉर्नचा ठेका धरून एकाद्यादुकट्या जीवाचा खेळकरपणें पाठलाग करी तर केव्हां केव्हां विजेच्या हॉर्नवर एकसारखें बोट ठेवून गर्दी मोडून लोकांना सैरावरा पळायला लावी. इतकें सगळें करून पोलिसाच्या तावडींत न सांपडण्याची दक्षताही तो ठेवीत होता. वाटेंत हात वर करून थांबवूं पाहणाऱ्या एका पारशी 'भाडुता'ला नुसत्या वाकुल्या दाखवून तो पुढें गेला तर दुसऱ्या एका लठ्ठ शेटजीच्या आवाजासारखाच आपल्या हॉर्नवर आवाज काढून त्यानें आपला रस्ता सुधारला. त्याला आज गिऱ्हाइकाची किंमत नव्हती, भाडे-

कऱ्यांची भीति नव्हती, 'पार्शिजरा' ची पर्वा नव्हती. तो आज दोस्तांसह मजा मारायला जात होता; सहा महिन्यांच्या तुंबलेल्या तहानेची शांति करणार होता, संसाराचा संथ नंदादीप लावण्यापूर्वी एकलकोंड्या आयुष्याची आतषबाजी उडविणार होता.

ठरलेल्या ठिकाणीं, ह्यूरोड स्टँडवरचा मार्टिन, चौपाटी स्टँडवरचा रसूल व ऑपेरा हाउसजवळचा जमशेटजी हे तीन सवंगडी हजर होते. स्वतःच्या लग्नाप्रीत्यर्थ 'पहिली फैर' बाळारामानें झडविल्यावर, तिघांनीं अभिनंदनाप्रीत्यर्थ स्वतःची एकेक फैर दिली.

नंतर त्यांना आठवण झाली कीं ठाकुरद्वार स्टँडचा विश्राम गैरहजर आहे; व दुसऱ्या एका ठिकाणीं यजमानातर्फे एक व नवीन पाहुण्यातर्फे एक अशा दोन पाळ्या झाल्या.

आतां धोबीतलाव स्टँडवरचा पिंटो, बोरीबंदरचा हडसन गाडीवाला शिवा, क्रॉफर्ड मार्केट ठाण्यावरचा कमरुद्दीन व परत चर्नीरोड जंक्शनजवळचा केकी या सगळ्यांकडे जाणें ओघानेंच आलें. प्रत्येक नवीन पाहुण्याच्या आगमनाप्रीत्यर्थ जवळच्या पानगृहांत एकेक 'राउंड' झालें. बाळारामाचा पहिल्या नंबरचा स्कोअर शेवटपर्यंत होता. त्याचे सवंगडी हळूहळू थंडे झाले, पण तो अगदीं 'चालू स्थितींत' होता. एकेकाला सोडीत दहाच्या सुमारास तो नानाच्या चौकांत आला, तरी त्याचें पुरें समाधान झालें नव्हतें. त्यानें एक 'शेवटचा' एकट्यानेंच जाऊन चढविला तेव्हां कुठें डोक्यांतल्या सर्व बत्त्या लागल्याचा भास उत्पन्न होऊन त्याची तार नीट वाजूं लागली. साधासुधा 'पानपंडित' एव्हांना खलास झाला असता; बाळारामानें इतके 'बार' पालथे घातले होते कीं तुरुंगाच्या एका कोठडीची उभारणी तेवढ्यांत सहज झाली असती; पण तो स्वतःचें मोटर हाकण्याचें काम उपजतबुद्धीच्या बिनचूकपणानें करीत होता. तो जातिवंत टॅक्सीड्रायवर होता.

घरीं वाट पाहून पाहून रुक्माबाई व केसर कंटाळून गेल्या होत्या. बाळाराम 'शीक' झाला किंवा त्याला 'अक्सिडण' झाला कीं काय अशा दुष्ट शंका त्यांच्या मनांत डोकावत होत्या. साडेदहाच्या सुमारास म्हातारीला बसल्या जागींच डुलकी आली. केसरही अंगाला आळोखेपिळोखे देत दाराशीं गेली. आपल्या नव्या घर-

धन्याचा मोटरीचा रिकामा तबेला पाहून तिच्या पोटांत तुटूं लागलें. हळू हळू ती रस्त्यापर्यंत गेली. रस्त्यावर सामसूम होती; धीटपणें ती गल्लीच्या नाक्यापर्यंत गेली. हमरस्त्याला चाललेल्या तुरळक वाहतुकीकडे ती उदासीनपणें पहात उभी होती.

तिनें एक फॅशनेबल नवें छापील पातळ परिधान केलें होतें व डोक्यावरून पदर घेतला होता. रुक्माबाईनें लग्नानिमित्त हौसेनें घेतलेल्या नव्या चपला तिनें घातल्या होत्या. बाहेर येण्याआधीं ती वाचीत असलेलें पुस्तक [ चतुरसुंदरी अथवा चोरावर मोर ] तिच्या हातांत होतें. थोडक्यांत म्हणजे ती मोठी रुबाबदार बाई दिमत होती.

इतक्यांत तिनें मोटरचें शिंग ऐकलें–तो आवाज तिच्या ओळखीचा होता. त्याबाजूला वळून पाहिलें तों तिच्या वल्लभाचीच मोटार तिच्याकडे येत होती; मनाचा हिय्या करून तिनें हात वर केला.

मोटर फूटपाथजवळ येऊन थांबली; बाळारामानें मागें रेलून मागचें दार खोललें. केसरच्या मनांत आलें 'आपल्या शेजारीं कां बसवून घेत नाहींत मला ?' पण ती मुकाट्यानें मागें बसली. बाळारामानें पुन्हां मागें वळून चमत्कारिक आवाजांत विचारलें 'कुठें बाई ?'

त्याच्या शब्दांबरोबर आलेल्या भपकाऱ्यानें तिच्या डोक्यांत लगेच प्रकाश पडला; पण थोडें अडखळून ती म्हणाली, 'वाळकेश्वर—'

ती बसतांच बाळारामानें मीटरचें निशाण पाडलें होतें. मोटारींतल्या अंधारामुळें (व अन्य कारणानें ) आपलें गिऱ्हाईक एक 'गिर्रेबाज पांखरूं' आहे या अंधुक कल्पनेखेरीज बाळारामाला विशेष कांहीं बोध झाला नव्हता; फार काय, आपण 'गिरस्ती माणुस' झाल्यानंतर मुहूर्ताचें हें पहिलेंच गिऱ्हाईक आहे हेंदेखील त्याच्या लक्षांत आलें नव्हतें.

वाळकेश्वरीं तीन बत्त्यांचा कोपरा आला तेव्हां 'झुलत्या बागेकडे' म्हणून केसरनें इशारा दिला. पुन्हां केम्पच्या कोपऱ्यापाशीं 'चौपाटी' म्हणून हुकूम सोडला; चौपाटीवर येतांच फिरून 'वाळकेश्वर' म्हणून सांगितलें, बाळाराम स्वतः यन्त्र झाल्यासारखाच शून्य मनानें (व मधून मधून झोंपेंत ) मोटार चालवीत होता. चौपाटीवरून वाळकेश्वर व परत चौपाटी अशा तीन फेऱ्या झाल्यानंतर मात्र

त्याला आपल्या ‘पासिंजरा’च्या आर्थिक शक्तीबद्दल शंका येऊं लागली ( आपण एकाच रस्त्यानें अनेक फेऱ्या मारल्या हें त्याच्या लक्षांत आलें नव्हतेंच ). पेट्रोलच्या एका पंपाजवळ गाडी थांबवून त्यानें मीटर जवळचा दिवा लावला व मागें तोंड करून खोलपणें म्हटलें,

‘बाई, साडेसात रुपये बिल झालंय, आतां पेट्रोल घ्यायला पैसे हवे आहेत—’

केसर अंधाराच्या कोपऱ्यांत जास्तच सरकून बसली,

‘पण–पण मजजवळ पैसे नाहींत–’ ती बारीक आवाजांत म्हणाली.

‘काय ? ’ भेसूरपणें बाळाराम ओरडला; पांढरपेशा वर्गाची असहाय तरुण स्त्री गुन्हा करून आपल्या ताब्यांत सांपडली आहे या जाणीवेनें त्याला विजयोन्माद चढला. ‘पैसे नाहींत ? आखी मुंबई हिंडलांत ! मोफतची मोटर वाटली काय ? ’

‘आरडाओरडा करूं नका–पोलिस !’ केसर हांसू दाबीत म्हणाली.

‘वा, चांगला न्याय आहे ! फुकटांत मोटर उडवून बाई मलाच पोलिसांची भीति दाखवते आहे ! पोलीस काय ? अच्छा ! चलाच मग चौकीवर ! ’

तावातावानें मोटर सुरू करून बाळाराम गांवदेवी पोलीस ठाण्याकडे वायुवेगानें निघाला. सात्विक संताप ओढूनताणून आणण्याची तो शिकस्त करीत होता. आतांपर्यंत लहानमोठ्या अपराधांबद्दल त्याला पोलीसठाण्यावर कमीपणा पत्करून जावें लागलें होतें, पण स्वतःची खरी व वरचढ बाजू घेऊन चौकीवर जाण्याची त्याच्या स्वप्नांतही कधीं नसलेली संधि आज त्याला मिळाली होती. या बाईनें बिनपैशांनीं आपली गाडी ताबडली या संतापापेक्षां रास्त तक्रार घेऊन पोलिसांत गुदरण्याचा मोका तिनें आणून दिला हा आसुरी आनंदच बाळारामाला जास्त होत होता. गांवदेवी पोलीस स्टेशनपुढें गाडी उभी करून गिऱ्हाइकाला उतरण्यास फर्मावून तिच्यासह तो कचेरींत गेला, व खुर्चीवर डोळे मिटून बसलेल्या अम्मलदाराला त्यानें आपल्या ठेवणींतल्या तक्रारी आवाजानें जागें केलें–तो त्याच्या माहितीचाच होता.

“जमादारसाहेब—ही बाई—”

ऑफिसांतल्या प्रकाशांत त्यानें ‘त्या बाई’च्या चेहऱ्याकडे पहिल्यानेंच पाहिलें—ताबडतोब त्याची अवस्था वर्लीला ऐन दुपारीं दोन ‘ट्यूबा’ एकदम बर्स्ट झालेल्या

गाडीसारखी झाली. भर क्वीन्सरोडवर आपल्याला बगल देऊन 'पास' होणाऱ्या गाडीशीं इरेस पेटून बेछूट शर्यत खेळावी आणि ती गाडी पोलीस कमिशनरचीच निघावी असें त्याला झालें.

पण तें फार थोडा वेळ; तो बारीकसारीक मनुष्य नव्हता; मुंबईत मुरलेला अस्सल टॅक्सीड्रायव्हर होता. कमिशनरच्या गाडीला धक्का दिल्यानतर आपली 'डिफरेंशिअल तुटली' अशी एखादी सबब त्यानें जितक्या सफाईनें सांगितली असती तितक्याच समयसूचकतेनें, जमादाराच्या 'कोण बाई ही? हिचें काय?' या प्रश्नाला त्यानें ताबडतोब उत्तर दिलें. तकारी चेहरा क्षणार्धात हंसरा करून तो म्हणाला:—

'ही बाई माझी बायको—आपली सून जमादारसाहेब! गाडींत घेऊन महा-लक्ष्मीला गेलो होतो, परत येतांना तुम्हांला पाहिलं—भेटवायला आणली! केसर, यांना नमस्कार कर......'

## ५. विषाची परीक्षा

"हॅलो यंग मॅन—"

लॅबोरेटरीबाहेर पडून जलद पावलांनीं जिन्याकडे जाणाऱ्या शिवनाथानें वळून पाहिलें. केमिस्ट्री–सेक्शनचे कुलगुरु डॉ. रामशरण यांच्या विशाल देहांतून तो आवाज निघाला होता.

"गुड मॉर्निंग सर," म्हणून शिवनाथ त्यांच्याजवळ गेला. डॉक्टर महाशयांनी त्याच्याशीं मोठ्या अगत्यानें हस्तांदोलन केलें.

"हंऽऽ—मग काय, तूं लवकरच आम्हांला दिसेनासा होणार?' त्यांनीं हांसत हांसत इंग्रजींत विचारलें. "आतां काय नोकरी, स्वतंत्र धंदा—कीं लॉच्या टर्म्स?" म्हणून डॉक्टरमजकूर आणखी जोरानें हांसले. शिवनाथानें स्मितपूर्वक त्यांच्या विनोदाचा गौरव केला. त्यांच्या प्रश्नांतली खोंच त्याला पटली. बी. एससी. होऊन एम्. बी. बी. एस., नंतर एम्. डी. व आतां कालच एम्. एससी. असा दुहेरी कोर्स साधून त्यानें पक्कें एक तप पुरें केलें होतें.

"मी इतक्यांतच कशाला सुरुवात करीन, असें वाटत नाहीं;" तो जरा गंभीरपणें म्हणाला. "मी आपल्याला एक विनंति करायलाच येणार होतों; लॅबोरेटरींत मला आणखी चार सहा महिने कांहीं संशोधन करायची परवानगी हवी होती."

"अजून? अच्छा, माझी कांहीं हरकत नाहीं. तुझ्यासारखे विद्यार्थी वर्षानुवर्षें लॅबोरेटरींत राहिले तरी कोणाची तक्रार निघायची नाहीं. मी तर म्हणतों तुझ्या-

सारख्या माणसानें निव्वळ पोट भरण्याच्या मागें लागूं नये. दहा पंधरा वर्षांनीं का होईना, मानवजातीला उपयोग होईल असं कांहीं संशोधन तूं करशील अशी माझी खात्री आहे. तूं कोणत्या विषयाला हात घालणार आहेस?"

"जरा धोकेखोर विषय आहे माझा–टॉक्सिकॉलिजी (विषशास्त्र)!"

"अरे बापरे! बोर्जिया होणार कीं काय तूं? कीं संस्थानांत शिरणार आहेस एकाद्या? माझ्यावर तेवढी कृपादृष्टि राहूं दे हो!" म्हणून डॉक्टरमजकुरांनीं हास्याचे कांहीं मजले चढवले.

"मानवजातीचीच कांहीं सेवा होईल अशी आशा आहे मला," शिवनाथ गंभीरपणें म्हणाला.

गुरुजींचा निरोप घेऊन तो जिना उतरूं लागला. अर्ध्या जिन्यावरच कावेरी आणि वसंत ही जोडी त्याला भेटली.

"कॉंग्रॅटस्!" दोघें एकदम म्हणालीं.

"थॅंक्स." म्हणून शिवनाथ थबकला.

"आतां समजलं तुम्ही इतके दुर्मिळ कां झालां होतां ते!" कावेरी म्हणाली. "फर्स्ट क्लाससाठीं, होय ना?"

"फर्स्ट क्लास हा नशिबावर आहे!" शिवनाथ हंसून म्हणाला. "एकदां कोर्स पुरा करून टाकायचा होता. आतां 'रूटीन' मधून सुटलों."

"पुढें?" वसन्तानें विचारलें.

"आणखी कांहीं दिवस 'रिसर्च' करायचा विचार आहे माझा."

"आणखी?" कावेरीनें आश्चर्यानें प्रश्न केला.

"हौसेसाठीं!"

"ही खूप हौस आहे बुवा! आपण तर एकदां बी. एससी. झाली म्हणजे शत-कृत्य केलं म्हणून लॅबोरेटरीमध्यें पाऊलसुद्धां टाकणार नाहीं." वसंत म्हणाला.

"तुझं ठीक आहे रे! तुला टेनिस आहे! कॉलेज हें आपलं एक शिक्क्या-साठीं—"

"आणि तुम्हांला?" कावेरीनें विचारलें, "या सगळ्या गोष्टी तुम्हांला कोणी नको म्हटलं आहे? पण तुम्हांला तासन्‌तास त्या लॅबोरेटरींत घोटाळायची हौस!"

## चोरबाजारांतील चिजा

"आहे खरं बुवा! टेस्टट्यूबमधल्या पाण्याला अमूक एक रंग आला, नाहींतर सोल्यूशनला असा एक वास आला तर ओव्हर बाउंडरी मारल्यासारखं वाटतं! मायक्रॉस्कोपखालीं हवं तें दिसलं म्हणजे इतका आनंद होतो, कीं तितका वसन्ताला पांच मिनिटांत एक मैल धावून मिळत नसेल!"

"नशीब—तुझ्यासारखी बुद्धी देवानं मला दिली नाहीं! मेहनतीनं अंगांतली रग जिरवण्यांतली मौज तुला कशी कळावी!" वसन्त उद्‌गारला.

"निदान माणसांचीं साधीं सुखदुःखं तरी आहेत कीं नाहींत तुम्हांला?" कावेरीनें मुद्दाम तिरकस नजरेनं पाहून विचारलें.

"तें उभ्याउभ्या सांगणं कठीण आहे." शिवनाथ हांसून म्हणाला, "हो—बरी आठवण झाली, मला तुमच्याशीं बरंच बोलायचं होतं."

वसंत उमगला व लायब्ररींत जाण्याबद्दल कांहीं गुणगुणून चालता झाला; आणि तास बुडवायचें ठरवून कावेरी निमूटपणें शिवनाथाबरोबर पायऱ्या उतरून इन्स्टिट्यूटच्या बाहेर पडली.

वॉटसन्स रेस्तोरांकडे जातांना कावेरी विचार करीत होती; वसंतांत आणि शिवनाथांत किती फरक आहे! कसलेल्या देहाचा, साध्याभोळ्या पण हांसऱ्या चेहऱ्याचा, दिलदार खेळाडू वसंत. जीवन म्हणजे त्याला एक मोठी मजा वाटे. त्याची वृत्ती सदा आनंदी. उलट, शिवनाथ म्हणजे थोडी धास्ती उत्पन्न करणारीच व्यक्ति; त्या गंभीर चेहऱ्यावर बुद्धिमत्तेचें केवढें तेज! पण बिनकाड्यांच्या चष्म्यामागल्या त्या भेदक घाऱ्या डोळ्यांना दृष्टी भिडवायची म्हणजे जरा कठीणच! स्वारी नेहमीं भविष्यकाळांत कांहीं शोधीत आहे अशी मुद्रा, हांसणें क्वचित; पण तें किती गोड आणि किती कठोर! हात एखाद्या बाईसारखे नाजुक, पण ती जबरदस्त हनुवटी आणि ती निर्दय जिवणी—या माणसाला मानवी भावना आहेत कीं नाहींत, अशी शंका कोणालाहि येईल. हा साधारण मनुष्य नव्हे, अद्वितीय—सगळ्यांच्या मधून एकाद्या प्रचंड शक्तीसारखा उठून दिसतो असा भास व्हायचा......

शिवनाथ विचार करीत होता. माणसाला एखाद्या लोकोत्तर कार्यासाठीं स्फूर्ति द्यायला एकादी अशी स्त्री पाहिजे. विचारवादी मनुष्याला हिची किती छान संगत होईल! शरीरसौष्ठवाला बुद्धीची जोड, खोटा नाजुकपणा नाहीं, खोटी मर्यादा

नाहीं. सौंदर्याच्या मागं लागून बुद्धीहि मंद झाली नाहीं, शिक्षणाच्या संस्कारानं प्रकृतीवरही परिणाम झाला नाहीं, समजूत देखील अगदीं बरोब्बर असली पाहिजे. ज्ञानाचा गौरव करावा हिनंच, बुद्धीला चालना हिच्याच सहानुभूतीनं मिळायची. सुधारलेल्या मनुष्यप्राण्याची आदर्श मादी !...

वॉटसनमध्यें टेबलावर चहा आल्यावर कावेरीनं विचारिलं, " कमला ' रिसर्च ' करणार आहांत तुम्हीं ?"

क्षणभर कांहींच उत्तर न देतां शिवनाथ गप्प बसला. नंतर तो हलक्या आवाजांत म्हणाला, " कावेरी, या सुधारलेल्या मानवजातींत स्त्रीपुरुषांना नुसत्या भावनांचं आकर्षण-पुरे आहे असं तुला वाटतं का ?"

" मला नाहीं समजलं—"

" समज, मनुष्य कांहीं असामान्य गोष्ट करायला निघाला, त्याला स्फूर्ति द्यायला त्याच्या तोडीच्या बुद्धीची स्त्री हवी असली, पण दोघांमध्यें भावना-ज्याला तुम्हीं प्रेम म्हणतां-ती नसली, तर ती जोड यशस्वी होईल कीं नाहीं ?'

" कसली असामान्य गोष्ट ?"

" क्षणभर असं समज, कीं मनुष्यजातीला धक्का देईल अशी गोष्ट-कायद्याच्या दृष्टीनं गुन्हा, पण मानवजातीच्या कल्याणाची गोष्ट-"

"आधीं भावना असली, तर स्त्री आपल्या प्रियकराचा वाटेल तो गुन्हा माफ करील."

"भावनेशिवाय जोडी जमणार नाहीं, जोडी जमली नाहीं तर, स्फूर्ति नसली तर लोकोत्तर कृत्य नाहीं." अर्धवट स्वतःशींच शिवनाथ बोलत होता.

"आज तुम्हीं कसली भाषा बोलतां आहां ?"

"ही शास्त्रज्ञाची भाषा आहे, सामान्य माणसाची नाहीं. मला भावना नाहींत—मी सामान्य मनुष्य नाहीं, पण माझ्या डोक्यांत एक कल्पना घोळते आहे तिच्याबद्दल तुझ्याशीं चर्चा करायची होती. मला तुला एक प्रश्न विचारायचा होता. त्याच्या उत्तरावर माझं धोरण अवलंबून होतं—"

" तो प्रश्न सहा महिन्यांनीं विचारा म्हणून मीं सांगितलं तर तुमच्या धोरणाला कांहीं उपयोग होईल का ?"

चोरबाजारांतील विजा

" पुष्कळ होईल, पुष्कळ होईल ! ठरला माझा विचार ! "

" मग तो मला सांगा आतां—"

" सांगण्यासारखा नाहीं, नुसती कल्पना देतों. माझा ' रिसर्च ' एका औषधा-साठीं आहे. त्यानें मानवजातीचं अपरिमित कल्याण होणार आहे; पण कायद्याच्या दृष्टीनें मी करणार तो भयंकर गुन्हा ठरेल. मी समाजाचं कल्याण करीन; पण समाजाचा शत्रु ठरेन. "

" मला कांहींच बोध होत नाहीं. "

" बोध झाला तर तूं मला हवं तें उत्तर देशीलच असा भरंवसा नाहीं. नुसत्या त्या उत्तराच्या आशेवरच मला स्फूर्ति मिळाली आहे. "

" सहा महिन्यांत माझी भावना जागृत होईल हा तरी भरंवसा काय ? "

" मला भावना नको आहे, बौद्धिक साहचर्याची तयारी पाहिजे."

कावेरी कांहींच बोलली नाहीं. ती भांबावून गेली होती—पण कोणत्याही मानसिक कारणानें नाहीं–आतांच्या संभाषणानें तिच्या डोक्यांत सगळा घोंटाळा माजला होता..

रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें शिवनाथाचं संशोधन जवळ जवळ चार महिने चाललें होतें. एम्. डी. व एम्. एससी. च्या कोर्सेसमधून त्याला आपल्या विषयाचें पूर्ण ज्ञान झालें होतें. मधून मधून तो हाफकीन्स इन्स्टिट्यूटमध्येंहि जात असे. त्याच्या कामाची माहिती एका अक्षरानें कोणाला मिळाली नाहीं. त्याच्या प्रयोगानंतर तो काळजीपूर्वक सर्व उपकरणें धुवून ठेवीत असे. ते प्रयोग एकांतांत चालत त्यांचीं, टांचणेंहि गुप्त असत. चार महिन्यांनीं तो इन्स्टिट्यूटमध्यें येण्याचा बंद झाला.

परेल व्हिलेजमध्यें एका बाजूच्या घरांत त्यानें जागा घेतली होती व तेथेंही त्याची एक प्रयोगशाळा होती. इन्स्टिट्यूटमध्यें काढलेल्या अनुमानावर तो अनेक प्रयोग करीत होता.

यातनेशिवाय पण ताबडतोब प्राण घेईल आणि घेणाऱ्याच्या शरीरांत कोणत्याहि प्रकारचा पुरावा शिल्लक न ठेवील, असें विष मोठ्या प्रमाणावर बनविण्याची भट्टी त्यानें रात्रंदिवस चालविली होती.

एके दिवशीं तो नाहींसा झाला. त्याची सांपत्तिक स्थिति चांगली होती. तो एकटाच होता. नेहमीं भेटणारे स्नेहीसोबती त्याला कोणी नव्हते, नातेवाईक तर मुळींच नव्हते. घरमालकाला तीन महिन्यांचें आगाऊ भाडें देऊन प्रवासाला म्हणून तो निघून गेला.

शिवनाथ जागा सोडून गेल्यावर सुमारें एक महिन्यानें वर्तमानपत्रांत एक बारीकशी बातमी आली, कीं काशीच्या भिकाऱ्यांत कांहींतरी रोगाची सांथ आली असून त्यांची मृत्युसंख्या वाढत्या प्रमाणावर आहे.

एक आठवड्याच्या आंत जास्त तपशील प्रसिद्ध झाला. मरणारे भिकारी बहुतेक महारोगी होते. मृत्युसंख्या वाढत्या प्रमाणांत होती. मेडिकल डिपार्टमेंटची चौकशी सुरू झाली होती.

पंधरा दिवसांतच जाड शीर्षकांत 'काशी येथील भिकाऱ्यांच्या भयंकर मृत्यु-संख्येबद्दल' खळबळ उडविणाऱ्या तारा वर्तमानपत्रांतून येऊं लागल्या. साडेसात हजार महारोगी सांथीला बळी पडले होते; शिवाय असाध्य रोगावस्थेंतले लुले व मरणोन्मुख असे आणखी साडेपांच हजार भिकारी मेले होते. मेडिकल खातें रोगाचें निदान करीत नव्हतें. गांवांतील इतर डॉक्टरसेही 'अकस्मात् हृदयक्रिया बंद पडून मृत्यु' याशिवाय दुसरें मत देण्यास धजावत नव्हते. मुंबईहून तज्ज्ञांची एक कमिटी बनारसला रवाना झाली. ज्ञातजगाच्या इतिहासांत, काशीला एकही भिकारी नाहीं ही गोष्ट पहिल्यानें घडली. हजारों प्रेतांची चिरफाड झाली, पण रोगाचा कांहीं एक पत्ता लागला नाहीं.

तीन दिवसांनीं प्रयागहून हुबेहूब काशीप्रमाणेंच प्रकार घडल्याचें जाहीर झालें. रोगी भिकाऱ्यांच्या धांवपळीमुळें येथील आंकडा तीन हजाराच्या वर गेला नाहीं. लगेच मथुरेला दोन हजार बळी पडल्याची बातमी आली. संयुक्तप्रांतांत खेडोपाडीं भिकाऱ्यांचा बेसुमार सुळसुळाट झाला. हरिद्वारचे साडेसातशें भिकारी मेले हें कळल्यावर गंगाजीच्या कांठच्या एकाही क्षेत्रांत भिकारी राहिले नाहींत. एका धूर्त समाजसेवकानें जाहीर केलें कीं, रोगी लोक तीर्थांना अपवित्र करतात म्हणून गंगा-जीचा कोप झाला आहे. कोणी सुचविलें कीं, उघड्यावर पडणाऱ्या रोग्यांना हवें-

तूनच कांहीं सांथ येऊन मारून जाते. भिकाऱ्यांचें पेंढार सबंध उत्तर हिंदुस्थानभर मोकाट सुटलें. दिल्ली व संयुक्त प्रांत येथील सरकारनीं वटहुकूम काढून भीक मागणें हा गुन्हा ठरविला व असल्या गुन्हेगारांसाठीं खास तुरुंगवजा छावण्या उभ्या करण्यांत आल्या.

ही सांथ आली ही एक प्रकारें देवाची कृपाच होय, असें देशांतल्या बहुतेक डॉक्टरांनीं जाहीर केलें; त्याचा जैन लोकांनीं सभा भरवून तीव्र निषेध केला. महात्मा गांधी, शर्माजी, देशदास रानडे व केलप्पन यांची उपासाची शर्यत लागली. कॉंग्रेसनें या सांथींत सरकारचा हात असल्याचा संशय प्रकट केला व बेकारीवर असा उपाय योजल्याबद्दल सरकारविरुद्ध चळवळ चालू केली. या संधीचा फायदा घेऊन १९३१ पासून रिकाम्या असलेल्या बऱ्याच देशभक्तांनीं भिक्षा-सत्याग्रह सुरू केला. मवाळांनीं या सत्याग्रहाला आपली सहानुभूति पहिल्यापासूनच होती हें जाहीर केलें.

हें चालू असतां रामेश्वर, मदुरा व कुंभकोणम् येथील एकंदर नऊ हजार रोगट भिकारी पंधरा दिवसांत नव्या सांथीला बळी पडले. नंतरच्या आठवड्यांत द्वारका-डाकूरच्या बाजूला, फेरा येऊन दोन चार हजार लोक दगावले. लगेच चार दिवसांनीं जगन्नाथपुरीला अठराशें भिकारी मृत्यु पावले.

या हाहाःकारांत मुंबईच्या एका पोलीस ऑफिसरच्या डोक्यांत एक कल्पना आली. त्यानें काशीपासून सुरुवात केली व प्रत्येक क्षेत्रांत चौकशी चालविली, कीं मरणाच्या आधीं या भिकाऱ्यांनीं काय केलें होतें ? प्रयागला त्याला समजलें, कीं भिकारी मरण्याआधीं सुमारें बारा तास कोणी धर्मात्मा तेथें येऊन त्यानें सर्वांना मिठाई वाटली होती. मथुरेला त्याला नक्की समजलें, कीं मिठाई खाल्ल्यानेंच भिकारी मेले. कारण एका रोग्याच्या भिक्षापात्रांतला पेढा चोरून खाणारा एक उचल्या, त्याच रात्रीं एका यात्रेकरूबाईचा दागिना ओढतां ओढतां मरून पडला होता. मथुरेला त्याला माहिती मिळाली, कीं तेथील सांथ सुरू होण्याच्या आधीं एका सेठियानें पेढ्यांची मोठी ऑर्डर स्थानिक हलवायाला दिली होती. मिठाई चारून महारोगी मारणाऱ्या या व्यक्तीचें पुरें वर्णन मिळेपर्यंत पंढरपूर व तुळजापूर येथें साडेबाराशें असाध्यरोगी कामास आले. पण पोलीस अधिकाऱ्यांच्या अंदाजाप्रमाणें संशयित

मनुष्य नाशिक येथें आला व त्यानें घाटावर दोन मण पेढ्यांची खैरात केल्यानंतर त्याच्या मागोमाग जाऊन ऑफिसरनें त्याला पकडलें.

बादशहा वि. डॉ. शिवनाथ हा खटला मानवजातीच्या इतिहासांत 'पायलेट' पुढील खिस्ताच्या खटल्याच्या खालोखाल महत्त्वाचा आहे, असें 'न्यूयॉर्क अमेरिकन' या पत्रानें म्हटलें आहे. जगांतील सर्व सुधारलेल्या देशांचे पत्रपंडित हिंदुस्थानांत विमानानें आलेले होते. गर्दीच्या कल्पनेनें मुंबईच्या टाउन हॉलमध्यें कोर्ट बसलें होतें. ओरिजिनल साइडला चीफ जस्टिस स्वतः बसण्याचा हा पहिलाच प्रसंग. सबंध खटला 'ब्रॉडकास्ट' करण्याची सोय एका अमेरिकन कंपनीनें केली होती. आरोपीच्या बचावाकरितां अमेरिकन मेडिकल असोसिएशननें एक लक्ष डॉलर्स देऊं केलेले डॉक्टर शिवनाथ यांनीं साभार नाकारले. इतकेंच नव्हे, तर बचावासाठीं येथील व परदेशांतील सुमारें तीस सुप्रसिद्ध बॅरिस्टर पुढें आले असतां आरोपीनें स्वतः बचाव करणार असें जाहीर केलें.

संतापलेल्या अहिंसावादी जैन लोकांनी त्याची लचकेतोड ( Lynching ) करूं नये म्हणून आरोपीला पोलीसचें पूर्ण संरक्षण होतें. त्याला सरहद्दीपलीकडच्या मुसलमानांचें मानपत्र देण्यास सरकारनें हरकत घेतली म्हणून मुसलमानांनीं कोर्टावर कडक बहिष्कार टाकला होता. ज्यूरीमध्यें तीन शास्त्रज्ञ, तीन डॉक्टर, तीन वकील व तीन प्रोफेसर होते.

रीतसर खटला सुरू होऊन बादशाहांच्या सुमारें पस्तीस हजार प्रजाजनांचा अमानुषपणें खून करण्याचा आरोप आरोपीवर ठेवण्यांत आला. आपण निर्दोषी आहोंत असें आरोपीनें सांगितलें. ॲडव्होकेट जनरल यांनीं सरकारच्या बाजूनें फार समतोल भाषण केलें. ते म्हणाले, "सुधारलेल्या जगाची सहानुभूति, हिंदुस्थानच्या पस्तीस कोटी प्रजेंत पस्तीस हजार रोगट व निरुपयोगी भिकाऱ्यांचा नाश करून समाजाची कीड मारणें हा आरोपीचा अत्यंत थोर हेतु या गोष्टी, ज्यूरींतील सभ्य गृहस्थहो, आपल्याला हिशेबांत धरतां येत नाहींत. हत्त्येच्या सेक्शनमध्यें, कायद्याच्या व्याख्येंत, हा गुन्हा बसतो कीं नाहीं एवढेंच आपल्याला पाहावयाचें आहे. मनुष्यजातीवर आरोपीचे फार उपकार असतील; पण सरकारचा तो गुन्हेगार आहे. इतक्या लोकोत्तर व्यक्तीला कायद्याच्या तीव्रतम शासनाला पात्र ठरवणें हा रानटी-

पणा आहे हें मीं कबूल करतों. पण आरोपीच्या भयंकर मार्गांकडे आपण दुर्लक्ष केलें, किंबहुना, आरोपीच्या सोईसाठीं सरकारानें एकवेळ कायदा बाजूला केला, तर इतर उलट्या काळजाच्या भयंकर बदमाषांकडून असल्या सवलतींचा दुरुपयोग होणें असंभवनीय नाहीं. म्हणून मला माझें कर्तव्य केलें पाहिजे व आपणही तसेंच करावें ही माझी विनंति आहे. ”

आरोपीनें बचावादाखल अगदीं लहानसें भाषण केलें, “ न्यायमूर्ति व ज्यूरींतील सभ्य गृहस्थहो, आज जी गोष्ट गुन्हा ठरते, तीच कालांतरानें कायद्यांत समाविष्ट होते. गॅलिलियोनें लावलेल्या शोधामुळें त्याला जिवंत जाळण्याची वेळ आणणारा सामाजिक कायदाच कांहीं दिवसांनीं त्यांचीं तत्त्वें मान्य करूं लागला. न्याय हा रूढ नीतितत्त्वांवर अधिष्ठित आहे व नीतितत्त्वें समाजयंत्राच्या सोईसाठीं असतात. व्यक्तीचा कुजलेला अवयव कापून टाकणारा न्याय समाजाचा कुजलेला भाग कापूं देत नाहीं; कारण सध्यां न्यायाचें सिंहासन पुराणकालीन आहे, तो नवी नीति ओळखीत नाहीं. एकवट झालेलाच समाज न्यायाला नवीन तत्त्वांवर स्थापन करील.

“ जोंपर्यंत माझा देश अशिक्षित, असंस्कृत, रानटी, परतंत्र आहे तोंपर्यंत माझ्या समाजांत एकी होण्याची आशा नाहीं. एकी झाल्याशिवाय न्यायाचें अधिष्ठान आधुनिक नीतिवर होणें शक्य नाहीं व तोंपर्यंत आपली सर्वांची कर्तव्यनिष्ठा रूढ न्यायतंत्राप्रमाणेंच माझ्या आरोपाचा विचार करण्यास आपल्याला भाग पाडील. आपलीं खाजगी नीतिविषयक मतें वेगळीं व कायदेशीर नीति वेगळी हें आपण जाणून आहांच. अशा परिस्थितींत चालू कायदा किती गैरलागू आहे हेंही मनांतल्या मनांत आपल्याला पटलें आहे. पण तो कायदा लागू करण्यास आपण बांधलेले आहांत व त्याचें शासन भोगण्यास मीही बांधलेला आहें. माझ्या सदसद्विवेक बुद्धीचें समाधान झालें आहे. मीं मानवजातीची योग्य ती सेवाच केली आहे. यानंतर आपण द्याल तो निर्णय व फर्मावाल ती शिक्षा मी आनंदानें मान्य करीन.

ज्यूरीचा बहुसंख्यांक निर्णय ( ८ वि. ४ ) दोषी असा ठरला व त्यांनीं दयेची शिफारस केली. न्यायमूर्तींनीं आपल्या विद्वत्ताप्रचुर निकालांत बरींच तत्त्वें प्रतिपादन केलीं होतीं. उदाहरणार्थ, समाजाच्या बदलत्या विचारांबरोबर कायदा बदलणें किती धोक्याचें आहे, मानवी जीविताचें पावित्र्य किती आहे, कायद्याच्या दृष्टीनें सर्व लोक कसे सारखे आहेत इ. इ. इ.

त्यांनीं डॉ. शिवनाथ यांना फांशीची शिक्षा फर्माविली.

यानंतर खटल्यांतील सर्वांत चमत्कारिक प्रकार घडला. आरोपीनें दोन शब्द बोलण्याची परवानगी मागितली. ती मिळाल्यावर, त्यानें सांगितलें, "मला ही अपेक्षा होतीच. फांसापेक्षां सोपा मृत्यू मजजवळ आहे. माझ्या दाढेंत भयंकर जालीम विष असलेली एक कांचेची पोकळ गोळी आहे, ती मी आतां चावीत आहें. माझें प्रेत कृपा करून माझ्या भावाच्या स्वाधीन करणें." असें बोलतां बोलतांच आरोपी खालीं पडला. कोर्टातील दोघां डॉक्टरांनीं धांवून त्याचें काळीज तपासलें. तें बंद पडलें होतें. त्याचें प्रेत त्याचा भाऊ म्हणून पुढें आलेल्या माणसाच्या स्वाधीन करण्यांत आलें.

शिवनाथाच्या खटल्यानंतर एक वर्ष उलटलें होतें. कावेरी रेक्रमेशनवरून फिरून आपल्या घरीं परत आली होती. वाटेंत आपल्या पाठोपाठ कोणी माणुस येतो आहे असें तिला दोन तीनदां वाटलें; पण असा अनुभव तिला कांहीं नवीन नव्हता. त्यामुळें ती घाबरली नाहीं. फार तर हा प्राणी घरापर्यंत येईल व आपल्या पायरीवर एकदोन उष्ण सुस्कारे टाकून रस्त्याला लागेल, अशी तिची कल्पना होती. घरांत शिरल्यावर दिवा लावून ती कपडे बदलायला लागणार इतक्यांत घंटा वाजली. दार उघडून पहाते तों तिच्या मागोमाग येणारा मनुष्य.

"कोण पाहिजे तुम्हांला?" तिनें न घाबरतां पूर्ण निर्विकारपणें विचारलें.

त्या माणसाच्या चेहऱ्यावर ओळख असल्यासारखें स्मित होतें. त्याचे कपडे सभ्य माणसाचे व तो बोलला तेव्हां त्याचा आवाज सुसंस्कृत माणसाचा होता.

"मी तुमच्याकडेच आलों आहें—मिस् कावेरी किल्लेदार."

तिनें तोंडाशीं आलेले कांहीं शब्द दाबले; ती नुसतेंच म्हणाली,

"या, आंत बसा."

तो मनुष्य एका खुर्चीवर बसला, ती त्याच्यासमोर बसली.

"काय काम आहे तुमचं?"

"मी माझी ओळख देण्याआधीं एक विचारतों,—माफ करा, तुम्हीं घाबरणार नाहीं ना?"

" तें कां म्हणून ? "

" तुम्ही पोलीसला बोलावणार नाहींना ? "

" कशाला ? हे फाय चमत्कारिक प्रश्न ? "

" कारण आहे त्याला. मी कोण हें कळलं तर माझं जीवित तुमच्या हातांत राहील, तुम्हीं माझं रक्षण केलें पाहिजे."

हा मनुष्य वेडा तर नाहीं. या मुद्रेनें तिनं त्याच्याकडे पाहिलं.

" बरं. " ती म्हणाली.

" मी डॉक्टर शिवनाथ—"

" काय ? "

" होय मी डॉक्टर शिवनाथ. कोणी ऐकणार नाहीं ना ? कावेरी, घाबरूं नको, मी वेडा नाहीं. "

तो हलक्या आवाजांत म्हणाला,—" मी रसायनांनीं रूप बदलून टाकलं आहे. ' पिगमेंटेशन ' ( रंग ) इंजेक्ट करून कांति बदलली, ' लिगॅमेंटस् 'मध्यें टोंचून घेऊन हातापायांचे घाट व उंची बदलली, डोळ्यांच्या रंगासाठीं इंजेक्शन्स घेतलीं. केस पेरॉक्साइडनें भुरके केले, कांहीं दांत पाडून वेगळे बसवले. नाकाचा आकार ऑपरेशननें बदलला व तोंडावर खाणाखुणा खोदून घेतल्या. आल्कलीनं आवाज देखील बदलून घेतला. आतां डॉ. शिवनाथ ही व्यक्ती जाऊन हरिहर ही व्यक्ती निर्माण झाली आहे—"

" त्याच्यावर माझा विश्वास बसेल अशी आपली समजूत आहे ? आपला वेळ फुकट घालवूं नका-"

" कावेरी, थांब, तुला पहिल्यानं ओळख देतों. वॉटसनमध्यें सहा महिन्यांनीं मी तुला एक प्रश्न विचारणार होतों. एका लोकोत्तर कार्याला तुझी स्फूर्ति पाहिजे होती. "

" पण डॉक्टर शिवनाथ कोर्टांत मेले, त्यांचें प्रेत कोणी घेऊन गेला—"

" तो माझा साथीदार; मीं चावलेल्या कॅप्सूलमध्यें ' हार्ट ' बंद करण्याचं एक ड्रग होतं. माझं ' प्रेत ' लॉरींत घालून तो सरळ माझ्या जुन्या लॅबोरेटरींत घेऊन

गेला; तेथें 'ॲड्रीनालीन'चें इंजेक्शन देऊन व विजेचे धक्के देऊन त्यानें मला शुद्धीवर आणलें. रातोरात वेष पालटून त्या लॉरीनेंच आम्ही दक्षिणेकडे गेलों. मी रूपांतले सगळे फेरफार पाँडिचेरीला राहून केले आणि आतां तुला बारा महिने उशिरा तो प्रश्न विचारायला आलों आहें."

"वेळ गेली." तिनें निर्विकारपणें उत्तर दिलं.

"वेळेवर विचारलं नाहीं म्हणून?"

"नाहीं, प्रश्न वेळेवर विचारला असतात तरी तुमची निराशाच झाली असती."

"कां?"

"मला बौद्धिक साहचर्याची कल्पनाच चमत्कारिक वाटली. तुम्ही भयानक बुद्धिमत्तेचे, तुम्हांला भावना नाहींत, असं तुम्हींच सांगितलंत. स्त्रीबद्दल तुमची दृष्टि प्राणिशास्त्रज्ञाची. मीं तुम्हांला सहा महिने माणसळण्यासाठीं दिले. तुम्हीं तुमच्या दृष्टीनें लोकोत्तर कार्य केलंत; पण माणसांत राहिलां नाहींत. माझ्या भावना, सुख-दुःखं, आवडीनिवडी, दुबळेपणा सगळीं मानवीच होतीं. विद्येनें, ज्ञानानें माझा मनुष्यपणा थोडा देखील कमी झाला नाहीं—"

"मग तुझं ध्येय काय? तू काय करणार?" शिवनाथानें आजूबाजूला पहात विचारलें. "हें घर कोणाचं? तूं इथें केव्हां रहायला आलीस?"

"मी वसंताशीं लग्न केलं." तिनें एका वाक्यांत सर्व उत्तरें दिलीं. क्षणभर तो स्तब्ध राहिला.

"कावेरी, तूं सुखी आहेस का? या आयुष्यांत तुला कोणतं 'इन्टरेस्ट' आहे?"

आंतून जाग्या झालेल्या बाळाला ती बाहेर घेऊन आली.

"मी पूर्ण सुखी आहे. माझे वसंत नि माझा बाळ हेंच माझं इन्टरेस्ट."

एक सुस्कारा टाकून तो उठला व हळूहळू बाहेर पडून अंधारांत दिसेनासा झाला.

## ६. स्वार्थ आणि त्याग

मी आपल्यापासून पुष्कळ दिवस दूर रहाण्याचा हा पहिलाच प्रसंग. लग्नाला दहा वर्षे झालीं, पण सातआठ दिवसांच्यावर आपण एकमेकांपासून दूर कधीं राहिलों नव्हतों. मला पहिल्यानें अगदीं पोरक्या मुलांसारखें वाटलें! आपल्यालाहि जड गेलें असेल. होय ना? पण नवराबायकोनीं मधून मधून कांहीं दिवस तरी दूर रहावें असें मला वाटतें; परस्पराकडे पाहण्याची त्यांना वेगळी दृष्टी मिळते. लिहिण्यापुरता तरी बायकांचा संकोच कमी होतो व आपसांतल्या एकाद्या विषयाबद्दल निर्विकारपणें चर्चा करतां येते. (मी इतकी विदुषी केव्हां झालें असें आपल्याला वाटत असेल, नाहीं?)

ही सगळी प्रस्तावना करण्याचें कारण मी आपल्याला माझें एक गुपित सांगणार आहें. आपण मधून मधून मला विचारीत असतां कीं, 'एखादे वेळीं तूं इतकी खिन्न कां दिसतेस, तुझे विचार कुठें गेलेले असतात, तुझ्या मनांत काय चाललेलें असतें, तुला कांहीं त्रास होतो का? तुझ्या सुखाला बाध आणणारी एकादी गोष्ट आहे का?' मी 'कांहीं नाहीं, उगीच—' म्हणून नेहमीं वेळ मारून नेत आलें; पण आतां मीं आपल्याला सांगायचें ठरवलें आहे. इतके दिवस मला नीटसें सांगतां येत नाहीं म्हणून गप्प बसत होतें. लिहून मला काय वाटतें तें स्पष्ट करतां येईल म्हणून हा प्रयत्न करीत आहें. (मला आपण हंसायचें नाहीं, बरें का?)

मला त्रास कसलाही होत नाहीं, माझ्या सुखाला बाध येईल अशी गोष्ट मोठीशी कांहीं नाहीं. एवढे आपण जवळ असतांना मला कसला आला आहे त्रास आणि

माझ्या सुखाला कोणता बाध येणार ? माझ्यासारखी भाग्यवान मींच म्हणून आपल्या पायांशीं मला जागा मिळाली. आज दहा वर्षें आपण मला एक अक्षरही कठोर बोललां नाहींत, सांभाळून घेतलीत, ममतेनें वागवलीत, माझें कौतुक केलेंत, आपल्याजवळ जगांत निवाऱ्याची केवढी जागा आहे, ही जाणीव मला आणून दिलीत. मला दुःख कसलें असणार ?–तसें पाहिलें तर अगदीं जुनी व आपल्याला क्षुल्लक वाटेल अशी गोष्ट आहे. पण एकदां मनांतलें सगळें साफ बोलून दाखविल्या-खेरीज मला चैन पडत नाहीं; आणि अगदीं क्षुल्लक कां होईनात, मनांतल्या गोष्टी आपल्याजवळ सांगायच्या नाहींत तर कोणाजवळ ?

पण माझा पाल्हाळ फार वाढला; आतां सुरवातच करतें.

आपण मला पदरांत घेतलीत तेव्हांपासून एका शब्दानें देखील माझ्या माहेरच्या माणसांबद्दल आपण उल्लेख केला नाहीं. आपला उदार स्वभाव मला माहीत आहे व त्यावरून मी कयास बांधतें, कीं माझ्या माहेरचें कांहीं तरी गूढ आहे अशी अस्पष्ट कल्पना आपल्याला असूनही मला न दुखविण्याच्या हेतूनें आपण तो विषय टाळलात. ( मला याबद्दल किती धन्य वाटतें म्हणून सांगूं ! ) माझ्या चुलत चुलत्यांनीं मला थोडेंबहुत वागवून नंतर आपल्या पदरांत टाकली व पोरकी मुलगी म्हणून आपण मला करून घेतलीत. आज मी माझ्या माहेरचें गूढ उकलणार आहें. पुन्हां एकदां सांगतें, कीं यांत असंतोषाचा भाग कांहीं नाहीं. आपण माझें सर्वस्व म्हणून आपल्याजवळ अंतःकरण खुलें करीत आहें.

आमच्या कुटुंबांत घडलेला प्रकार ‘भावबन्धन’ नाटकाशीं इतका पटतो कीं त्या नाटकांतलीं नांवें या प्रकारांतल्या व्यक्तींना देणार आहें. त्यांतून आपण मला मालती नांव दिलेलेंच आहे, व आपणही या सर्व प्रकारापासून इतके अलिप्त आहां, कीं ‘भावबंधनां’तले मनोहर होण्यास आपल्याला कांहीं हरकत नाहीं ! तेव्हां ताईचें नांव लतिका, कै. बाबांचें धुंडिराज, व ताईच्या यजमानांचें–घनःश्याम.

आमची आई आम्हांला सोडून गेली तेव्हां मी व ताई नुकत्या साडी नेसायला लागलों होतों. आतां देवाकडे गेलेला माझा धाकटा भाऊ मधु तर बोलायला देखील लागला नव्हता. बाबांना नोकरी सिंगापूरला; त्यांच्याजवळ राहिलों तर

आमचें कोण करणार ? तेव्हां बाबांच्या ओळखीच्या एका शेठियानें मध्यस्थी करून आमची मुंबईच्या वनिता विश्राममध्यें राहण्याची व शिकण्याची सोय केली. दोन तीन वर्षांत आम्हीं तिथें रुळलों. लहानग्या मधूचें सगळया मुली कौतुक करायच्या; ताई फारच सुंदर व तडफदार दिसत होती म्हणून तिचेंही आजुबाजूची मंडळी लाड करायची व मी तिची धाकटी बहीण म्हणून मलाही चांगलें वागवायची. सहानुभूति व कौतुक या गोष्टी ताईला चांगल्याच मानवल्या; पण मी मात्र संथ, घुमी, अबोल व एकमार्गी ठरलें. ( अशी कुजबुज नंतर माझ्या कानांवर पडली. )

आणखी कांहीं दिवस गेले. ताई मॅट्रिक होऊन विल्सन कॉलेजांत जाऊं लागली. मधू शाळेंत जाऊं लागला व मीही एकदोन इयत्ता वर चढलें. कॉलेजमधेंही ताईनें सगळीकडे छाप पाडली. सुंदर आणि हुषार मुलगी म्हणून तिची ख्याती झाली. ( आणि तिची बहीण म्हणून माझी ! ) या दिवसांत ताईच्या बरोबर प्रभाकर म्हणून बाबांच्या एका स्नेह्याचा मुलगा होता; त्याची आमच्याशीं विशेष ओळख झाली. विशेषतः, ताईबरोबर त्याचें जाणेंयेणें जास्त होऊं लागलें. लोकांत कुजबुजही सुरू झाली, पण ताईबद्दल मी केव्हांही खात्री देईन–ती मर्यादा सोडून कधींही वागली नाहीं. प्रभाकराबरोबर लग्न तिला नको होतें असें नाहीं, पण तें झालें हें गृहीत धरण्याइतकी लेचीपेची ती नव्हती.

याप्रमाणें सगळें व्यवस्थित चाललें होतें. बाबांचीं खुशालीचीं पत्रें व पैसे नियमानें यायचे. आम्हीं तरुण झालों, ही त्यांना अंधुक कल्पना आली होती. मध्यंतरीं ते आम्हांला भेटूनही गेले होते; पण आमचें पुढें काय व्हायचें, शिक्षण पुरें व्हायचें कीं लग्नें व्हायचीं–कीं दोन्ही–या गोष्टींचा विचार आम्हां कोणाच्या डोक्यांतही नव्हता. आणि अशा या संथ कार्यक्रमामध्यें एकाएकीं उल्कापात झाल्यासारखें झालें. आणि सिंगापूरहून बाबांचें एक लांबलचक पत्र आलें. पत्र आम्हां दोघांनाही उद्देशून लिहिलें होतें ( तें पत्र ताईनें जिवापाड जपून ठेवलें आहे; ती आपल्या तिखट स्वभावाला अनुसरून त्याला आपल्या 'लग्नाचें बक्षीसपत्र' म्हणते. ) त्या पत्रांतला भयंकर मजकूर वाचून आम्हीं १।२ दिवस अगदीं बावरून गेलों. बाबांनीं लिहिलें होतें कीं 'घनःश्याम नांवाच्या माणसानें माझ्या कांहीं खोट्या कागदावर सह्या घेऊन मला गोत्यांत आणलें आहे. माझ्याजवळचा थोडाबहुत पैसा

तर त्यानें शोषून घेतलाच आहे, पण तुम्ही दोघी फार सुंदर आहांत हें ऐकल्या-वरून त्यानें अशी अट घातली आहे, कीं मला आपली एक मुलगी द्याल तर तुम्हांला सोडवतों. तुम्हां दोघींना आपल्या म्हाताऱ्या बापाच्या जीवाची व अब्रूची चाड असेल तर तुम्हां दोघींपैकीं एकीनें या राक्षसाच्या तावडींतून मला सोडविलें पाहिजे. नाहींतर–दुसरा कांहींच मार्ग नाहीं !'

पन्नास वेळां हें पत्र वाचून एकमेकींशीं कांहीं न बोलतां आम्ही शून्य मनानें सैरावैरा हिंडत होतों. प्रभाकराची ताईला सहानुभूति होतीच. मला मात्र एकटी पडल्यासारखें वाटत होतें.

विचारा मधू–तो तर अगदीं बावरून गेला होता. त्याचें सर्व करायची मीं, पण त्याला लळा ताईचा. पहिल्यानें तिचें लक्ष त्याच्याकडे राहिलें नाहीं. नंतर मात्र मुद्दाम केल्यासारखें ती त्याचें सगळें करूं लागली, त्याचे जास्त लाड करूं लागली, त्याला आपल्याजवळून दूर ठेवीनाशी झाली. मला जास्तच एकटी पडल्यासारखें झालें; आईची आठवण होऊन मी रडूं लागलें. प्रभाकराचीं व ताईचीं कांहीं खल-बतें चालूं लागलीं. ज्या मुख्य प्रश्नाचा सोक्षमोक्ष लावायचा तो टाळून आम्ही सगळे नाटक करीत होतों; पण ताईच्या व प्रभाकराच्या वागणुकीनें मला वाटायला लागलें कीं–मींच ! माझ्यावरच तो प्रसंग येणार, कुटुंबाच्या इभ्रतीसाठीं मलाच माझा बळी द्यावा लागणार. कारण मी दुसरी मुलगी, धाकटी, बुद्धीची मंद, रूपानें कमी, मला पाश नाहींत ( प्रभाकरासारखे ), मधूला लळा ताईचाच जास्त–या सर्व गोष्टींनीं वेढल्यावर मला स्वतःचें मत उभें करायला जागाच नव्हती. माझ्याकडे रोखलेल्या या सर्व भाल्यांच्या टोंकावर उचलली जाऊन मीं त्या राक्षसाच्या पुढ्यांत पडायची, हें ठरल्यासारखेंच झालें होतें आणि सर्व तसेंच झालें असतें, पण—

आपण थट्टेनें नेहमीं स्त्रीजातीचा अहंकार ( Vanity ) व बायकांची वांक-ड्यांत शिरण्याची नैसर्गिक प्रवृत्ति ( Perversity ) असे शब्द वापरतां; तेव्हां घडलेल्या गोष्टींची आठवण केली, कीं मला आपले शब्द पटूं लागतात. जन्मभर गरीब आणि सरळ अशी माझी ख्याती, पण त्यावेळीं स्त्रीजातीच्या या गुणांमुळेंच मी उलटलें. ( सुदैव, कारण आपली सेवा मला लाभायची होती. ) बाबांची पुन्हां

तांतडीची तार आली, कांहींतरी ठरविण्याखेरीज इलाजच नव्हता. 'मीं जातें' असे शब्द माझ्या ओंठाशीं आले होते; मी आपण होऊन ताईला सांगायला निघालें, इतक्यांत तीच माझ्याकडे आली आणि म्हणाली,

"मग मालू, केव्हां निघणार तूं?"

त्या शब्दांनीं मी थबकलें. डोक्यांत एकदम कांहींतरी वजन पडल्यासारखें झालें. क्षणभर मला शब्द सुचेना. ज्या विषयावर आमच्यामध्यें एक शब्दाचा देखील उच्चार झाला नव्हता, त्या विषयाचें उत्तरच एकदम तिनें माझ्या तोंडावर फेंकलें. माझ्या मनांतली सर्व शहानिशा तिनें गृहीत धरली होती. मी दुय्यम प्रतीची आहें हें तिनेंच ठरविलें होतें; इतकेंच नाहीं, तर तें मला स्वतःला पटलेंच असेल हें देखील तिनें नक्की केलें होतें! त्यांतल्यात्यांत परवडेल अशीच बहीण जाते आहे, तिला बिचारीला सहानुभूतीनें निरोप द्यावा, असा उद्धट आत्मविश्वास तिच्या तेव्हांच्या वागण्यांत मला दिसला. मला काय वाटलें कोण जाणे, मी एकदम बंडखोर, कठोर, आडमुठी बनलें.

"मी निघणार?" मी चमत्कारिक आवाजांत विचारलें, "मी कां म्हणून?"

तिचा चेहरा एकदम गोरामोरा झाला; ती खालीं बसली. थोड्या वेळानें हलक्या आवाजांत व शक्य तितक्या सौम्य शब्दांत तिनें माझ्या मनांत घोळत असलेलीं–मीच जाण्यास कां योग्य–तीं कारणें बोलून दाखविलीं. मी जास्तच चिडलें. मंद बुद्धीच्या माणसाचा निश्चय होत नाहीं, पण तो एकदां झाला म्हणजे बदलणेंही अशक्य होतें. त्यावेळीं ताईच काय, पण बाबा स्वतः आले असते तरी मीं ऐकलें नसतें.

"कांहीं असलं तरी मीं कांहीं तयार नाहीं." मीं साफ सांगितलें.

"तुला बाबांची कांहींच दया येत नाहीं का?–आणि माझी?"

"तुला बाबांची दया कां येऊं नये? तुझी दया मला आली असती–पण आतां येत नाहीं." माझे हे शब्द ऐकून ती उठून गेली.

त्या क्षणापासून ताई अजीबात बदलून गेली. ती पुन्हां कधींहि हांसली नसेल,

ही माझी खात्री आहे. तिचा चेहरा देखील बदलला. प्रभाकराला पांच मिनिटांत तिनें दूर केलें. मला ती एका अक्षरानें चांगलें किंवा वाईट बोलली नाहीं. बाबांच्या तारेला 'मी येतें' असें ताबडतोब उत्तर पाठवून ती जाण्याच्या तयारीला लागली. तिच्या निग्रही मुद्रेंत थोडा राग दिसत होता. मी मत्सरीपणानें व क्रूर विघ्नसंतोषी-पणानें तिला जायला लावतें, असें तिला वाटलें असावें. माझें कृत्य हें चेवलेल्या मंदबुद्धीचें बंड आहे, ही तिला कल्पनाही नव्हती. आपण तिचा बळी देतों आहोंत, असें मला एकदां वाटे, पण पुन्हां वाटे, कीं हीसुद्धां तेंच करायला बघत होती...

नंतरचा इतिहास अगदीं थोडक्यांत सांगण्यासारखा आहे. ताई एकटी सिंगापूरला गेली. घनश्यामाशीं तिचें लग्न झालें; तरी बाबांचा त्यानें विश्वासघात केला; त्या गोष्टीनें म्हणा किंवा आपल्या सोन्यासारख्या मुलीचा तो दारुडा राक्षस छळ करतो हें कळून म्हणा, बाबांनीं हाय घेतली व लौकरच देह ठेवला. मी व मधू अगदींच पोरकीं झालों. धनेश्वरकाकांनीं आम्हांला आसरा दिला तो देखील अगदीं कर्तव्य म्हणून—अखेर म्हणजे मधू देखील मला एकटीला सोडून बाबांकडे गेला!

नंतर मला तुम्हीं मिळालांत—माझ्या जन्माचें सार्थक झालें. ह्या सर्व गोष्टी क्रम-वार झाल्याच. पण मला रुखरुख लागते, माझे विचार दुसरीकडे भ्रमण करतात, मी खिन्न होतें, ती एकाच भयानक कल्पनेनें—मीं चुकलें का? मी गेलें असतें तर ताईचा संसार प्रभाकराबरोबर सुखाचा झाला असता का? मग मधूचेही हाल न होतां ताईच्या मायेनें तो वाचला असता का? (आजारीपणांत तो ताईची आठवण काढीत होता.) सुखाला रामराम ठोकून निव्वळ हठवादी कर्तव्यनिष्ठेनें ताई घनश्यामाचा संसार करीत असेल व म्हणून ते चिडत असतील—माझ्या निर्बुद्ध हौशीपणानें मी त्यांना जास्त सुखी केलें असतें तर बाबाही बचावले असते का?

आमच्या वेड्या बायकी मनाच्या अशा कुकल्पना चालतात. अशीं दुःस्वप्नें आमचीं आम्हींच उभीं करतों व कष्टी होतों—घाबरतों. डोकें ठिकाणावर ठेवलें तर मला देखील पटतें, कीं जें व्हायचें होतें तेंच झालें; मी गेलें असतें तरी कांहीं टळलें नसतें. मी कदाचित् जास्तच अपेशी ठरलें असतें. पण माझें पूर्वजन्मीचें सुकृत कीं मी ही इकडे अशी सुखांत पडलें. (आणि—पूर्वजन्मीचें पापच म्हणायचें का, कीं हालांत, यातनांत असलेल्या, पण बाणेदारपणानें स्वतः इकडे कांहीं न कळून

देणाऱ्या, माझ्या तेजस्वी ताईच्या आठवणीनें पूर्वीचीं सगळीं स्वप्नें कधीं कधींत डोळ्यांसमोर उभी राहतात तीं ? )

मला कांहीं समजत नाहीं; आपण मला सांगा. आपण ममतेनं मला कांहींही सांगितलें म्हणजे मनाला शान्ति मिळते. पण आपलें मन हें सगळें वाचून साशंक होणार नाहीं ना ? हो, हद्दत सांगितल्याचा गुन्हा तर ठरणार नाहीं ? लौकर पत्र लिहून मला आश्वासन द्या. मीं हें पत्र लिहिण्यांत शहाणपणा केला कीं मूर्खपणा केला, हें स्वतःशीं ठरवायच्या आंत बंद करून टाकीत आहें.

आपली—

## ७. विश्रामबागेतील विहीर

होय, माझें वय बरेंच झालें आहे. ( उदबत्त्या विकणारा म्हातारा म्हणाला, ) दिवाणबहादुरांच्या बरोबरीचा आहें मी; पण जन्मभर साष्टांग नमस्कार घातल्या-मुळें आपल्या स्वतःच्या पायावर उभा आहें. नुसता वयानेंच दिवाणबहादुरांच्या बरोबरीचा नाहीं, तर त्यांच्याबरोबर शाळेंत होतों इथेंच, पुण्यांत; तीन कळसाचा एक वाडा आहे ना सदाशिव पेठेच्या तोंडाशीं–काय म्हणलांत, तुम्हीही विश्राम-बागेंतच शिकलांत–आणि तुमचे वडील आणि आजोबाही ? वाहवा, मग आपण एकाच शाळेचे विद्यार्थी म्हणायचे ! फार बरं वाटलं मला; पण आपल्या त्या शाळेची आतां काय अवस्था झाली आहे पाहिलीत ना ? स्थानिक स्वराज्य आले ना तिथें ? दिवे लावले त्यांनीं ! देशाला स्वराज्य मिळाल्यावर हे लोक देशाची काय स्थिती करतील, याची कल्पना येते आपल्याला विश्रामबाग वाडा पाहून—

नाहीं, मी फारसा शिकलों नाहीं, मध्येंच शिकणें सोडून दिलें. पण म्हणून माझें आयुष्य फुकट गेल्यासारखें नाहीं वाटत मला. बरेवाईट पुष्कळ प्रसंग आले माझ्या-वर, अनुभवही पुष्कळ मिळाला. आठवणी होतात–विश्रामबागवाड्याचीही एक आठवण आहे मला पक्की अजून–काय म्हणालांत ? आपल्याला जुन्या आठवणींची गोडी आहे ?–अहो, पण तुम्हांला खोटी वाटेल ती, कल्पित गोष्ट वाटेल ! सांगूंच म्हणतां ? बऽरं–टेकूं का इथें जरा–नको, चहाबिहा कांहीं नको–आग्रहच असला तर एक लोटीभर पाणी नि गुळाचा खडा द्या...

साठ वर्षे उलटलीं त्या गोष्टीला, अठराशेंऽऽऽ बहात्तर–हो बहात्तरच. त्यावर्षी रावबाजी ब्रम्हावर्ताला वारल्याचें आम्हांला कळलें होतें.—विश्रामबागेला एक दिवस

सुट्टी दिली होती सरकारनीं ! बंडाला बरोबर पंधरा वर्षें झालीं होतीं. वासुदेव बळवंत फडक्याचें बंडही थंड झालें होतें. मी त्यावेळीं मोठा द्वाड होतों. तालीम करून पोळासारखा गांवांत हिंडायचा; पण वडिलांच्या धाकानें शाळेंत जायला लागलों होतों. पब्लिक सर्व्हिसच्या परीक्षेला मी बसून, अदालतींत नाहीं तर सदर अमीनाच्या कचेरींत, आठ रुपयांची तरी कारकुनी मिळवावी अशी वडिलांची फार इच्छा ! पण आमचा पेशा पडला भिक्षुकी, मानेवर खडा ठेवून कांहीं काम म्हणजे विषासारखें आम्हांला ! मोठ्या मिनतवारीनें शाळेंत जात होतों खरा, पण तिथेंही उनाडक्या करायचाच. दुसऱ्या विद्यार्थ्यांची पागोटीं उडव, कोणाच्या शालजोड्या लपवून ठेव, कोणाच्या बंडीचे बंद तोड तर कोणाच्या शेंडीला अडकित्ता बांध; अशा खोड्या आम्ही शाळेंत करीत होतों. एकदां तर गोऱ्या हेड-मास्तराचें सोंग मी दाढी लावून काळा झगा घालून काढलें; तेव्हां मला एक आणा दंडसुद्धां झाला होता ! विश्रामबागेच्या मधल्या चौकांत आम्ही फार धुडगुस घालायचे. त्या चौका-खालीं खोल अशी एक मोठी विहीर आहे. चौकांत दोन लहानशीं भोकें होतीं ( अजूनही आहेत म्हणतां ? )—झांकून ठेवलेलीं; त्यांचीं झांकणें उचललीं म्हणजे आंत शंभर हात खालीं विहिरीचें भयाण काळें पाणी दिसायचें; त्या पाण्यांत मी एकदां काकाशास्त्री गोगट्यांचा जोडा टाकून दिला होता !

वाड्याच्या देवडीला जोत्यांत एका भुयाराचें दार होतें. आमच्यासारखी उपद्व्यापी पोरें आंत शिरूं नयेत म्हणून तें बंद करून टाकलें होतें; पण त्यामुळें आमचा चौकसपणा जास्तच वाढला. मी आणि दोनतीन संवगड्यांनीं मिळून ठर-वलें कीं या भुयारांत शिरून आंतली विहीर जाऊन पहावयाची. आम्ही मोठीं वाह्यात् कारटीं म्हणून आमची कीर्ति होती; ‘ भुताटकीचा वाडा ’ म्हणून कंडी पिक-वून रात्रीं तेथें वाटेल तो धुमाकूळ घालणाऱ्या एका हरिभक्तपरायणाची आम्हीं फट-फजिती उडविली होती. ‘अंगांत येणाऱ्या’ एका बाईचें बिंग उघडकीस आणलें होतें. बेलबागेच्या कट्ट्यांवर बसून सावजें टेहळणाऱ्या एका सरदाराला चांगला चोप दिला होता. अमावास्येच्या रात्रीं आंबिलओढ्यावर काय भुताटकी असते तें पाहायला गेलों होतों—त्यावेळीं तेथें गुप्तपणें आलेल्या कांहीं संतसंतिणींची फारच त्रेधा उडाली होती ! एकंदर काय, कीं आम्हीं पांढरपेशे असूनसुद्धां भित्रे नव्हतों. आम्ही—म्हणजे मी, विठूसाठ्या ( तो प्लेगांत मेला ), गणू दिक्षित ( तो राव-

बहादूर झाला होता तो ) आणि महाद्या सोनपाटकी ( चांडाळ पुढें ख्रिस्ती झाला पोट जाळण्यासाठीं ! ) यांनीं मिळून एक रात्र ठरवली. त्या दिवशीं शाळेंतून जातांना, पुढल्या चौकांतल्या रस्त्याकडच्या दाराची कडी उपटून काढून ठेवली होती. शिपाई दारेंखिडक्या बंद करतांना चुकारपणें ती खिडकी नुसती ढकलून ठेवील अशी आमची खात्री होती.

त्या रात्रीं नवाची तोफ झाल्यावर आम्हीं विठूच्या घरीं जमलों. तेथें खलबत केलें, व पुन्हां घरोघर जाऊन, 'विठोबाच्या देवळांत ललित पाहायला जातों' असें सांगून निसटलों. रात्रीं बारानंतर गस्तवाल्यांना चुकवून पुष्करिणीच्या हौदाच्या बाजूनें खिडकींत शिरलेले चौघे आम्हींच, असे आमच्या घरच्या मंडळींनींसुद्धां ओळखलें नसतें. आम्हीं सगळ्यांनीं गुढघ्याच्यावर काचे मारलेले होते. कोपऱ्यापर्यंत बाह्यांच्या बंड्या घातल्या होत्या व डोक्याला उपरण्याची टापशी बांधली होती; व कोणी पकडलेंच तर ओळखूं नये या आशेनें तोंडाला राख फासली होती! दोघांनीं हातांत सोटे घेतले होते व दोघांच्या हातांत मशाली होत्या—त्या भुयाराच्या दाराशीं आम्हीं पेटवल्या. युक्तीनें दाराचें कुलूप कडींतून काढलें व बजरंगबलीची आठवण करून हलकेच भुयारांत उतरलों!

तें भुयार आठवलें म्हणजे अंगावर शहारे उभे राहतात! आंत उतरल्याबरोबर बऱ्याचशा दगडी पायऱ्या लागल्या. त्या थेट पाण्याच्या कांठापर्यंत गेलेल्या होत्या. मशाली उंच धरून एकामागून एक असे आम्ही पाण्याच्या कडेपर्यंत जाऊन उभे राहिलों. तिथल्या भयाण काळोखांत आमच्या मशालींचा उपयोग काजव्यांपेक्षां कांहीं जास्त नव्हता! पायथ्याचें काळेंभोर पाणी आमच्याकडे जसें कांहीं द्वेषानें पाहात होतें. त्या पाण्यांत मध्येंच एकादा प्राणी हालचाल करायचा. आसपासच्या गडद अंधारांतून मधून मधून कांहीं डोळे लिकलिकल्याचा आम्हांला भास होत होता; मध्येंच एकादें वटवाघूळ पंखांचा 'की की' असा चमत्कारिक आवाज करीत पुढून जायचें. पाली चुकचुकायच्या—आमच्यासारखीं तरुण पोरें भेदरून जातील अशा सगळ्या गोष्टी तिथें जमा झाल्या होत्या. पण मागें फिरायचें नाहीं असा आमचा निश्चय झाला होता. मशाल अगदीं खालीं पायाजवळ धरून आजूबाजूला पाहिलें; तों पाण्याच्या कडेकडेनें सुमारें वांवभर रुंदीचा कट्टा दिसला. त्याच्यावरून एकएक पाऊल पुढें टाकून निदान विहिरीची प्रदक्षिणा तरी करूं

म्हणून आम्ही निघालों. जातां जातां आम्ही उतरलेल्या पायऱ्यांच्या समोर येईल अशी एक वाट दिसली व तींतून आम्ही शिरलों. तो बोळ सुमारें पंचवीस कदम चालून गेल्यावर डाव्या हाताला एक उघडें दार दिसलें; त्यांत डोकावून पहातां आम्हांला जें दृश्य दिसलें त्यानें आम्ही जागच्याजागीं खिळून राहिलों.

तेथील भिंतींत अडकविलेल्या मशालीच्या उजेडांत तीन बैरागी बसलेले दिसले. त्यांतला एक जमिनीवर पसरला असून दुसरा त्याचे पाय चेपीत होता, व तिसरा त्याला वारा घालीत होता! आम्हांला पाहतांच ' सरकार, दगा! ' म्हणून पाय चेपणारा बैरागी विजेसारखा उठला व त्यानें जवळची तरवार उचलून आमच्यावर उगारली, दुसऱ्यानें पंखा टाकून बाजूचा तमंचा उचलून आमच्यावर रोंखला: पडलेला बैरागी मात्र शांतपणें उठून बसला.

" कोण तुम्ही ? ' त्यानें गंभीर आवाजानें आम्हांला विचारलें. आम्हीं तटस्थ व थोडे कांपतच उभे होतों. त्याचा शब्द ऐकून आम्हांला एकदम चमकल्यासारखें झालें—आम्हीं त्याच्याकडे न्याहाळून पाहिलें. तो फार उमदा पुरुष होता. त्याची कांति तेजस्वी, घारे डोळे पाणीदार व शरीर भव्य होतें. त्यानें बैराग्याचें नुसतें सोंग घेतल्यासारखें दिसत होतें. आम्ही मुकस्तंभ उभे राहिलों असतां त्यानें आपल्या तीक्ष्ण नजरेनें आम्हांला तपासून पाहिलें, व पुन्हां प्रश्न केला.

आम्हीं अर्धवट शब्दांत आमचा वृत्तांत सांगितला....

त्याच्या चेहऱ्यावरचें कौतुकाचें स्मित पाहून आम्हांला धीर आला. महाद्यानें तर धिटाईनें विचारलें " आणि तुम्ही कोण ? "

त्याबरोबर तमंचावाला बैरागी एकदम खवळला.

' सरकार! यह सब—झूट है—आप कुछ नहीं मानना—यह फितुरलोग होंगे—दुष्मन् मालूम होते हैं—मुझे रजा होगी तो मैं इस तमंचेसे अभी इनको ठीक कर दूंगा—'

" खामोष पहाडसिंग!" तो तेजस्वी बैरागी बोलला, " माझे लोक मला ओळखूं येतात." पहाडसिंग कपाळाला आंठ्या घालून बाजूला झाला. " राणोजी, यांना बसायला आसन दे." पाय चेपणाऱ्या बैराग्यानें एक कृष्णाजीन हांथरलें व

त्याच्यावर आम्ही बसलों. बैराग्याचा म्होरक्या आम्हांला म्हणाला, "गड्यांनो, तुमची हिंमत दांडगी आहे–पण गुलामगिरीच्या काळांत ती फुकट आहे. तुम्हीं आम्हांला पाहिलें नसतें तर बरें झालें असतें. तुम्ही कच्चे आहांत असा मला थोडा देखील संशय आला असता तर माझ्या या–या दोस्तांनीं तुमचे हां हां म्हणतां तुकडे केले असते–पण मला तुमचा विश्वास वाटतो. आतां तुम्हांला दिसलोंच आहोंत तर सांगतों—" दुसऱ्या दोन्ही बैराग्यांची थोडी चुळबुळ झाली पण तिकडे लक्ष न देतां तो पुढें बोलूं लागला.

"सध्यां असलेल्या सत्तेचा मी शत्रू आहें–मी त्यांचा नाश करूं शकत नाहीं–पण मी इकडे आलों आहें, तो लढण्यासाठीं नव्हे. हें माझें वतन आहे. माझ्या घराण्यासाठीं मी आलों आहें. माझे तीर्थरूप नुकतेच वारले, माझीं कुलदैवतें इथें धूळ खात पडलीं होतीं, वडिलार्जित संपत्तीचा कांहीं भाग होता; आणि सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट माझ्या घराण्याला नामशेष करणाऱ्या, शत्रूला सामील होणाऱ्या घरभेद्यांच्या फितुरीचा पुरा पुरावा होता. पहिल्या दोन गोष्टी मीं हस्तगत केल्या, फितुरीचा पुरावा इथून थोड्या अंतरावर आहे, तो आतां उचलून मी पुन्हां देशो-धडीला लागणार. आज नाहीं उद्यां जगाला कळेल, कीं दौलतीचा विश्वासघात कोणत्या देशद्रोह्यांनीं केला—पण हें काय ?"

हळूहळू धुराचे लोट आम्हीं आलेल्या बोळांतून यायला लागले होते व आतां थोडी धगही येऊं लागली होती. त्या पुरुषाचे डोळे एकदम खदिरांगारासारखे लाल झाले. तो भयानक आवाजांत म्हणाला,

"अखेर दुष्मनांनीं दावा साधला !—हाही वाडा पेटला. आणि याच वेळेला ! शनिवारवाडा गेला, बुधवारवाडा गेला, शुक्रवारवाडा जळाला. पण फितुरीचा पुरावा इथें शाबूत राहिला होता—आतां तोहि गेला ! "ठीक आहे. आपलें काम झालेंच म्हणायचें. चला आपल्या मार्गाला ! बाळांनो, तुम्हीहि आमच्याबरोबर चला."

आम्हीं स्वप्नांत असल्यासारखे उठून उभे राहिलों. त्या बैराग्यांनीं पटापट आपलें सामान गोळा केलें व ते आमच्यापुढें झाले; आम्ही त्यांच्या मागें चालूं लागलों. भुयारांतून बोळांबोळांनीं वेडींवांकडीं वळणें घेत आम्हीं सुमारें पंधरा–वीस मिनिटें

चालत होतों. एकाएकीं गार हवा लागली व डोक्यावर चांदण्या दिसूं लागल्या. आम्हीं थबकलों. राणोजी मुकाट्यानें कांहीं पडीक पायऱ्या चढून वर गेला व कानोसा घेऊन व टेहळणी करून त्यानें आम्हाला खूण केली. आम्हीही वर चढलों.

एका क्षणांत आम्ही भुयारांतून मोकळ्या हवेंत आलों. नदीकाठीं दगडीपुला-जवळच्या एका ' उस्वासांतून ' आम्ही बाहेर निघालों होतों. बैराग्यांच्या पुढाऱ्यानें नुसती मान हलवली. आम्हांला काय वाटलें कोण जाणे ! आम्हीं वांकून त्याला नमस्कार केला. ते तीन बैरागी पाठ फिरवून उत्तरेकडे जाऊं लागले व पहाटेच्या धुक्यांत हळूहळू अदृश्य झाले. त्याच वेळीं नदीकांठच्या एका हवेलींतून कोणा सरदाराची कसबीण भैरवीचे खिन्न सूर काढीत होती. आम्ही शहराकडे वळलों तों आकाशांत आगीचे लोळ उठतांना दिसत होते. जरा धांवपळ करीत त्या बाजूला जाऊन भेटलेल्या लोकांना विचारलें, "आग कुठें लागली ?"

"विश्रामबागवाड्याला" पांच-सहा जणांनीं एकदम उत्तर दिलें.

थोडा वेळ आग पाहून आम्हीं आपापल्या घरीं जाऊन झोंपलों.

× × ×

कांहीं दिवसांनीं गांवांतल्या भिंतींना शिळाप्रेसवर छापलेले कागद जागोजागीं चिकटविलेले दिसले. त्यांतला एक मीं काढून घेतला व तो अजूनपर्यंत जपून ठेवला आहे. तो मला पाठ झाला आहे. त्यांतला मजकूर असा होता—

## जाहीरनामा

जंजिरे, मुंबई—<br>ता. ७ ऑगस्ट १८७२. } तमाम लोकांस कळविण्यांत येतें कीं, सरकारचे खालील तीन शत्रू पुणें जिल्ह्यांत दिसल्याची बातमी सरकारला मिळाली आहे. त्यांना जेणेंकरून अटक होईल अशी माहिती पुरविणारास दहा हजार रुपयांचें इनाम मिळेल—

### वर्णन

धोंडोपंत नाना पेशवे—मीरतच्या, लखनौच्या व कानपूरच्या बंडाचा म्होरक्या;

ठाकुर पहाडसिंग जाठ—त्याचा मदतनीस;

राणोजी शेलार—त्याचा नोकर.

( नंतर त्यांचें तपशिलवार वर्णन दिलेलें आहे. )

हे लोक पेशव्यांचें गुप्तधन शोधून काढायला व सरकारी दप्तरांतून चोरी करण्यासाठीं आल्याचा तपास लागला आहे. यांना कोणी आश्रय दिल्यास किंवा मदत केल्यास तो सरकारविरुद्ध गुन्हा समजण्यांत येईल......( वगैरे )..........

आम्हीं जसजसे मोठे होत गेलों तसतसें आम्हांला समजत गेलें, कीं स्वतंत्र राज्याचा शेवटचा दुवा आपल्याला पाहायला मिळाला होता.

—काय म्हणालांत ? नानासाहेब तराईच्या जंगलांत वारले असा समज आहे ? हऽऽऽऽ असेल—तसेही असेल, या डोळ्यांनीं मात्र त्यांना पुण्याला पाहिलें आहे.........

## ८. इंटरचा डबा

'खर्रर्रर' असा आवाज करून अखेर गाडी उभी राहिली. गाडीच्या आवाजांत खंड पडल्यामुळं सावध झोंपणारे जागे झाले व पट्टीचे झोंपणारे झोंपेंतच थोडे अस्वस्थ झाले. चाकांचा ठेका बंद झाला तरी 'पांढरी तीन' मध्यें लावलेला कोपऱ्यांतल्या घोरणाऱ्याचा सूर मात्र चालू होता. डब्याबाहेरून रातकिड्यांची सामुदायिक 'किर्रर्रर' लक्ष देणाऱ्यांच्या कानठळ्या बसवीत होती, तर इतरांच्या ध्यानांतही येत नव्हती. पलीकडच्या थर्डक्लासच्या डब्यांतून कोणी तरी आशावादी आदमी कवालीसारखे कांहीं आवाज काढण्याचा फोल प्रयत्न करीत होता. दुरून कुणी तरी पुकार दिल्याचा एकदां अस्पष्ट आवाज आला, व त्या पुकारीला तितकाच अस्पष्ट जबाबही मिळाल्याचें ऐकूं आलें. इतर डब्यांतून कोठें कोठें चालणाऱ्या उदासीन त्रोटक संवादांचे अधिक-उणे तुकडेही मधून मधून ऐकूं येत होते. पांच मिनिटें झालीं, दहा मिनिटें, पंधरा मिनिटें झालीं—

दारापाशीं असलेला उतारू उठून बसला, कांचेची खिडकी चढवून त्यानें बाहेर डोकावून पाहिलें, व एक जंगी जांभई देऊन विचारलें,

'कोणचं स्टेशन हो?'

दाराजवळच्या माणसानें अर्धवट मान फिरवून म्हणलें, 'टेशन नाहीं, जंगलांतच उभी आहे गाडी—'

कोपऱ्यांतल्या घोरणारानें सूर बदलून 'काळी एक' वर आणला.

'किती वाजले?' दुसऱ्या कोणी तरी जड व आळसानें ओथंबलेल्या आवाजांत सर्वसाधारण डब्याला प्रश्न केला.

'पावणे दोन' खिडकींतून उत्तर आलें. उघडलेल्या खिडकींतून आंत येणारा वारा फार मधुर होता, समोरच्या बाजूच्या मंडळीवर त्याचे वेगवेगळे परिणाम झाले. एक मनुष्य हुशार होऊन उठून बसला, दुसरा एक दाढी वाढलेला अस्ताव्यस्त इसम झोपेंतल्या झोपेंतच खुदकन् हांसला. वरच्या बर्थसूवर समोरासमोर झोंपलेले दोन अनुभविक प्रवासी सिगारेटस् शिलगावून साडेदहाला तहकूब केलेलें संभाषण पुन्हां चालू करते झाले.

अर्धा तास झाला; चाळीस मिनिटें झालीं.

बाजूच्या लायनीवरून कांहीं पाय खडीचा आवाज करीत चालत गेले. एखादा दुसरा कंदील हालत गेला. लांबच्या एंजिननें 'फससूस्' करून आपल्या हयातीची जाणीव दिली.

मधल्या एका बांकावर आईच्या सांवलीला निजलेलें एक मूल बराच वेळ चुळवुळ करीत होतें. त्याला ऐसपैस जागा देऊन, दिव्याचा प्रकाश त्याच्या तोंडावर येऊ नये अशा बेतानें त्याच्यावर पदर धरून, बाजूच्या चार बोटांच्या वळचणीवर हातापायांच्या घड्या करून त्याची आई निजली होती—ती कशी झोंपली होती तें त्या माउलीलाच ठाऊक. त्या बाळाला अखेर आईनें घातलेल्या कोंडीचा कंटाळा आला. ती तर झोंपेनें इतकी बेजार झाली होती कीं, त्याला तसेंच दाबून निजविण्याचा तिनें प्रयत्न केला; त्यामुळें मूल चिडलें व त्यानें खच्या आवाजांत रडण्याची पहिली लकेर सोडली.

झोंपेची सर्व आशा सोडून ती बाई उठून बसली; मुलाला तिनें मांडीवर घेतलें, पण त्याचें रडणें थांबलें नाहीं. आजुबाजूचे लोक जागे झाले. पहिल्यानें संकोचानें चोरट्यासारखी झालेली ती बाई, मूल थांबत नाहींसें पाहून नाइलाजाच्या मुद्रेनें त्याला थोपटूं लागली; नंतर तिनें त्याला खांद्यावर टाकलें, ती उभी राहिली.

जागे झालेले लोक आपापसांत गप्पा मारायला लागले होते. आणखी खिडक्या उघडल्या गेल्या. एक धाडसी मनुष्य डब्याखालीं उतरून पुन्हां गंभीर मुद्रेनें वर चढला. कोणी विचारलें,

'काय आहे हो ?'

त्याला परस्परच दोनचार उत्तरें मिळालीं,

'शिग्नल पडला नाहीं—'

'इंजिन शिक असेल—'

'सतरा डाउनचं क्रासिंग आहे'

असे पारिभाषिक शब्द ऐकून चौकस जिभा स्थिरावल्या.

मूल सारखें रडतच होतें. कोंपऱ्यांतल्या घोरामुरानें 'काळी पांच'वर क्षणभर उडी मारली, पण घशाला एवढा ताण न सोसल्यामुळें एकदम पहिल्या चार पट्ट्या एकदम दाबाव्या तसा एक आवाज करून अखेर फुटलेल्या भात्यासारखा श्वास सोडला, व तो जागा झाला.

सव्वा तास, दीड तास……

बायको व मूल दिमेल अशा बेतानें समोरच वरच्या बर्थवर पसरलेला प्राणी जागा झाला, व खालीं उतरून त्यानें मुलाला घेतलें. मुलानें थोड्या खालच्या आवाजांत किरकिर चालू ठेवली.

डब्यांतले सर्व लोक आतां जागे झाले होते. एक पानाची चंची उघडली गेली. तीनचार सिगारेट्स व एक दोन विड्या यांच्या धुरानें डब्याला सौभाग्य आलें. एकच मनुष्य झोंपलेला—किंवा झोंपेचं सोंग घेतलेला, त्या बाईच्या वरच्या फळीवर होता. पोर रडत असतां दोनतीन 'चक्–चक्–चक्' असे त्रासल्याचे आवाज करून, अर्धवट् उठल्यासारखें करून, डोक्यावरून खस्सकन् पांघरूण घेऊन त्यानें आपली चीड व्यक्त केली होती.

आई व बाप मुलाला 'बाबा–राजा शहाणा बाळ—काऊ–चिऊ–भुर्रर्र' इत्यादि आवाजांनीं समजावीत होतीं. बापानें त्याला दार उघडून बाहेरची काळोखी वनश्री दाखवून पाहिलें, दिवे दाखविले, धाक दाखविला, पण व्यर्थ; तें मूल चेवल्यासारखें करीत होतें.

वरच्या बर्थवरील त्रासलेला असामी उठून बसला. आपल्या शांततेचा भंग होत आहे, आपल्या वैयक्तिक हक्कावर गदा येत आहे, आपल्याकडे बुद्धिपुरःसर व खोड-

साळपणें दुर्लक्ष करण्यांत येत आहे, इत्यादि तक्रारी त्याच्या हालचालींवरून व्यक्त करण्याची त्यानें शिकस्त केली. पण तो पडला उंचावर, अत्याचारी लोकांचें लक्षही त्याच्याकडे गेलें नाहीं. त्यानें खालीं उतरण्याची तयारी केली.

सगळी गाडी जागी झाली होती. दिवसा उजेडीच्या सारखा संभाषणाचा गोंगाट सगळीकडून ऐकूं येत होता. त्या आवाजांत आजूबाजूच्या त्या काळ्याभोर जंगलाची शोभा कुठल्या कोठें नाहींशीं झाल्यासारखी वाटली. गडद निळ्या आकाशांत लुकलुकणाऱ्या चांदण्यांच्या अंधुक, नाममात्र प्रकाशानें, झाडांचे शेंडे व लहानशा टेकड्या या घनदाट छायेची नुसती आकृति–नुसती वरची अव्यवस्थित रेघ दिसत होती; पण या दृश्याची गूढ रमणीयता माणसांनीं फुललेल्या त्या गाडीच्या किलबिलीनें पार घालवून दिली होती.

पावणेदोन तास झाले; रडणारें मूल थोडथोडी विश्रांति घेऊन पण सुरवातीपेक्षां जास्तच कर्कश किंकाळ्या फोडीत होतें. त्याचीं आईबापे त्याला मध्यें ठेवून दगडी मुद्रेनें स्वस्थ बसलीं होतीं.

वरच्या गृहस्थानें खालीं उतरण्याचा निश्चय अमलांत आणला. खालच्या परिस्थितीबद्दल तीव्र नापसंतीचा चेहरा तयार करून तो कुदकन् खालीं आला.

गृहस्थाचा नूर मोठा झोंकदार होता. पायांत मखमलीची मोजडी, अंगावर लांडी खाकी तुमान व रेशमी शर्ट व भांग पाडून कपाळावर आणलेले तुळतुळीत केंस ( उतरायच्या आधींच खिशांतल्या कंगव्यानें विंचरले होते त्यानें ते. ). त्याच्या चेहऱ्यावर सुखी आयुष्याचा तुकतुकीतपणा होता. त्याचा बुटका देह ऐषआरामी राहणीनें मध्यभागीं चांगलाच सुटला होता. त्याच्या फुगलेल्या गालावर चिंतेची एक रेषा देखील नव्हती–पण लाचार हास्याच्या वळ्यांच्या खुणा मात्र नाकाच्या दोन्ही बाजूंना पडल्या होत्या. बनावट साहेबीचा पढिक उर्मटपणा त्याच्या बारीक डोळ्यांत चमकत होता. उतरून थोडा वेळ कपाळाला आंठ्या घालून तो दाराबाहेर पहात उभा राहिला. नंतर वर ठेवलेल्या ब्लेझरच्या खिशांतून एक चिरूट काढून त्यानें शिलगावला. रडक्या मुलाकडे पाहून पुन्हां ओठांची कांहीं हालचाल करून बाहेर पाहिलें. त्याच्या एकंदर अवतारावरून तो मनांतल्या मनांत ' डॅम धिस न्युइझन्स ' असें पुटपुटत असावा असा कोणीही तर्क बांधला असता. त्यानें रडव्या मुलाच्या

आईबापांकडे अशा नजरेनें पाहिलें कीं 'यू इन्डियन्स' असे शब्द त्याच्या ओठांतून केव्हां सांडतील याचा नेम सांगवत नव्हता. त्याचें सामान भपकेदार होतें; पितळेचे कोपरे लावलेली एक मोठी निळी सूटकेस, हिरवा होल्डॉल, कातडी हँडबॅग, हॅटची पिशवी, थर्मास आणि मोठ्या डागांवर सेकंड क्लासच्या वजनाच्या कांहीं जुन्या लाल चिठ्याही डकवलेल्या होत्या. हा सगळा रुबाब आणि त्याची चढेल वागणूक पाहून हें एकादें वशिल्याचें तट्टू, गरिबींतून एकदम श्रीमंतींत चढलेलें बाळ, किंवा भीक मागून शिक्षण करून भीक मागूनच इंपीरिअल बँक किंवा इन्कमटॅक्स खातें यांतल्या एकाद्या मोठ्या नोकरीवर 'थेट तरतूद' झालेलें कूळ असावें असा कयास करायला हरकत नव्हती. सेकंड क्लासचा प्रवास परवडत असून (बहुतेक भत्ता बचावण्यासाठीं) हा खालच्या वर्गानें जात असावा असें दिसत होतें.

उलट रडणाऱ्या मुलाचें कुटुंब मात्र थर्ड क्लासनेंसुद्धां जाणें परवडणार नाहीं—थर्डमध्यें जागा नाहीं, नाइलाज म्हणून शक्तीबाहेर पैसे देऊन इंटरनें जात असल्याचें स्पष्ट दिसत होतें. मुलाच्या बापाला, ठिकाणीं पोहोंचल्यावर गाडीवाल्याला द्यायला तरी पैसे राहतील कीं नाहीं ही काळजी जांचत होतीसें त्याची मुद्रा दाखवीत होती. त्याची पत्नी तितक्याच सचिंत पण सहानुभूतिपूर्ण मुद्रेनें त्याच्याकडे मधून मधून पहात होती.

मुलाचें लक्ष समोरच्या बाकावर आलेल्या त्या साहेबी इसमाकडे गेलें. त्याचें रडणें थांबलें. एक खूप मोठें कचकड्याचें बाळ आपल्याला खेळायला मिळालें अशा समजुतीनें पोरानें त्या ऐटदार माणसाकडे झांप टाकण्याचा प्रयत्न केला. त्या माणसानें एकदम तोंड फिरविलें. कपाळाला थोड्या जास्त आंठ्या घातल्या. खालच्या वर्गाची ही सलगी त्याला पसंत नव्हती.

बापानें मुलाला आवरलें त्याचें लक्ष त्या देशी साहेबावरून दुसरीकडे वळविण्याचा प्रयत्न केला, पण मूल कसलें खट; तें त्या रुबाबदार व्यक्तीकडेच ओढ घेऊं लागलें. आजुबाजूचीं माणसें कौतुकानें या प्रकाराकडे पाहूं लागलीं.

साहेब 'नर्व्हस' झाले. कारकुनाच्या बुकांतला एखादा घोंटाळा पकडून त्याला तंबी द्यायला जावें आणि आपणहि त्या घोटाळ्यांत गुरफटलें जावें अशी त्यांची

स्थिती झाली. फिनेलच्या बाटलीलाच मुंग्या लागाव्या असा हा प्रकार त्याला वाटला. आपली ओळख करून घेण्याचा या हलक्या लोकांचा हा प्रयत्न आहे असाहि एक वेळ त्यांना संशय आला. बापाच्या तोंडावर आशाळभूत हंसूं व आईच्या तोंडावर लाडिक कौतुक दिसेल या अपेक्षेनें तिरकस दृष्टीनें त्यांनीं तिकडे पाहिलें.

पण त्यांची अपेक्षा खोटी ठरली. आई रागावून त्या पोराला दावीत होती व बापानें 'काय भिकारडं कार्ट आहे!' अशी तिरस्काराची मुद्रा केली होती.

साहेबांची थोडी निराशाच झाली. आपल्याशीं सलगी राहिलीच, पण संधी असून ओळख करून घ्यायलाहि हीं दरिद्री माणसें तयार नाहींत, हा त्याला विषाद वाटला. थोड्या कुतूहलानें त्यानें मुलाच्या आईबापांकडे पाहिलें.

तीं मोठीं साधीं, सभ्य व (त्यांच्या हळूहळू चाललेल्या बोलण्यावरून) सुसंस्कृत माणसें दिसलीं. धुवट दारिद्र्याचा किंवा पांढरपेशाचा त्यांच्यावर शिक्का होता. त्यांच्या निराश मुद्रांवर विचारांचें गांभीर्य होतें, औदासीन्याला विवेकाची किनार दिसत होती.

रुबाबदार माणसाच्या कांहीं अंधुक स्मृति जाग्या झाल्या. मुलाच्या बापाचा चेहरा ओळखीचा वाटू लागला......हो तोच, कॉलेजचा फेलो होता आपल्या पहिल्या वर्षात...सत्तर रुपयांवर रखडतो आहे कोठेंतरी, मास्तर म्हणून...पण मोठा मान आहे त्याच्या विषयांत त्याला म्हणून म्हणतात......

त्याला स्पेशल ग्रेड नाहीं—शिपाई नाहीं—सेकंड क्लास प्रवास नाहीं—मग आहे काय त्याच्यांत ?...आणि आपण पाहूं लागतांच हीं दोघें उठून मुलाला घेऊन दाराजवळ गेलीं... ताठा केवढा !

कोणाकडे सारखें पाहाणें हें युरोपियन लोकांत शिष्टसम्मत नाहीं ही त्या साहेबी इसमास आठवण झाली व तो उठून उभा राहिला.

एक लांबलचक मालगाडी खड्-खड्-खड् करीत अखेर एकदांची पुरती निघून गेली. इतर मंडळींनीं झोंपेच्या दुसऱ्या हप्त्याची तयारी सुरू केली.

मुलाच्या रडण्यानें त्रासून खालीं उतरलेल्या मनुष्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून तें कुटुंब परत आपल्या जागेवर बसलें व मुलाला निजविण्याच्या उद्योगाला लागलें.

तो मनुष्य मात्र कसा तरी विचार करीत विमनस्कपणें वर आपल्या बर्थवर चढला......

# चोरबाजारांतील चिजा

फुटकळ भाग विलायतेंतून आणून, येथें ते नुमते जोडून स्वदेशीच्यां नांवाखालीं विकण्याचें निर्लज्ज साहित्य–वाणिज्य करण्यापेक्षां प्रांजलपणें चोरबाजारांत एक गल्ला मांडलेला काय वाईट! या गल्ल्यांतल्या कांहीं चिजा पूर्वी कोठेंतरी पाहिल्यासारखें वाटेल; एखादें रंग पालटलेलें नक्षीचें कपाट ओळखीचें निघेल. कांहीं फ्रेमी बदललेलीं चित्रें कोणाच्या तरी घरांत पाहिल्याची आठवण होईल; सांगाड्याशिवाय सगळीं यंत्रें नवीन टाकलेल्या सायकलीनें एकादी अंधुक स्मृति जागृत होईल; दोन आणे लाटांतल्या पुस्तकांवर कांहीं ओळखीचे शिक्के निघतील–पण हा बोलूनचालून चोरबाजार! गिऱ्हाईक ही पक्की जाणीव ठेवून आलेलें व 'बेपारी' तर उघडउघड सौदा पटवायला बसलेला. चोराचा हा खुला सावपणा वरील सावाच्या छुप्या चोरीपेक्षां गिऱ्हाइकाला खात्रीनें पत्करेल! पुढील सर्व गोष्टी इंग्रजी गोष्टींच्या मध्यवर्ति कल्पनेवर रचलेल्या आहेत.

## ९. पूजेंतला रुपया

दिवसभर दर स्टेशनला थांबत आणि दर सिग्नलला धक्के खात अखेर संध्याकाळच्या सुमाराला माझी गाडी मुनवराबादेला जाऊन पोहोंचली. गाडीच्या वर्णनावरून मुनवराबाद हें दक्षिण महाराष्ट्रांत आहे हें वाचकांनीं ओळखलेंच असेल! त्या गांवाचें खरें नांव मुनवराबाद नव्हे, पण या गोष्टींतली मुख्य व्यक्ति अजून हयात असल्यामुळें, व त्या व्यक्तीला दुखवण्याची माझी इच्छा नसल्यामुळें गांवाचें खरें नांव न सांगणेंच मला श्रेयस्कर वाटतें. असो. मुनवराबाद हें तालुक्याचें गांव होतें व त्या गांवाला रेल्वेचें स्टेशन होतें, यावरून अशा ठराविक नमुन्याच्या ठिकाणाची कल्पना कोणालाही सहज करतां येईल. मामलेदार कचेरी, मुन्सफ कोर्ट, खाजगी हायस्कूल, सहकारी पतपेढी, साखरेची गिरणी, पीठ दळण्याची चक्की, जुना सरकारवाडा, ओंगळबुवाचा मठ, गुडघ्या मारुतीचें देऊळ, वगैरे ठराविक संस्था त्या ठिकाणीं होत्या. त्याचप्रमाणें दोनचार पडीत जाहागिरदारांच्या हवेल्या, एक पत्र्याचें टॉकी थिएटर, पार्शाचें दारु–दुकान, खमीसजान नायकीणीची माडी वगैरे करमणुकीचीं ठिकाणेंही जरूर तितकीं होतीं. मला ही सगळी माहिती स्टेशनावरून गांवांत आणणाऱ्या टांगेवाल्यानें दिली. त्याच टांगेवाल्यानें मला गांवांतल्या एकुलत्या एक मुशाफरखान्यांत–धर्मशाळेंत किंवा हॉटेलांत आणून सोडलें. या 'हॉटेल' चें नांव 'ढेपे–आश्रम.' दर्शनी पडवींत सोडा, लिंबू, भजीं व 'शिंगल' चा भटारखाना, मागच्या सोप्यांत खाणावळ व वरच्या चन्द्रमौळी माडींत 'राहाण्याची उत्कृष्ट सोय' केलेली होती. आश्रमांत बाहेरगांवचे अतिथी क्वचितच येत

असल्यामुळें व संध्याकाळनंतर हॉटेलची गिऱ्हाइकीही कमी होत असल्यानें, गांवांतल्या रिकामटेकड्या लोकांना जमण्याचा अड्डा म्हणून ढेपे स्वामींच्या आश्रमाचा चांगला उपयोग होतो असे. पैशा दोन पैशांच्या सोडालिंबूवर सुमारें दीड तास बसण्याची येथें नागरिकांना मुभा होती.

या कुग्रामांत कशाला आलों असें मला आल्याबरोबर वाटूं लागलें. पण मी कांहीं राजीखुषीनें आलों नव्हतों. आमच्या साहेबबहादुरांच्या हुकूमाला अनुसरून मला यावें लागलें होतें. मी एका प्रकाशकांकडे नौकरीला होतों. त्यांच्या मालकीच्या 'तृष्णा' नामक मासिकांत 'स्त्रीत्वाची तहान' म्हणून एक लेखमाला येत असे. हे लेख नवविचारपरिप्लुत, भावनास्पर्शी, धाडसी, जळजळीत, हळुवार, विचारप्रचोदक, इत्यादि असल्यामुळें त्यांनीं मराठी वाचकवर्गात मोठी खळबळ उडवून दिली होती. त्यांतून लेखिकेचें नांव 'शेवंती शेलार' हें टोपणनांव आहे असा बोभाटा झाल्यामुळें तर तृष्णा मासिकाचा खप अगदीं तडाखेबंदच होऊं लागला होता. या लेखिकेची कादंबरी मिळविण्यासाठीं प्रकाशकमजकुरांनीं मला (तिसऱ्या वर्गाचा खर्च देऊन) पाठविलें होतें. मी पडलों उपसंपादक, मालकांच्या हुकमापुढें स्वतःची सोयगैरसोयं, स्वतंत्र मतें, सदसद्विवेकबुद्धि वापरण्याची कोणत्या उपसंपादकाची तमा आहे? 'होय साहेब' म्हणून मी शेवन्तीबाईची मुलाखत घेण्यास निघालों. 'छापील पानाला एक आण्यापर्यंत मोबदला देण्याची तयारी ठेवावी, लेखिकेनं फारच ताणून धरलें तर पानामागें दीड आणा देऊं करण्यास देखील मागेंपुढें पाहूं नये, दीड आण्याच्या पुढें मात्र तार करून माझ्या संमतीनें दर ठरवावा, पण हवें तें करून कादम्बरीचा वायदा नक्की करावाच' असें मालकसाहेबांचं मला फर्मान होतें. लेखिकेचा एकंदर मोबदला माझ्या तिसऱ्या वर्गाच्या प्रवासखर्चाहून कमीच पडला असता हें खरें; पण खिळेजुळव्याच्या एकदशांशापेक्षां जास्त वेतन लेखकाला द्यायचें नाहीं, असा आमच्या साहेबांचा नियम होता. ते मोबदला कोणालाही नाकारीत नसत. सहा पैसे शेरानें कविता व सव्वादोन आणे रत्तल लघुकथा हा भाव ते नेहमीं देत असत. शिवाय, त्यांनीं तरी विनाकारण पैसे कां उधळावेत? कित्येक सधन स्त्रिया त्यांनाच मोबदला देऊन आपल्या कादम्बऱ्या प्रसिद्ध करून घेत असत. एका श्रीमंताच्या मुलीनें तर म्हणे आपली कादम्बरी वाचणारालासुद्धां पैसे देण्याचें कबूल केलें होतें. असो. बाईचा पत्ता मला अर्थातच मालकांनीं सांगि-

तला होता. त्यांनाच भेटायला मीं या कुग्रामांत आलों होतों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांची मुलाखत घेण्यास मी जाणार होतों.

रात्रीचें जेवण झाल्यावर मी खालच्या विश्रांति-गृहांत जरा वेळ घालविण्या-साठीं येऊन टेकलों. एक ग्लास लेमन मागवून शक्य तितका वेळ तें न पितां शेवटीं हळूच तें ओतून टाकून उठून जाण्याचा माझा विचार होता. मी 'आरडर' देणार इतक्यांत एका आंत आलेल्या गृहस्थाचा धक्का माझ्या खुर्चीला लागला.

वाजवीपेक्षां फाजील नमारम्भानें त्यानें माझी माफी मागितली; मला त्याचा थोडा तिरस्काराच आला, पण त्याला आपल्या मोठेपणाचें प्रदर्शन करायची संधीच जणूं हवी होती; एक खुर्ची ओढून तो माझ्याच टेबलाशीं बसला व मोठ्या रुबाबांत त्यानें दोन 'कोलिंड्क' ची ऑर्डर दिली.

पोऱ्याला यायला थोडा उशीर लागला तेव्हां गृहस्थ पोऱ्याला एक शिवी हांसडून खेंकसला,

"इथं काय फुकट द्यायला सांगतो आहे काय ? हा घे रुपया–आगाऊ घे चांगला वाजवून !"

कोलिंड्क पितां पितां मोठ्या आवाजांत त्यानें स्वतःबद्दल अनेक बढाया मारल्या. आपलें कूळ, गणगोत, पूर्वजांची श्रीमंती व बहादुरी, स्वतःची हुषारी, गांवकऱ्यांचा गाढवपणा–दरोबस्त गोष्टींची हजेरी त्यानें घेतली. आपल्या सासुरवाडीचाहि खूप मोठेपणा सांगितला व आपण घरजांवई होऊन या गांवला आल्याचा इतिहास निवेदन केला. त्याचा मला मनापासून वीट आलाच होता; त्याच्या बडबडीनें तो दुणावला. व्यसनीपणाची ढिलाई त्याच्या वागणुकींत होती; घामट टोपीखालीं अस्ताव्यस्त करडे केस, पिंवळसर डोळे, पिळलेल्या मिशांखालीं काळे ओठ व किट-लेले दांत, अंगांत एक मळकट शेरवानी, खालीं कळकट तंगतुमान व बिनवाद्याचे धुळीनें भरलेले बूट असा त्याचा अवतार होता; रुप्याची मूठ ठिकाणावर नसलेली एक काठी त्याच्या हातांत होती. दुसरा हात मोकळा असेल तेव्हां मिशीवर जात होता. कोलिंड्कच्या मोबदल्यांत माझ्या खर्चानें दोन पानाच्या पट्या व माझ्या पाकिटांतल्या तीनचार सिगारेटस् त्यानें ओढल्या. अखेर मी कंटाळून वर जायला निघालों तेव्हांच तो उठला व चालूं लागला.

## चोरबाजारांतील चिजा

आश्रमाचे मालक–स्वतः ढेपे मुनि–माझ्यापाशीं फार अदबीनें वागत होते, कारण उभ्या महिन्यांत 'राहाण्याची सोय' घेणारें त्यांचें मी पहिलेंच गिऱ्हाईक होतों.' त्यांच्या अदबीनें मीहि खूष झालों. मराठी उपसंपादकाला इतिहासांत इतक्या अदबीनें कोणी क्वचित्‌च वागवलें असेल.

" गेली कां ती पीडा ? " त्यांनीं विचारलं, " सुटलांत ! तो इसम मोठा त्रासदायक आहे, कोणीं तक्रार करायची वाट पाहतों आहें मी, त्याला यायचा बंद करायला तुम्ही कम्लेण करा म्हणजे त्याला रस्ताच दाखवतों पुढच्या खेपेला ! "

" जाऊं द्या, एकदोन दिवसांसाठीं मी इथें आलेला, कशाला कम्लेंट करूं. " मी म्हटलं, " त्याला चुकवला म्हणजे झालं. धंदा तरी काय त्याचा ? "

" रिकामटेकडेपणा, कधींकधीं स्वतःचे पैसे आणतो, एरवीं फुकटांतच चहा प्यायला येतो कुणाला तरी गांठून; आणि नांव केवढं मोठं –' सरदार सर्जेराव सावंत ! "

" सरदार ? "

" गल्लोगल्लीं सरदार आहेत आमच्या गांवांत; पडकीं घरं सगळीं त्यांचींच; बाहेरचा पानवाला सरदार चुनाळ, तो चहा देणारा पोऱ्या अमीर नरोव्याचा मुलगा, समोरचं जोडे बुटांचं दुकान नवाब इक्रमअली चामडजंगाचं. सर्जेरावाची सासुरवाडी मात्र खऱ्या सरदाराची. त्यांनीं मुलगी दिली याला, ते निपुत्रिक वारले. या स्वारीनं इस्टेटीची धूळधाण करून टाकली चारपांच वर्षांत ! पहिल्या नंबरचा छंदीफंदी माणूस –बायको मात्र साध्वी आहे बिचारी–हा राक्षस तिचं रक्त जाळतोय् अगदीं—"

मला कंटाळा आला होता, पण झोंप मात्र आली नव्हती. गांवांत कांहीं पहाण्यासारखं, कांहीं करमणुकीचं ठिकाण आहे का म्हणून मीं ढेपेबुवांना विचारलं. ते विनयानें हांसून म्हणाले, "आमच्या या खेडेगांवांत काय असणार ? आणि आतां रात्रीच्या वेळेला पाहाणार तरी काय ? नाहीं म्हणायला इंद्रसभा प्यालिसमध्यें फिलम लागली आहे नवी, 'परी–जल्लाद' म्हणून. खूप मारामारीची आहे, मास्टर गचू आणि लंकाराणी स्टॉर्स आहेत–आणि तुम्हांला 'तसा' शोक असला तर खमीसजान गाणारीण आहे; चांगल्या चिजा आहेत तिच्याजवळ. मेरे मौला बुलाये, ला इलाही, राधेकृष्ण बोल, बाजुबंद खोल—"

त्यांच्या शिफारशींची सत्यता बघण्याच्या भानगडींत न पडतां मी झोंपायला चालता झालों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शेवंतीबाईकडे जाणासाठीं मी निघालों. पायीं रखडत शोध लावीत हिंडण्यापेक्षां तांगा करूनच थेट ठिकाणावर पोंहोंचावें म्हणून मी बाजारपेठेंतल्या तांगातळावर गेलों.

एका क्षणांत, 'स्टेशन !–एक सवारी !–नवा तांगा साहेब !–सामान ठेवा ! रबर टायर !' असा एकच गिल्ला भोंवतालीं होऊन चाबूक परजीत अनेक तांगेवाले माझ्याभोंवतीं गर्दी करीत होते. बावरलेल्या स्थितींत माझें लक्ष एका जुनाट चौचाकी 'शिग्राम' कडे गेलें. या गांवांत ती गाडी पाहून मला मोठें कुतूहल वाटलें, व ऑफिसच्या खर्चावर गाडीभाडें टाकतां येईल या विचारानें मी त्या गाडीकडे वळलों. म्हातारा कोचमन पुढें आला. मरहूम महाराणी व्हिक्टोरियाच्या काळीं त्याचा पोषाख मोठा रुबाबदार असला पाहिजे–तोच आजपर्यंत त्याच्या अंगावर होता असें दिसलें. त्याचें थवकर्डें पागोटें डोक्यावर अधांतरीं तरंगत होतें, त्याच्या मांडचोळण्याचीं गुडघ्याखालचीं बकलें केव्हांच उडून जाऊन तिथें दोऱ्या बांधलेल्या होत्या. तो अनवाणीच होता, पण सगळ्यांत लक्ष वेधण्यासारखा त्याचा डगला होता. त्याच्यावरचा जर केव्हांच उडून गेला होता. पितळेचीं टिकठिकाणचीं बटणें नुसत्या कापडावरच्या भोंकांनीं स्मृतिमात्र राहिलीं होतीं. कित्येक टिकाणीं दोऱ्यांनीं त्याचे विभक्त होऊं पाहणारे डावे उजवे पक्ष समोरासमोर आणले होते, आणि त्या उभ्या डगल्याला छातीवरच्या एका तिसऱ्या भोंकाला काय तें एकुलतें एक बटन होतें–कोणत्याशा दे. भ. चा फोटो होता त्या बटणावर; त्या कोचमननें चाबकाबदली एक चिंचेचा फोक घेतला होता हातांत. लवून मुजरा करून व हांसऱ्या मुद्रेनं तो म्हणाला,

" साहेब, गाडी तयार हाय, टेशन आठ आनं, गांवांतल्या गांवांत कुठंबी गेलांत तर चार आनं—"

मी मुकाट्यानं गाडींत चढून बसलों, तो दार बंद करून दोरी खिळ्याला अडकवूं लागला.

" गढीबाहेर शेलारांच्या वाड्यापुढें घे." मीं फर्मावलें.

त्यानें एकदम चमकून माझ्याकडे पाहिलें; त्याच्या कपाळाला आठी पडली.

" कां साहेब तिथं कशापाई जायचया, तुमास्नी ?"

मला राग आला, मी उठूं लागलों.

" नसत्या चौकशा करूं नको. न्यायचं असलं तर ने, नाहीं तर मीं दुसऱ्या तांग्यांतून चाललों."

तो लगेच मऊ आला. आर्जवी आवाजांत तो म्हणाला,

" नाहीं, नाहीं तसं नव्हे साहेब, पन ती बाजू लई लांब, अगदीं रानाच्या तोंडाशीं, कुनी मनुक्षबी फिरकत न्हाइ तिकडं कंदी, म्हून म्हनालों–पन आपुन सांगतां तर हा निघालों."

त्या गाडीच्या आंतली बाजू कमालीची जीर्ण होती, टपाच्या अस्तराच्या चिंध्या लोंबत होत्या, गाद्यांचा काथ्या निघाला होता, खिळे वर आले होते व सगळाच खोका कचकच करीत हालत होता. गाडीला घोड्यासारखें एक कसलेंसें जनावर जोडलें होतें खरें, पण तेंहि गाडीचा वकूब ओळखून अगदीं जपून धीम्या चालीनें जात होतें. गाडीवाल्यानें आव खूब आणला होता; चार घोड्यांच्या गाडीला पुरेल एवढा आवाज तो करीत होता. हळूहळू जातां जातां गांवांची पाहणी मात्र सावकाश करायला मिळाली. अखेर गाडी उभी राहिली, गाडीवाला उतरला व दाराची दोरी खिळ्यांतून काढून मला उतरायला त्यानें वाट दिली. चिंचेच्या फोकानें कोपऱ्यावरची एक पडीक हवेली दाखवीत तो म्हणाला,

" त्यो शेलारचा वाडा–एक रुपया द्या साहेब."

" एक रुपया ?" मी चकित होऊन विचारलें.

" जी, एक रुपया " तो मुद्दाम आडमुठेपणानें खालीं पहात म्हणाला.

तूं गांवांतल्या गांवांत चार आणे कबूल केले आहेस आणि आतां इथं फिरतोस काय ? बाहेरगांवचा समजून बनवायला पाहातोस. चार आण्यापेक्षां एक पै जास्त मिळणार नाहीं–तक्रार कर हवी तर चौकीवर—" मी संतापून बोलूं लागलों.

पुन्हा तो अगदीं मोकळाईनें बोलूं लागला.

## पूजेंतला रुपया

"साहेब माफ करा, चार आनं कबूल केलं पण मला एक रुपया द्या—रुपयाची फार निकड हे मला, तुमच्या गळ्याशपथ सांगतों, एका रुपयाची फार फार जरूर हाए या यळेला—"

हो, ना करतां करतां दया येऊन—किंवा तितका मनाचा खंबीरपणा नसल्यामुळें म्हणा, मी त्याला एक रुपया दिला—माझें सहज लक्ष गेलें, त्या रुपयाची कोणीतरी पूजा केलेली होती; व ती इतक्या मनोभावानें कीं हळदीकुंकवाचा वज्रलेप डाग त्याच्यावर पडला होता.

मी वाड्यांत शिरलों; माझ्या मालकांनीं दिलेलं पत्र वाड्याच्या मालकिणीकडे एक लहानशी कुणब्याची पोर घेऊन गेली, व एका जुनाट दिवाणखान्यांत जुनाट कोचावर मी बसलों. वाडा फारच पडीक व भयाण झाला होता; अगदीं रिकामा, भिंतीचा रंग उडालेला, लांकुडकामाला तेलपाणी नाहीं, कोंपऱ्यांत कोठें कोठें कांहीं मोडकें सामान; खानदानीला दारिद्र्य आलें म्हणजे तें दृश्य किती भयंकर होतें हें मला त्यावेळीं दिसलें. इतक्यांत बाजूच्या दारानें दिवाणखान्यांत वाड्याची मालकीण आली. मीं उठून नमस्कार केला. ती समोरच्या दुसऱ्या मोडक्या कोचावर बसली.

खानदानी रुबाबाची ती जिवंत मूर्ति होती. चाळीसएक वर्षांचें तिचें वय असेल; निम्मे केस पांढरे झालेले, देहयष्टी कृश, रंग फिकट, पण दृष्टि शान्त आणि गंभीर, वागणूक साधी आणि प्रतिष्ठितपणाची, बोलणें सुसंस्कृत पण गोड; चार एक रुपयांचें लुगडें ती बाई नेसली असेल पण तिची विभूति अशी होती कीं, ती दिवाणखान्यांत गेल्यावर एकादा साडेतीन तोफांचा संस्थानिक देखील उठून उभा राहिला असता.

माझी वाचा कुंठितच झाल्यासारखें झालें, पण तिनें हळूहळू बोलून बोलून मला मोकळेपणा वाटायला लावलें. वाङ्मय, कला, जीवन, वगैरे विषयांवर आमची चर्चा झाली—म्हणजे बाई बोलली व मीं ऐकलें.

सुमारें एक तास संभाषण झाल्यावर माझें पत्र वर आणणारी मुलगी दारांत येऊन गेली. 'आलेंच, बसा हं' म्हणून बाई उठून आंत गेल्या. आंत कांहीं अस्पष्ट

कुजबूज झाली. बाई थोड्याशा टवटवीत मुद्रेनें बाहेर आल्या. "आपण थोडा चहा घ्याल ना?"

माझी सम्मति गृहीत धरून त्या उठल्या व 'विठा' म्हणून त्यांनीं आंतल्या दरवाजांत हांक मारली. माझें पत्र वर आणणारी कुणब्याची पोर पुन्हां दारांत आली.

"जा, कोपऱ्यावरच्या रस्सीचंद लोटामलच्या दुकानांतून एक चहाचा पुडा घेऊन ये" असें म्हणून बाईनीं कनवटीचा एक रुपया काढून विठाच्या हातावर ठेवला.

तो रुपया हळदीकुंकवानें रंगलेला होता. मी मनांतल्या मनांत म्हणालों, 'लक्ष्मी-पूजनाचे बरेच रुपये चलनांत निघालेले दिसतात.'

बाई परत आपल्या जागेवर येऊन बसल्या. विठा गेल्यावर एक मिनिट कांहीं उलटलें नसेल, इतक्यांत खालून 'अग बयाऽऽ सोडा!' म्हणून एक किंकाळी ऐकूं आली, व एका पुरुषाचा दरडावणीचा आवाज ऐकूं आला. बाईचा चेहरा एकदम गोरामोरा झाला. त्या पुन्हां 'आलेंच' म्हणून पुटपुटत आंत गेल्या. आंतून पुन्हां जरा मर्दानी आवाजांत गुरगुर व थोडा हिसकाहिसकीचा आवाज आला. लौकरच बाई पुन्हां बाहेर आल्या. त्यांचा चेहरा निर्विकार होता.

"चहाचा बेत मला वाटतं आज रहित करावा, आमचा नेहमींचा चहा कांहीं आज दुकानांत शिल्लक नाहीं—शिवाय एक आजारी पाहुणेही आहेत घरांत. उद्यां मात्र जरूर या हो चहाला——"

चहासाठीं विठा वाड्याच्या बाहेर देखील पडली नव्हती हें स्पष्ट दिसत होतें—असो.

निरोप घेऊन मी परत निघालों. चालत येतांना वाटेंत बाजारपेठेचा तांगा-तळ लागला. तो चौचाकी म्हातारी गाडी तेथेंच उभी होती. म्हाताऱ्या कोचमननें पुन्हां सुरुवात केली.

"साहेब, गाडी तयार हाय, टेशण आठ आनं—" पण तितक्यांत मला ओळखून तो हांसला, "आपुन हात व्हय?"

" हे बघ मला उद्यां सकाळीं पुन्हां शेलाराच्या वाड्यांत जायचं आहे पण चार आणे देईन—"

" मोप झालं चार आनं साहेब, मी कांहींबी तक्रार घ्यायचा न्हाइ आतां, आज मात्र रुपायाचं फा ऽ ऽ र काम व्हतं पगा. "

" काय रे तुझं नांव काय ? "

" भिवा, साहेब "

" शेलारांच्या वाड्यांत तुझी ओळख आहे वाटतं ? "

त्यानें चमकून माझ्याकडे पाहिलें.

" व्हय, हम्बीरराव शेलाराचा मी कोचमन नव्ह कां तीस वरसं—"

" शेवंतीबाई त्यांची मुलगी वाटतं ? मोठी हलाखीची स्थिती दिसते त्यांची "

भिवाचा चेहरा एकदम कठोर झाला, तो सावकाश म्हणाला,

" पण तिला कंदिबी कमी पडायचं न्हाइ, हाल व्हायचं न्हाइ तिचं—"

" बरं जाऊं दे, उद्यां सकाळचं लक्ष्यांत ठेव—"

नंतर मी तारहपिसांत जाऊन मालकांना तार दिली.

' शेवंतीबाईच्या ' मातृपद ' कादम्बरीसाठीं बेसुमार चढाओढ आहे. तीन प्रकाशक इथें स्वतः आले आहेत. पानाला तीन रुपये मागते. '

आश्चर्याची गोष्ट म्हणजे उलट तार आली कीं,

'ती म्हणेल तें कबूल कर, शंभर रुपये विसार लागल्यास तारेनें पाठवीत आहें.'

त्या रात्रीं जेवण उरकल्यावर मी पुन्हां खालच्या उपाहारगृहांत थोडा वेळ काढायला म्हणून गेलों. थोड्याच वेळांत सरदार सर्जेराव सावंत तेथें हजर झाले ! त्याला चुकवायला मला त्यानें संधीच दिली नाहीं. माझा हात ओढून मला त्यानें खालीं बसवलें. त्याच्या तोंडाला दारूचा उग्र दर्प येत होता, स्वारीची तब्येत मोठी खुषींत होती—

" वा पाहुणे ! चालल्लांत कुठं ? बसा–कांहीं थंड घ्या ! "

" माफ करा, कांहीं नको आहे मला, झोंपायला जातों आतां—"

" बसा हो ! सोबतीशिवाय पितां येत नाहीं आपल्याला—"

पुन्हां कालच्याप्रमाणें दरडावून त्यानें पोऱ्याला बोलावलें व त्याच्यापुढें खिशांतला रुपया काढून ' छन् ' दिशीं वाजवला.

"लेव ! रोख पैसा ! गडबड नही मंगता !"

त्या रुपयावर हळद–कुंकवाचे डाग होते.

दुसऱ्या दिवशींच्या सकाळीं मी पुन्हां भिवाच्या रथांतून शेलारांच्या वाड्याकडे गेलों, व मला परत नेण्यासाठीं त्याला बाहेर गाडी उभी ठेवण्यास सांगितलं. शेवंतीबाई आज जरा जास्तच फिकट व अशक्त दिसत होत्या. ' मातृपद ' कादम्बरी आम्हांला तीन रुपये पानाच्या दरानें देण्याच्या करारावर त्यांनीं आपली सही केली–आणि एकाएकीं त्या घेरी घेऊन खुर्चीवरून घसरून पडूं लागल्या !

विठाला हांक मारून आम्ही दोघांनीं मिळून त्यांना कसेंबसें कोचावर निजविलें व मी रस्त्यावर जाऊन भिवाला ताबडतोब डॉक्टर आणायला सांगितलं. त्याला वेळेचें महत्त्व पटलें व आपला मोडका खटारा तसाच टाकून त्यानें पायींच धूम ठोकली.

थोड्याच वेळांत डॉ. साळुंके–तेथील हॉस्पिटल ॲसिस्टंट—येऊन ठेपले. ते बाईचे फॅमिली डॉक्टर होते. त्यांनीं बाईंना तपासलें, व जवळच उभा असलेल्या भिवाला फर्मावलें,

" भिवा, जा, पळत माझ्या घरीं जाऊन एक लोटीभर दूध आणि ह्या चिठ्ठींत लिहिलेलें औषध घेऊन ये—आणि हें बघ तुझ्या त्या गाडीनें जाऊं नको–आजच्या आज परत यायला हवं. पायीं जा."

डॉक्टरांनीं मला न्याहाळून पाहिलें, मीं विश्वास टाकण्याच्या लायकीचा मनुष्य आहे असें मनाशीं ठरविलें व मला ते म्हणाले,

" पोटांत अन्न नाहीं हाच रोग आहे बाईंना. दारिद्र्य, उपास आणि अभिमान यांचं हें फळ; एका नालायक हलकट इसमाशीं लग्न झाल्यामुळें बाईच्या जन्माचं मातेरं झालं आहे. आमच्यासारख्या घरोब्याच्या माणसाकडूनसुद्धां मदत घ्यायची नाहीं असा हट्ट; आणि गुजराण कशावर चालते म्हणतां ? हा भिवा गाडीवाला काय गाडीभाडं कमावून आणील त्याच्यावर ! सरदार शेलारांच्या वैभवाच्या दिवसांतली ती गाडी; त्या इमानी नोकराच्या कमाईवर जगण्याचा बाईला प्रसंग आला आहे–"

इतक्यांत माझ्या हातांतल्या करारपत्रावरच्या बाईच्या सहीकडे माझें सहज लक्ष गेलें–' सौ. शेवंतीबाई सावंत !'

" सावंत यांचं आडनांव ? "

" होय, त्या नीच पशूचं, तिच्या नवऱ्याचं तें नांव, तो हलकट सर्जेराव भिवानं मिळवून आणलेल्या टिकल्या देखील बाईला मारहाण करून काढून घेतो. "

लौकरच आलेल्या दुधानें आणि औषधानें बाई शुद्धीवर आल्या. छातींत कळ येण्याचा विकार असल्यामुळें आपल्याला मूर्छा येते असें त्यांनीं मला सांगितलें. विठा त्यांना वारा घालीत उभी राहिली. इकडच्या-तिकडच्या दोनतीन गोष्टी झाल्यावर डॉक्टर जायला निघाले. मीही डॉक्टरांच्या बरोबर बाहेर पडलों, व कादम्बरीच्या मोबदल्यापैकीं पन्नास रुपये आगाऊ बाईच्या जवळ देण्याचें त्यांना आश्वासन दिलें. डॉक्टरनां बरें वाटलें.

परत दिवाणखान्याजवळ आलों तेव्हां आंत भिवाचा घोगरा आवाज ऐकूं आला,

" बाईसाव, कालचा रुपयाबी सावंतानं घेतलान् ? "

" होय भिवा, " क्षीण उत्तर आलें.

थोड्या वेळानें मी आंत गेलों. व कादम्बरीवरच्या आगाऊ पैशांची व्यवस्था केली असल्याचें सांगून बाईचा निरोप घेतला. भिवानें मला परत आश्रमाकडे आणून सोडलें. त्याच्याबरोबरच पन्नासाच्या नोटा एका पाकिटांत घालून मीं बाईकडे पाठवून दिल्या.

संध्याकाळीं सहाच्या सुमारास मी थोडा फिरून येण्यासाठीं निघालों. तांगा-तळावर भिवाची गाडी उभी होती; म्हाताऱ्याची दृष्टी अधु झाली असावी, कारण त्यानें आपला नेहमींचा मंत्र सुरू केला, " साहेब गाडी तयार आहे—" पण तितक्यांत मला ओळखून तो वरमला. त्याचा पुरातन पोषाख आज जरा अस्ताव्यस्त दिसत होता. डगल्याच्या दोऱ्या तुटल्या होत्या व एकुलती एक गुंडी ( देशभक्त छापाची ) बेपत्ता झाली होती.

मी फिरत फिरत जातां जातां चावडीजवळ गेलों. तिथें बरीच गर्दी जमली होती. चावडीपुढें पडवींत एक प्रेत पडलेलें होतें व एक डॉक्टर तें तपासून नुक-

ताच उठला होता. तें प्रेत ' सरदार ' सर्जेराव सावंताचें होतें. भोंवतालीं जमलेल्या लोकांतून सावंताबद्दल एकसुद्धां चांगला शब्द ऐकूं येत नव्हता. ' आपल्या गुणांनीं मेला,' ' देवाचा न्याय ', 'सुटली बिचारी ', ' कोणी रडणार नाहीं', असे उद्गार निघत होते. मरतां मरतां सावंतानें धडपड खूप केलेली दिसत होती. त्याचे कपडे अस्ताव्यस्त व फाटलेले होते. दोन्ही मुठी घट्ट मिटलेल्या व दांत ओठांवर चावून धरलेले. मी त्याच्या अगदीं जवळ उभा होतों, तेवढ्यांत एक मूठ ढिली पडली व त्यांतून कांहींतरी गळून पडलें. माझें लक्ष तिकडे जातांच मीं त्या वस्तूवर हळूच पाय ठेवला व नंतर हलकेच ती उचलून खिशांत टाकली.

परत आल्यावर आमच्या उपहारगृहांत तोच विषय चालला होता. गांवांतल्या कोठल्याशा आडगल्लींत एका पडक्या घरापुढें सर्जेरावाचा मुडदा सांपडला होता. त्याला कोणी मारला, याबद्दल तर्ककुतर्क चालले होते. एक इसम म्हणाला, " गांवांत रामोशांची टोळी आली आहे, त्यांच्यापैकीं कोणीतरी नक्की हा खून केला. दुपारीं बाराला पार्शाच्या गुत्त्यासमोर सर्जेराव पन्नासाच्या नोटा दाखवीत सगळ्यांच्या पुढें बढाया मारीत होता; मुडदा सांपडला तेव्हां त्याच्या अंगावर पैसे सांपडले नाहींत—खास एकाद्या रामोशाचं काम आहे हें. "

त्याच रात्रीं मी मुनवराबाद सोडली. माझी गाडी गांवाजवळच्या पुलावरून 'खड्खड्-खड्-खड्' करीत जात असतां मला चावडीवर खिशांत टाकलेल्या वस्तूची आठवण झाली.

कुठल्याशा दे. भ. चा फोटो असलेली ती गुंडी—जी मरणाच्या धडपडींत सर्जेरावाच्या हातांत प्रतिपक्ष्याच्या कपड्यावरून तुटून आली होती ती—मी नदींत टाकून दिली.

## १०. किंचित् घोंटाळा–

हा नमुना आपल्या नेहमींच्या पाहण्यांतला आहे. त्याला स्वतंत्र आत्मनिष्ठ असें जीवन नाहींच. चोवीस तास जगाचे डोळे आपल्याकडे आहेत या समजुतीनें त्याची वागणूक असायची; स्वतःच्या सोईकडे किंवा सुखदुःखाकडे लक्ष देण्यापेक्षां लोकांना आपल्याबद्दल कसें वाटावें ही त्याला सगळी धडपड—इतरांवर छाप पाडण्यासाठीं. शरीराचा एकादा भाग उघडा पडतो आहे म्हणून तो झांकण्यासाठीं व झांकण्याच्या जाहीर प्रयत्नानेंच शरीरसौष्टवाकडे लक्ष वेधून घेण्यासाठीं एकादी नखरेल तरुणी जशी सारखी हालचाल करीत असते तशी त्याची अवस्था व्हायची ! आपल्या व्यक्तित्वाचें नग्न स्वरूप पाहायला सगळींजणें टपून बसलीं आहेत, या समजुतीनें तो तें शक्य तितकें झांकण्याच्या, नटविण्याच्या खटपटींत असायचा. आपली अमूक एक गोष्ट दुसऱ्याला कशी दिसेल या काळजींत बिचारा नेहमीं कुढत असायचा–मोठा स्वार्थत्यागी तो ! साहजिकच त्याच्या वागणुकींत कमालीची कृत्रिमता आली होती, पण आपलें स्वत्व झांकायला बनावटपणाचा पडदा त्यानें जितका जाड वापरावा तितकाच स्पष्ट त्याचा क्षुद्र जीव उघडा पडावा !

त्याचे केंस, चेहरा, कपडे, मोठे फॅशनेबल असायचे; आणि तो त्यांची निगाही फार घ्यावयाचा. सारखा केंसावरून हात ( मधूनमधून खिशांतला कंगवा ) फिरवील, वरच्या डाव्या खिशांतल्या रुमालांत पावडर असे, त्यानें गाल पुशील, दुसऱ्या एका रुमालानें घाम पुशील, शर्टची कॉलर बरोबर कोटाच्या कॉलरवर बसली आहे कीं नाहीं हें पाहायला दहा वेळां चांचपून पाहील, खालीं बसतांना बैठकीवरचा कोट

उचलून धरील, बसायच्या जागेवर तिसरा एक सुवासिक रुमाल आंथरून मग बसेल, कांचा मारलेल्या झिरमिरीत धोतराच्या दोन्ही बाजूच्या पंखाशीं बोटांचा सारखा चाळा ठेवील, मधुनमधून खिशांतल्या आरशांत चेहरा पाहील–हजार कामें चालायचीं त्याचीं ! तो नक्षीदार होल्डरमध्यें सोनमुखी ( gold-tipped ) सिगारेट घालून ओढायचा. त्यांच्या बोलण्यांत ताजे विलायती बोलपट, मोठमोठीं हॉटेल्स, 'सिल्क', 'टॅक्सी', हजारांच्या रकमा, फॅशनेबल वस्तु वगैरे नांवें नेहमीं यायचीं. तो बोलायचा मोठ्या आवाजांत, व ज्याला उद्देशून बोलायचा त्याच्या चेहऱ्याखेरीज आसपास सगळीकडे त्याचें लक्ष असायचें—कीं आपल्या व्यक्तित्वाचा प्रभाव भोंवतालीं कसा पडतो आहे !

जगाशीं बेपर्वाईनें वागणाऱ्याच्या मागें हार घेऊन लागणारें जग, हेटाळणी आणि उपेक्षा करतें कुणाची, तर त्याच्यावर छाप पाडून त्याला खूष करूं पाहणाऱ्या आमच्या नायकासारख्या माणसाची ! पण तो तरी जगाच्या टवाळीनें डगमगणारा थोडाच होता ? मनस्वी चिकाटीनें जगाला दिपवायचा त्यानें चंग बांधला होता !

पण कधींकधीं त्याला फारच निरुत्साह करण्यासारख्या गोष्टी घडत. उदाहरणार्थ, तो ट्रॅममधला प्रकार ! पण ती सगळीच गोष्ट पुरी सांगितलेली बरी......

नेहमींप्रमाणें मोठ्यानें बोलत आपल्या एका मित्राबरोबर तो धोबीतलावापाशीं ट्रॅममध्यें चढला. 'राखून ठेवलेल्या' दोन बांकाकडे त्याची नजर वळली मात्र, वाक्य अर्धेंच सोडून तो पुढच्याच बांकावर बसला; त्याच्या मित्राला त्याच ओळींत पण मधल्या वाटेपलीकडे जागा मिळाली होती. याला मोठ्यानें बोलायला चांगलीच संधि मिळाली. मित्राला तोंड उघडायला अवसरच दिला नाहीं त्यानें ! त्यानें आपला विषय अव्याहत चालू ठेवला—त्याचा विषय म्हणजे आपला बडेजाव.

मधूनमधून मागें वळून पहात त्यानें आपल्या मित्राशीं बोलणें चालू ठेवलें होतें. कालच लॉइड्स् बॅंकेंतून पैसे काढून होअर ॲंड कंपनींत सूट शिवायला टाकला, रीगलमधल्या बाल्कनी सीटस् कशा गैरसोयीच्या आहेत, अगदीं नव्या मॉडेलच्या टॅक्सीवाल्याशीं आपण कसा ठराव बांधला आहे, लेडी घेलाजीच्या बंगल्यावर चहाचें निमंत्रण आहे, धोब्याची इस्त्री खराब असल्यामुळें आपण दोन डझन कॉलर्स कशा फेंकून दिल्या, अमुक कॉलेजमधल्या मुली आपल्याला केरम खेळायला

किती आग्रहानें बोलावतात इत्यादि विविध माहिती त्यानें आपल्या मित्राला ( व आजूबाजूच्या दहाबारा लोकांना ) दिली. आपण किती 'इंप्रेशन' पाडीत आहोंत, हें मधूनमधून तो मागच्या बांकाकडे वळून पाहात होता.

त्या बांकावर खिडकीशीं एक सुंदर तरुणी व तिच्या शेजारीं एक भयंकर बाई अशा दोघी बसलेल्या होत्या. सुंदर तरुणी फार संकोचानें बसली होती, ती खिडकीच्या बाहेर पाहात होती, पण तिच्या ओंठावरचें अर्धस्फुट स्मित, अर्धवट मिटलेल्या पापण्यांच्या आड दिसणाऱ्या चंचल काळ्याभोर डोळ्यांतली चोरटी चमक, अशा गोष्टींनी आमच्या नायकाची खात्री होत होती कीं आपल्याकडे हिचें दुर्लक्ष खास नाहीं ! उलट तिच्या शेजारची महामाया करड्या मुद्रेनें आपल्या नाकासमोर पहात होती. तिनें मुद्दाम निर्विकार चेहरा ठेवण्याची शिकस्त केली होती. बाजूच्या तरुणीवर तिचा चांगलाच धाक असावा हें स्पष्ट दिसत होतें. तेव्हां ही बया आपल्या वटारलेल्या डोळ्यांनीं आपल्याला दम देत आहे असा भास त्याला होई. ती तरुणी जितकी सुंदर तितकीच ही बाई भेसूर, जड, निब्रट, कुरूप व मध्यवयस्क होती. तिचा पोषाख भडक व चष्मा जाड काळ्या कांचांचा होता. तरुणीकडे दृष्टिक्षेप करतांना प्रत्येक खेपेला या अवदसेचे डोळे आपल्यावर नाहींत ही खात्री नायकाला करावी लागत होती, त्यामुळें एकंदर कटाक्षांचें प्रमाण दौलतीपेक्षां राखणदाराकडे, फुलापेक्षां कांट्यांकडेच जास्त पडत होतें.

त्या तरुणीत व आपल्यांत हृदयाची ओळख पटवायला काय युक्ति करावी या विचारांत त्यानें खूप डोकें खाजविलें; अखेर एक नामी मार्ग त्याला सुचला.

" मी या पुढच्या स्टेशनला उतरतों," तो आपल्या मित्राला मोठ्यानें म्हणाला, " माझ्या रूमचा पत्ता नीट ध्यानांत ठेव: त्या कवडीदास हॉस्पिटलच्या बाजूला पिराजी मॅन्शन आहे ना ? त्याच्या टॉपचा—एकदम वरचा माळा, माझी एकट्याचीच रूम आहे; तिथें संध्याकाळीं सहाच्या पुढं मी नेहमीं एकटाच असतों. कोणी फिरकत नाहीं तिकडे; केव्हांही ये—उद्यांच ये ना नाहीं तर ? अगदीं एकांत ठिकाण ! कोणीं आलं गेलेलं कोणाला कळत नाहीं. पण एकटंच यायचं बरं का ? बरोबर लफडं नको कोणी—"

हें बोलत असतांना तो कावेबाज नजरेनें मागच्या दोघींकडे आळीपाळीनें

पाहात होता. खिडकींतल्या तरुणीच्या चेहऱ्यावर मंदस्मिताची रेषा दिसली त्याला, त्याची तब्येत खूष झाली अगदीं! त्याचा मित्र मात्र विचार करीत बसला कीं आपल्याला माहीत असलेला पत्ता पुन्हां इतक्या अगत्यानें यानें कशाला सांगितला?

दुसरा दिवस उजाडल्यापासून आमच्या नायकाला तीव्र उत्कंठा लागलेली होती. तिच्या ध्यानांत आलें असेल का? नक्की आलें असेल! पण तिला जागा सांपडेल कीं नाहीं—छे! शंकाच नको. आपण स्पष्ट पत्ता दिला आहे अगदीं—पण ती शूर्पणखा तिला सोडील? उंः! तिनें नाहीं सोडलें तर ही तिला हवी तशी चुकवून येईल! मोठी धूर्त दिसली ती!...सहा वाजेपर्यंत त्याचा वेळ मोठ्या कष्टानें गेला. आधीं चार दिवस केंस कापून आला असूनही त्यानें पुन्हां एकदां ते कापून घेतले. दिवसांत दोनदां दाढी केली. कांहीं 'टॉयलेट' सामान नवीन आणून लावलें. खोलींत व अंगावर सेंटचे फवारे उडवले, फुलें आणून ठेवलीं, कांहीं नवीं चित्रें लावलीं, कोरे कपडे टांगून ठेवले, तीनचार वेगवेगळ्या कादंबऱ्या, गोष्टी वाचण्याचा प्रयत्न केला—कांहीं केल्या वेळ जाईना. सिनेमाच्या दुपारच्या खेळाला जाऊन तो अर्ध्या कार्यक्रमांतूनच घरीं धापा टाकीत आला. जसजसे सहा वाजायला आले तसतशी शंकाकुशंकांनीं त्याच्या मनाची तळमळ वाढत चालली. ती येईल...... का नाहीं? आजच येईल का? एकटीच येईल का—अरे बापरे ती कल्पनाच नको—बरोबर कोणी आडदांड इसम आला तर हाडें चांगलींच मऊ होऊन निघायचीं! ( मागें एकदां एका 'प्रेमदेवते'च्या बापानें त्याला अशा 'फाजीलपणा'-बद्दल यथास्थित चोप दिला होता. )

इतक्यांत जिन्यावर पावलें वाजलीं. त्याचा जीव अगदीं गळ्यापर्यंत आला—दार उघडूं का नको? तीच असेल—का चहाचीं भांडीं विसळायला रामा आला असेल? ती असली तर ठीक, नसली तर त्या निराशेपेक्षां मरण पत्करलें! सिद्धी-पेक्षां आशेचा कालच जास्त सुखकर असतो असें कोणीसें म्हटलेलें त्याला आठवलें......

दारावर टिचक्या वाजल्या—अहाहा! किती नाजुक टिचक्या! देवा, मी स्वप्नांत तर नाहीं ना? उघडूं का दार—का उत्कटतेच्या या ब्रह्मानंदाचा आणखी थोडा अनुभव घेऊं? छे, आतां पळभरही धीर निघत नाहीं. उघडतोंच—

त्यानें दार उघडलें व दगडी पुतळ्यासारखा निश्चल तो उभा राहिला! त्याचे डोळे व तोंड वासून तसेंच राहिलें.

"सांपडलांत बरोबर," ती थोडें हांसून म्हणाली, "पत्ता ध्यानांत आला होता माझ्या—पण धास्ती वाटते! मला तिथून निसटून यायला किती मुष्कील झाली; ती–ती कालची माझ्या शेजारची, ती सोडीनाच मला–जळवेसारखी चिकटलीच होती–कशीबशी चुकवून आलें तिला! हें काय? तुम्ही बोलत कां नाहीं? पहिल्या भेटीच्या आधींच का कंटाळलांत?"

तो डोळे फाडून आणि आ वासून उभाच होता.

ती 'ती' नव्हती.

—तिच्या शेजारची होती!

## ११. हृदयाचे पाश व कायद्याचे पाश

त्या **दिवशीं** पूना मेलला फार गर्दी होती. इंटरच्या डब्याचा एक लहानसा भाग पार्टिशन करून वेगळा केलेला असतो; त्या भागांत चार बांकें असतात, एका बाजूला दोन बांकांत ट्रेन कंडक्टरचें टेबल येतें व दुसरीं दोन बांकें सार्वजनिक असतात. आजच्या गाडींतल्या गर्दीमुळें हीं सगळीं बांकें भरलीं होतीं. ट्रेन-कंडक्टरनें देखील उठून कांहीं काळ्या मडमांना जागा दिली होती. मालती लोणावळ्याला गाडींत चढली, तेव्हांपासून पांच मिनिटें शोधल्यानंतरच या लहानशा खोराडांतल्या एका बांकावर एक सीट तिला मिळाली.

थोडा वेळ पुस्तक वाचल्यानंतर समोरच्या बांकावरील दोघांकडे तिनें चोरून पाहिलें; त्यांतल्या एका माणसाकडे पुन्हां न्याहाळून पाहिलें. त्याची तिची नजरानजर झाली. तिनें स्मित करण्यास सुरवात केली, पण त्या माणसानें मुद्रेंत फरक केला नाहींसें पाहून, तिच्या स्मिताचें रूपांतर थोड्या रुसव्या मुद्रेंत झालें. अखेर ती धीटपणें म्हणाली,

"प्रभाकरपंत, तुमची ओळख द्यायची इच्छाच दिसत नाहीं–कां जुन्या ओळखी इतक्या लौकर विसरतां तुम्हीं?"

त्या मनुष्याच्या मनांत थोडी चलबिचल झाली, पण अखेर नाइलाजानें अर्धवट खोटें हंसू चेहऱ्यावर आणून तो म्हणाला,

"मालती—मालतीबाई उरणकर! नीट 'नमस्ते' करतां येत नाहीं म्हणून रागावूं नका—माझा हात अडला आहे थोडासा." खिन्नपणें हांसून त्यानें उजवा

हात थोडा उचलला—त्याचबरोबर शेजारच्या माणसाचाही डावा हात उचलला गेला–दोघांचेही हात हातकडीनं एकेठिकाणीं जखडलेले होते.

मालतीच्या डोळ्यांतला स्निग्धपणा एकाएकीं नाहींसा झाला, तेथें आश्चर्य व भीति यांची छाया दिसूं लागली. गालांतले गुलाब ओमरून चेहरा गोरामोरा झाला. तिच्या ओठांतून शब्द फुटेना. समोर दिसणारा प्रकार तिच्या निष्पाप मनाला संभवनीय देखील वाटत नव्हता. साध्या पण उंची कपड्यांत सजलेल्या तिच्या मूर्तीवर अशा दुःस्वप्नाची कधीं छायाही पडली नव्हती.

इतक्यांत प्रभाकराच्या शेजारचा मनुष्य बोलला, "बाईसाहेब, बोलण्याची माफी करा. पण फौजदारसाहेबांची व आपली ओळख दिसते. माझी गरिबाची त्यांच्याजवळ जरा शिफारस करा, ते मला येरवड्याला नेत आहेत. पैसे खाल्ल्या-बद्दल सात वर्षं काढायचीं आहेत मला तिथें. फौजदारसाहेबांना शब्द टाकला तर वॉर्डर मला चांगलं वागवतील म्हणून अर्ज आहे कीं यांना सांगा माझ्या तर्फेनं—"

हें ऐकतां ऐकतां त्या मुलीचा नूर हळूहळू पहिल्याप्रमाणें झाला. कौतुक व स्नेह आवाजांत एकवटून ती म्हणाली,

"तुम्ही ! फौजदार झालांत ?"

प्रभाकरानेंही शेजाऱ्याच्या भाषणाच्या अवधींत मन खंबीर बनवून ठेवलें होतें. किंचित् हंसून तो म्हणाला, "काय करणार ? पैशाला एकदां ओहोटी लागली कीं मुंबईचा बडेजाव किती दिवस टिकणार ? वरळी, मलबार हिल, नाटक, सिनेमा, मित्रा-कडे जाणीयेणीं–हें सगळं खर्चाचं काम आहे. तें एखाद्या बॅरिस्टरला साधतं–त्याच्याशीं टक्कर देण्याची ताकद आपल्यांत—"

"बॅरिस्टर गेले चुलींत," ती मुलगी थोडी चिडून म्हणाली. "तुम्हीं येणंजाणं सोडलंत म्हणून बॅरिस्टरचं फावलं—पण त्यांना कोणी विचारीत नव्हतं; तुम्हांला पक्कं माहित होतं तें. तुम्ही दिसेनासे झाल्यापासून मंडळींत कांहीं मजा राहिला नाहीं आतां—"

तिची नजर पुन्हां त्या हातकड्यांवर गेली. प्रभाकराचा शेजारी म्हणाला,

"त्यांत कांहीं दुःख नाहीं बाईसाहेब, सगळे पोलीस अम्मलदार कैद्याला जेल-मध्यें पोंहोंचवायला असाच घेऊन जातात."

थोड्या वेळानें मालतीनें विचारलें, "मग, तुम्ही आपल्या जुन्या मंडळींत कधीं परत येणार कीं नाहीं आतां !"

"कठीणच दिसतं आहे." प्रभाकर म्हणाला, "माझे चैनीचे दिवस संपले आहेत आतां."

"पोलिसांतली नोकरी देखील मोठी आवडते मला. रुबाबदार निधड्या छातीच्या लोकांची—"

तिच्या तिरकस नजरेला नजर भिडवायचें त्यानें नाकारलें; तिच्या आरक्त गालांकडे त्यानें मुद्दाम डोळेझांक केली.

तिनें खिडकीच्या बाहेर पाहून शून्य मुद्रेनें म्हटलें, "आमच्या घराचा अगदीं कंटाळा आला आहे मला. आई व बाबा सारखे भांडत असतात, त्यापेक्षां कुठेंतरी दुसरीकडे राहून कुणाच्या तरी घरकुलांत मन घालावसं वाटतं—" तिनें त्याच्याकडे पाहून पुन्हां बाहेर पाहिलें, कपाळाला एक बारीक आठी घालून ती हळू म्हणाली, "पण लोक इतके आडमुठे आणि बथ्थड असतात कीं त्यांच्या डोक्यांतच कांही शिरत नाहीं—"

"फौजदारसाहेब" प्रभाकराचा शेजारी मधेंच म्हणाला, "मला तहान भारी लागली आहे, विडी पण ओढायची आहे. इतका वेळ एके ठिकाणीं ठेवलंत—आतां चला कीं जरा त्या चहाच्या डब्यांत—"

दोघेही उठले. प्रभाकर औपचारिकपणें हंसून म्हणाला, "विडीचा धूर म्हणजे दुर्दैवी प्राण्याचा एकुलता एक सोबती, तो नाहीं म्हणणें म्हणजे अमानुष आहे—जातों आतां आम्हीं तिकडे—"

तिनें आपल्या चेहऱ्यावर तितकाच औपचारिक भाव आणला, "ठीक आहे, मग पुन्हा भेट क्वचित्‌च म्हणायची—"

प्रभाकरानें नुसती मान डोलवली. ती जखडलेली जोडी निघून गेली.

दुसऱ्या बाजूच्या बांकावरचा एक दुसऱ्याला हलकेच म्हणाला,

'खिलाड्डू आहे तो जमादार मोठा—'

'जमादार का फौजदार?' त्याच्या शेजाऱ्यानं विचारलें.

'जमादार—वाहवा तुमच्या कांहींच लक्षांत नाहीं आलें म्हणायचं. तो तिकडचा तो जमादार—'

'मग फौजदार म्हणत होता तो कोण?'

'तो! वा, वाचलं नाहीं का पेपरमध्यें? फोटो पण आला होता; तो प्रभाकर तुरंबेकर, जॉन बुल बँकेचा कॅशियर—सात वर्षं गेला आहे—अफरातफरीबद्दल...'

## .१२. झोंपीं गेलेला जागा झाला

अफूच्या अर्कासारखें– मॉर्फियासारखें–धोकेबाज औषध डॉक्टरनें जपून तर वापरायला पाहिजेच, पण तें ठेवण्याच्या जागेबद्दलही फार जपलें पाहिजे. सहज कोणाच्या हातीं लागेल अशा ठिकाणीं तें टाकणें म्हणजे लोकांचा जीव व आपली 'अब्रु धोक्यांत टाकणें आहे. डॉ. सदानन्दांना हें ठाऊक नव्हतें असें नाहीं; नेहमीं ते फार काळजीपूर्वक जागच्या जागीं अशीं औषधें ठेऊन द्यायचे. कांपौंडरच्या हद्दींत व्रात्य पोरें केव्हां शिरून नसते उपद्व्याप करतील याचा नेम नसायचा, व तो 'चन्द्रापीड' कवि पंधरा पंधरा दिवसांनीं वेगवेगळ्या प्रेमनिराशेमुळें आत्महत्ये-साठीं विषाची याचना करायचा, त्यामुळें तर डॉक्टर आपल्या जहरी व अमली रसायनांबद्दल जास्तच दक्ष असायचे. व्रात्य पोरांना रंगीबेरंगी टिपकागद देऊन व कवीला विषाऐवजीं रेचक पाजून वाटेला लावण्याची त्यांना संवय पडली होती.

पण जन्मभर जपून राहणारा माणूस देखील एकादे वेळीं सपशेल घसरतो, वेळ येते ती कधीं सांगून येत नाहीं, व डॉक्टर झाला तरी मानव, अतएव स्खलनशील असतो; तेव्हां डॉक्टर सदानंदाच्या दवाखान्यांत त्यांच्या एका स्नेह्यानें चुकून भलतेंच औषध प्राशन केलें, हा केवळ योगायोगाचाच खेळ म्हणायला पाहिजे.

रात्रीं पावणेनऊ वाजले होते. कांपौंडर त्या दिवशीं आला नसल्यामुळें सगळीं औषधें डॉक्टरांनीं स्वतःच तयार करून रोगी वाटेला ( अर्थात् घरच्या ) लावले होते. सारखे बाटल्यांच्या भिंतीआड उभे राहून कंटाळल्यामुळें ते एक सिगारेट ओढायला बाहेर आपल्या खुर्चीवर येऊन बसले होते. थोड्याच वेळांत दवाखाना बन्द करून आंत आपल्या खाजगी मकाणांत प्रविष्ट होण्याचा त्यांचा विचार

होता. तितक्यांत त्यांचा जुना स्नेही नाना कापरे ( आतां मे. सरदार नानासाहेब कापरे, जहागिरदार, चारपाई ) दत्त म्हणून दवाखान्यांत येऊन उभा राहिला. तीनचार महिन्यांनीं पुराण्या दोस्ताची भेट झाल्यमुळें जवळजवळ दहा वाजेपर्यंत धूम्रपानाच्या सांथीसह गप्पागोष्टी झाल्या.

मधेंच जरा खोकून खाकरून कापरे म्हणाला, "सर्दी फार झाली आहे भैय्या, क्विनाइन दे थोडं—"

"थोड्याशा क्विनाइननें काय होणार आहे ? तुझ्यासाठीं म्हणजे पौंडाचे पुडेच मागवायला पाहिजेत–कां परेळला जातोस व्हेटर्नरी हॉस्पिटलमध्यें ?"

कापऱ्याच्या देहाची चेष्टा डॉक्टर कॉलेजच्या दिवसांपासून करीत असे. पक्का पावणेदोनशें पौंड वजनाचा मजबूत गडी, पण तितकाच खेळाडू आणि दिलदार, मोठा उमदा जवान ! तो मेडिकल कॉलेजचीं दोन वर्षें पुरीं करण्याच्या आंतच कोर्स सोडून जेव्हां गेला, तेव्हां त्याच्या दोस्तांना मोठी हळहळ वाटली होती. तो गेला होता दत्तक जाण्यासाठीं; माळव्याकडच्या कुठल्याशा संस्थानाची स्कॉलरशिप घेऊन कॉलेजांत आला होता, पण चारपाई जहागिरीला वारस नव्हता व हा जुन्या जहागिरदाराचा भाऊबंद, म्हणून संस्थानानें यालाच दत्तक बनवून जहागिरदार केला होता. स्वारी मुंबईत वरचेवर यायची. शहराच्या जादूनें पुरता भारला होता तो; त्याची सगळी मित्रमंडळी मुंबईला, परत माळव्यांत मोठ्या मुष्किलीनें जायचा तो ! या खेपेला आल्यासारखा सरळ तो सदानंद डॉक्टराकडे आला होता.

"मस्करी नाहीं—फार सर्दी झाली आहे, तूं देत नसलास तर मीच उठून घेतों" कापरे उठून म्हणाला.

"जा घे" डॉक्टर जागेवरूनच आळसानें जांभई देऊन बोलले. "पुढेंच बाटली असेल—सायरप आणि पाणी घालून मिक्श्चर कर आणि पी."

थोड्या वेळानें कडू तोंड करून कापरे बाहेर आला. एक सिगारेट पेटवून पुन्हां त्यानें गप्पा सुरू केल्या...

दहा मिनिटांचे आंत तो झोपीं गेला !

डॉक्टरनीं एकदां आश्चर्यानें त्याच्याकडे पाहिलें, नंतर उठून पार्टिशनच्या आड

जाऊन पाहिलें. कांपौंडरच्या टेबलावर मॉर्फीनची बाटली होती–तिचें बूच देखील कापऱ्यानें नीट बसवलें नव्हतें.

बाहेर येऊन सदानन्द पुटपुटले,

" बिनडोक माणूस ! श्रीमंती आल्यावर अक्कल गेली ! "

सदानन्दांनीं शेजारच्या दुसऱ्या एका डॉक्टरला झोपेंतून उठवलें व त्याला स्पेशॅलिस्टाला घेऊन येण्यास पाठविलें. सदानन्दासारख्या एकट्या होतकरू डॉक्टर-वर भागण्याइतका कापरे आतां दरिद्री राहिला नव्हता.

स्पेशॅलिस्ट आल्यावर तो, शेजारचा डॉक्टर व सदानन्द या तिघांनीं मिळून त्यांच्या धंद्यांतले शक्य तितके जास्त खर्चाचे उपचार त्या गुंगींत पडलेल्या सरदा-रावर केले. त्याला नाना प्रकारचीं औषधें पाजलीं, कॉफी ढोंसवली, दोघांच्यामध्यें धरून चालवलें, त्याला हालवला, धक्के दिले, चिमटे घेतले, श्रीमुखांत दिल्या—थोडक्यांत म्हणजे तिघां डॉक्टरांचें मिळून तीन आंकड्यांचें तरी बिल होईल इतकी मेहनत त्यांनीं त्या धनाढ्य रोग्यावर घेतली. शेवटची सलामी म्हणजे शेजारच्या डॉक्टरनीं चांगलें तीनचार पाऊलें मागें जाऊन पुन्हां वेगानें पुढें येऊन, सदानन्द व स्पेशालिस्ट हे आपल्यामधें धरून चालवीत असलेल्या त्या सुस्त पाहुण्याच्या पृष्ठभागावर एक जोराचा लत्ताप्रहार केला; नंतर हलकेच सदानन्दांना तो म्हणाला,

" डॉक्टर, माफ कर हं, पण, जन्मांत कधीं श्रीमंत सरदाराला लाथ मारायची संधि मला मिळाली नव्हती, पुन्हा सुद्धां अशी पर्वणी यायची नाहीं कधीं. "

दोन तासाच्या उपचारानंतर स्पेशॅलिस्टनें कोट घातला; " बस्स, आतां आणखी एक तासभर त्यांना जागे ठेवा, झोंपायला लागले तर हालवीत जा व सारखें बोलत रहा, श्वासोश्वास आणि नाडीचे ठोके नेहमींप्रमाणें आले म्हणजे मग झोंपूं द्या ! " त्यानें सांगितलें.

ते दोघे निघून गेले व सदानन्दांनीं मित्राला जागें ठेवण्यासाठीं बोलायला सुरवात केली.

" सरदार नानासाहेब कापरेसाहेब, जान बची, लाखों पाये ! अरे शहाण्याच्या कांद्या तुला कोणत्या मास्तरनें स्पेलिंग शिकवलें ? क्विनाइन हा ' मॉर्फीन ' चा उच्चार

आहे अशी तर तुझी समजूत नाहीं ? दोन वर्षें मेडिकल कॉलेजमध्यें शिकून अशी त्या कॉलेजची अब्रू घालवतोस काय? फार हुशार बुद्धि आहे तुझी. केमिस्टचें दुकान घाल म्हणजे प्रिस्क्रिपशन्स चांगलीं तयार करशील ! ”

जड डोळ्यांनीं व प्रसन्न मुद्रेनें नानानें सदानन्दाकडे पाहिलें,

“ आ–हा–हा ! अं ऽऽऽऽऽ हा—काय मजा आला आहे ! जो ऽप आली आहे चान् अगदीं ! निजतोय्... ”

आणि तो कुशीवर निजून पुन्हां गाढ झोपीं गेला !

त्याला सदानन्दांनीं गदगदां हालवलें.

“ ऊठ, नाना, आतांच स्पेशॅलिस्ट सांगून गेला, इतक्यांत झोंपी जाण्यांत फार धोका आहे, उठून बैस—” ते त्याला उठविण्याचा प्रयत्न करीत म्हणाले. पण नाना कापरे म्हणजे पावणेदोनशें रतली असामी ! त्याला उठवून बसवणें आणि पिसा येथील झुकता मनोरा सरळ करणें सारखेंच.

तो घोरूं लागला. सदानन्दांनीं विचार केला, याच्या अवाढव्य शरीराला चेतना आणण्यापेक्षां याच्या मनाला चेतवलें पाहिजे म्हणजे तो खाडकन् उठून बसेल. त्याला चिडवायला हवें, संताप आणावा.

पण त्याला चिडवणार कशाबद्दल ? त्याच्यामधे डिवचण्यासारखा एकहि दोष नव्हता. तो अस्सल मर्द प्राणी होता. साधासीधा, शुद्ध हेतूनें वागणारा, कोणाच्याहि वाटे न जाणारा, आपली जबाबदारी ओळखून राहणारा–चैनी खरा, पण पण चंगीभंगी नव्हे, स्त्रियांबद्दल फारच उच्च भावना होत्या त्याच्या—

बस्स ! आठवली युक्ति ! सदानंदांनीं पुन्हा त्याला चांगला घुसळला; तो महत्प्रयासानें डोळे उघडून पाहायाला लागल्यावर डॉक्टरांनीं आपल्या चेहऱ्यावर शक्य तितका तिरस्कार आणला व तुच्छतेच्या कठोर आवाजांत ते उद्गारले,

“कापरे, नीट लक्ष देऊन ऐक. इतके दिवस आपण चांगले दोस्त होतों, पण आतां यापुढें तुझ्यासारख्या नीच माणसाला दारांतसुद्धां उभा करण्याची माझी इच्छा नाहीं. ” सदानन्दांनीं आपलें बोट अगदीं त्याच्या नाकाजवळ नेलें.

नानाच्या डोळ्यांत किंचित् तरतरी आली, आळसलेल्या आवाजांत त्यानें विचारलें,

"कां बाबा, काय झालंय् काय तुला ?"

"तुला शरम वाटायला पाहिजे," सदानन्दांनीं तीक्ष्ण आवाजांत पुढें म्हटलें, "तुझ्या तिकडच्या एका निष्पाप पोरीला फसवलेंस, गोड गोड शब्द बोलून तिला खोटी आशा लावलीस आणि आतां तुला श्रीमंती आल्यावर तिला झिडकार-लीस. मेडिकल स्टूडंट असतांना ती तुला देवता वाटत होती आणि आतां जहागि-रदार झाल्यावर तुला तिची लाज वाटायला लागली. तुझी नजर फिरली. माज आला तुला—" त्याचे डोळे थोडथोडे मोठे व्हायला लागले होते, पण मॉर्फियाचा अमल त्याला हालणें मुष्कील करीत होता. तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला,

"एऽऽऽ, चूप, नाहीं तर डोकं फोडून टाकीन तुझं—" उठण्याचा प्रयत्न करून तो पुन्हां मागें कोचावर पडला. तो नुसता लाल डोळ्यांनीं सदानन्दांकडे पाहात पडून राहिला. सदानन्द शक्य तितका निर्विकार चेहरा ठेवून खोलींत येर-झाऱ्या घालूं लागले.

नानाला पुन्हां झोंप लागली. पुन्हां सदानन्दांनीं जवळ जाऊन त्याच्या एक श्रीमुखांत भडकावली. नाना डोळे उघडून संतुष्ट मुद्रेनें पाहूं लागला. सदानन्द दांतओंठ खात म्हणाले,

"तूं शुद्धीवर आलास म्हणजे ताबडतोब येथून चालता हो. माझ्या दारांत तुझी सांवलीसुद्धां नको. तुला कांहीं अब्रू, स्वाभिमान असेल तर मला कधीं तोंड दाखवूं नको—सभ्यपणाचा संपर्क नाहीं तुला, ती मुलगी खेडवळ, गरीब म्हणून तुला तिचा वीट आला, तुझ्या शेजारीं मोटारींत शोभायची नाहीं ना ! थुः तुझ्या संपत्तीवर ! तूं पशूदेखील नाहींस, क्षुद्र कीटक आहेस !"

इतकें बोलून सदानंदांनीं पाठ फिरविली. मागें त्यांना कांहीं आवाज ऐकूं आला म्हणून चटकन् वळून पाहिलें; नाना उठण्याची व्यर्थ धडपड करीत होता, तो अडखळत पण संतापानें बोलला, "वाटेल त्या—खोट्यानाट्या गोष्टी—थांब, मला उठूं दे, तुझ्या नरडीचा घोंट घेतों—"

त्याची स्थिति पाहून सदानन्दांना थोडें वाईट वाटलें, पण त्यांनीं केलें तें नानाच्या हितासाठींच केलें होतें. उद्यां सकाळीं सगळा खुलासा करून टाकून दोघां-नाहि हंसायला विषय झाला असता.

पंधरावीस मिनिटांनीं कापरे गाढ झोंपी गेला. त्याचा श्वासोश्वास व नाडी ठीक चालत होती. तो संकटांतून पार पडला होता. सदानन्दहि आपल्या खोलींत जाऊन झोंपले.

सकाळीं तो जागा होण्याच्या आंत नाना उठून कपडे वगैरे घालून तयार झाला होता. तो बराच ताजातवाना दिसत होता. चहा घेतांना त्यानें थोडा शरमिंदा चेहरा करून विचारलें,

"फार वेळ लागला का मला शुद्धीवर यायला ? मी बाटलीवरचं लेबल नीट पाहिलंच नाहीं."

सदानंदांनीं हंसून उपचाराचा सर्व इतिहास सांगितला. नंतरचें मात्र कांहीं सांगितलें नाहीं. नानाला कांहींच नीटसें आठवत नव्हतेंसें दिसलें. सदानन्दांनींहि तूर्त कांहीं सांगूं नयेसें ठरवलें.

चहा पिण्यानंतर उठून जाण्याच्या वेळीं दारांत उभा राहून नाना म्हणाला,

"सदानन्द, फार तकलीफ पडली तुला माझ्यामुळें; उतराई आहें मी तुझा; तुझ्या 'ट्रीटमेंट' मुळें मी शुद्धीवर आलों. माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. जातों मी आतां—त्या खेड्यांतल्या पोरीकडे! आणि महिन्याच्या आंत येतों तुला भेटायला सहकुटुंब..."

## १३. ‘ तरुणी शिक्षण नाटिका ’

जव्हेरभाई वेलजीशेठ वाळकेश्वरला आपल्या टोलेजंग हवेलींत रहात असत. त्यांचा धंदा शेअरबाजारांत दलालीचा होता व ते आतां इतके गब्बर झाले होते कीं त्यांना तब्येत दुरुस्त ठेवण्याकरतां पायीं चालावें लागत असे. रोज बंगल्यापासून चांगले आपल्या मोटर गॅरेजपर्यंत ते रपेट करीत जात असत. मनू म्हणून त्यांचा एक मानलेला मुलगा होता. निपुत्रिक म्हणवून घेण्याच्या भीतीनें दूरच्या नातेवाईकाचा हा मुलगा त्यांनीं बाळगला होता. पण तो शेठजींचा धदा शिकायला न जातां चित्रें काढण्याच्या नादांत असे व त्याचें वास्तव्यहि कोटांत एका स्वतंत्र खोलींत असे. घरांत एक मुलगी होती मंदाकिनी म्हणून. ती शेठजींच्या मरहूम पत्नीची भाची, पोरकी पोर म्हणून त्यांनीं बाळगली होती. स्वतःचा संसार किंवा कांहीं व्याप नाहीं म्हणून हा उपरी प्रपंच शेठजींनीं जाणूनबुजून मागें लावून घेतला होता.

मनू व मंदा यांच्यांत पांच वर्षांचें अंतर होतें. त्या घरांत आपापसांत साधारण अशी समजूत होती कीं शेठजींच्या मागें शेठिया–शेठाणी म्हणून या दोघांनीं घर चालवायचें. दोघां तरुण मंडळीचें सामान्यतः पटत असे. मनूचा स्कूल ऑफ आर्टचा कोर्स पुरा झाला, त्याच सुमाराला चंदारामजी हायस्कूलमधून मॅट्रिक होऊन मंदा एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें गेली. याच सुमाराला एक भानगड उपस्थित झाली.

जव्हेरभाईचा भाऊ किकाभाई म्हणून होता. तो आपलें कडीप्रांतांतलें खेडें सोडून मुंबईला न येतां गांवींच शेतीवाडी व व्यापार उदीम करून पोट भरण्या-

साठीं राहिला होता; पण गेल्या वीस वर्षांत जास्तजास्तच खालावत गेल्यामुळें अखेर संन्यास घेऊन गिरनार पर्वतांत तो निघून गेला व ठेव म्हणून मुंबईस भावाकडे आपली मुलगी गंगागौरी त्यानें पाठवून दिली ! जव्हेरभाई म्हणजे गरीबगुरीब नातेवाइकांचा चालताबोलता अनाथाश्रमच बनले होते. त्यांच्या आश्रित मंडळींत आणखी एक माणसाची भर पडली इतकेंच !

सेन्ट्रलवर तिला आणायला शेठजी, मनु व मंदा अशीं सगळीं गेलीं होतीं. गुजराथ मेलमधून एक काळीसांवळी पण अंगापिडानें बांधेसूद व चमकदार डोळ्यांची तरुण मुलगी उतरली. ती एक चिटाचें पातळ नेसली होती व एक गाठोडें तिच्या हातांत होतें. मोठी तडफदार व स्वतंत्र वृत्तीची दिसली ती. सगळ्यांची आपापसांत ओळख झाल्यावर मंडळी घरीं बंगल्यावर गेली.

मुंबईला काकांच्याजवळ येऊन राहिल्यानंतर चार सहा महिन्यांत गंगागौरी सगळें कांहीं शिकली. उंच टाचांच्या चपला, जॉर्जेटचीं पातळें, बिनबाह्यांचे ब्लाउज, पावडर, व्हॅनिटी बॅग, छत्री, बॉब केलेले केस वगैरे भूषणांत ती मंदापेक्षां एक पाऊलहि मागें राहिली नाहीं. या सगळ्या गोष्टी मंदाच्या नाजुक फिकट सौंदर्याला जितक्या शोभत होत्या त्यापेक्षां कांकणभर जास्तच गंगाच्या राकट पण सुदृढ देहावर खुलून दिसत होत्या. जव्हेरभाईना तर या अवधींत आपली पुतणी मानलेल्या मुलांपेक्षां किंवा बायकोच्या भाचीपेक्षां जास्तच लाडकी वाटायला लागली होती. तिचा मनमोकळा, अल्लड पण तल्लख स्वभाव त्यांना फार पसंत पडला होता. मनूचें येगेंजाणेंहि अलीकडे वाढलें होतें.

उलट मन्दा मात्र गंगाशीं पहिल्याइतकी सलगीनें वागत नव्हती.

एके दिवशीं हॉलमध्यें सकाळीं नवाच्या सुमारास शेठजी 'समाचार' वाचीत बसले होते. गंगा कांहींतरी विणीत कसलेंसें गरबा-गीत गुणगुणत तेथेंच बसली होती. इतक्यांत रामानें तिच्या हातांत एक पाकीट आणून दिलें.

"मनूशेठच्या मानसानं चिठी आनल्यान् तुमच्यासाठीं—"

तिनें पाकीट फोडून पत्राकडे बराच वेळ पाहिलें. नंतर वर पाहून ती म्हणाली,

"काका, मनुभाई सारो माणस छे ने ?"

शेठजी उद्गारले, "अलबत्, माझ्या घरांत माझ्या मुलासारखा वाढवला आहे मी त्याला—"

"मग तो एखाद्या मुलीला पत्रांत कांहीं चमत्कारिक गोष्ट कधीं लिहिणार नाहीं-नाहीं का?"

शेठजींनीं वर्तमानपत्र टाकलें, ते ताठ उठून बसले.

"त्याची काय हिम्मत लागली आहे?—सीधा करून टाकीन! कां—थयूं सूं?"

"हें पत्र पहा. तुम्हांला ठीक वाटतं ना हें? शहरची चालरीत मला ठाऊक नाहीं."

घाईघाईनें तें पत्र शेठजींनीं तीन चार वेळां वाचलें व वर पाहून विस्मित मुद्रेनें ते म्हणाले, "केम? एमां मने कई खोटूं लागतूं नथी—मला एकदम घाबरवलंसच तूं! संध्याकाळीं तूं आणि मंदा यांना मोटारींतून जुहूला घेऊन जाण्याबद्दल लिहिणें यांत काय वावगें आहे?"

"मी जाणं बरं दिसेल ना?"

"अर्थात् त्यांत काय आहे? तरी पण तूं इतकी खबरदार आहेस हें पाहून मला फार संतोष होतो. जरूर जा त्याच्याबरोबर."

"तुम्हीं याल?"

"छे छे छे! नाहीं रे बाबा, त्या मन्यानें एकदां जोरांत मोटर काढली कीं माझे प्राण कंठांत येतात!"

गंगानें रामाला हांक मारली व मनूशेठच्या गड्याबरोबर, आम्हीं दोघी पांच वाजतां तयार राहतों म्हणून निरोप पाठवला.

शेटजी म्हणाले,

"पोरी एक चिठीच पाठव लिहून—"

गंगा हांसली,

"एवढ्याशा कामासाठीं चिठी कशाला?"

एक दोन महिने उलटले. वाळकेश्वराच्या टोलेजंग बंगल्यांत मंदाकिनी एकटीच रेडिओ ऐकत बसली होती. शेटजी गंगाला घेऊन कुठल्याशा देशी 'फिल्म' ला गेले होते. दहा वाजायला आले. रेडिओमध्यें मंदाला कांहीं गोडी वाटत नव्हती. तिनें उठून तो बंद केला व कोचावर एक कादम्बरी घेऊन ती पडून राहिली. तिला

विचार करायला खूप वेळ मिळाला होता; पण तिचे विचार मोठेसे आल्हाददायक नव्हते. हळू हळू आपण मागें पडत आहोंत ही जाणीव कोणत्या बुद्धिमान् सुंदर तरुणीला आल्हाद देईल? डोळ्यांदेखत आपल्या लहानपणापासूनच्या सवंगड्याचें मन आपल्यादेखत एकाद्या आगंतुक माणसावर जावें, केवळ नाविन्याच्या, शरीर-सौष्ठवाच्या, बहरलेल्या तारुण्याच्या आकर्षणापुढं बुद्धि, संस्कार, नाजुक सौंदर्य, यांचें सौम्य तेज लुप्त व्हावें, हें कटु सत्य पटवून घेण्याचा प्रसंग मंदाकिनीवर आलेला होता.

हॉलच्या टेबलावर एक पाकीट पडलेलें होतें. मनू नेहमीं याच प्रकारच्या पाकि-टांत चिठ्या पाठवीत असे. त्या पाकिटावर गंगागौरीचें नांव होतें—काय असेल त्या पाकिटांत? त्यांतला मजकूर कळण्यासाठीं मंदानें आपल्या मोत्याच्या बांगड्या देऊं केल्या असत्या. तें उघडायचा तिला अनिवार मोह होत होता—मनूनें गंगाला काय लिहिलें असेल? वाफेवर धरून पाकीट उघडण्याइतका मनाचा हलकेपणा तिच्यांत नव्हता—पुन्हां उघडकीस आलें तर केवढी छीथू व्हावयाची!

इतक्यांत बाहेर मोटरचा आवाज आला व हॉलच्या घड्याळांत आठाचा ठोका पडला. जव्हेरभाई मोटरींतून उतरले व खोकत खोकत हॉलमधून थेट वर आपल्या शय्यागृहाकडे गेले. गंगा मात्र तिथेंच बोलत उभी राहिली. पाहिलेल्या बोलपटाची तिनें चिकित्सा चालवली होती. एकदोन औपचारिक वाक्यें बोलून मंदा म्हणाली,

"हें तुझं एक पत्र आलं आहे—"

गंगा उभ्याउभ्याच आपले अलंकार उतरायला लागली होती. तिनें विचारलें,

"कुणाचं आहे?"

"मला वाटतं मनूकडून आलं आहे."

"काय लिहिलं आहे त्यानं कुणास ठाऊक?"

"मींहि तेंच म्हणत होतें—हें घे" म्हणून मंदा तिच्याकडे पत्र टाकणार, इतक्यांत गंगा म्हणाली—

"हां, थांब, काय त्रास आहे या इयररिंगचा, निघतां निघत नाहीं—केसांत अडकलं वाटतं! मंदाब्हेन, तें पाकीट फोडून पहा ना काय लिहिलं आहे तें—"

मंदानें डोळे फाडून विचारलें, "काय? मनूनं तुला लिहिलेलं पत्र मी उघडून वाचूं? तुझं पत्र तें, तुझ्याशिवाय कोणी वाचलेलं कसं चालेल?"

"कां ? मला येणारीं पत्रं कुणीहि वाचावीं अशीं असतात, गुप्त कांहीं नाहीं त्यांत—वाच ना; उद्यां पुन्हां मोटरमधून फिरायला जायला बोलावीत असेल आपल्याला—"

मोठ्या कष्टानें चेहरा निर्विकार ठेवून मंदाकिनीनें हळूहळू तें पत्र उचलून फोडलें,

" बरं, तूंच म्हणतेस तर—"

कागद उघडून चटकन् तिनें एकदोनदां मजकुरावरून दृष्टि फिरवली, एकदां तीक्ष्ण दृष्टीनें गंगाकडे पाहिलें; गंगा इयररिंग काढण्याच्या उद्योगांत गढली होती.

चमत्कारिक स्मिताची एक रेषा मंदाकिनीच्या चेहऱ्यावर चमकून गेली-जसें कांहीं गंगाचें आव्हान तिनें स्वीकारलें. पुन्हां एकदां पत्राकडे पाहून तिनें वर पाहिलें, किंचित् हलक्या आवाजांत ती म्हणाली—

" खरंच-गंगा, हें पत्र मीं वाचायला नको होतं-एकव्या तुझ्याशिवाय कोणी-कोणी पाहण्यासारखं नाहीं आहे तें—"

एक पळभर इयरिंग विसरून गंगा उभी राहिली, " मग वाचच मोठ्यानं, मनांतल्या मनांत वाचलं आहेसच एकदां-मग मोठ्यानें वाचण्यासारखं जर कांहीं लिहिलं नसेल तर तें मीं मुद्दाम सर्वांना दाखवीन-वाच. "

" ऐक तर मग—

' प्रिय गंगा, आज रात्रीं अकराच्या पुढें माझ्या खोलीवर ये-तुझी वाट पाहीन-

तुझा मनू '

"—मला खरंच वाईट वाटलं हें वाचून, मनूला झालं आहे तरी काय ? माझ्या-बद्दल तूं निर्धास्त रहा. मी कोणाजवळ बोलणार नाहीं-बरं जातें आतां झोपायला. जरा बरं नाहीं मला. "

मंदाकिनी जिना चढून गेली. गंगानें घड्याळ पाहिलें. अकरा वाजत होते. ती सरळ बंगल्याच्या बाहेर पडली !

तिनें अंगावरचे दागिने काढून हॉलमधल्या टेबलाच्या एका खणांत टाकले होते. ती झपाझप चालत निघाली.......

...चौपाटीपाशीं एक मैल–कांहीं भग्ये लोकांत थोडा विनोद होऊन हास्याच्या लकेरी उडाल्या...ठाकुरद्वारपाशीं एका पोलिसानें वाकडी मान करून बराच वेळ झपाट्यानें एकट्या जाणाऱ्या या तरुण बाईकडे पाहिलें...प्रिन्सेस स्ट्रीट अडीच मैल–एक सूट बूटवाल्या तर्र झालेल्या इसमानें, अतिप्रसंगाबद्दल गंगाच्या हातची झणझणीत श्रीमुखांत खाल्ली...मरीन लाइन्स स्टेशनच्या जरा पुढें दोन मवाली काहीं गडबड करण्याच्या बेतांत होते, पण चवताळलेल्या वाघिणीसारखी गंगाची मुद्रा पाहून ते मुकाट्यानें वाटेला लागले....चर्चगेट स्टेशनपर्यंत अगदीं निर्जन रस्ता होता पण ती चाललीच होती. ती मोटरनें इतरांबरोबर नेहमीं मनूच्या खोलीवर येत असे, तोच एक रस्ता तिला माहीत होता, त्याच रस्त्यानें ती जात होती. चर्चगेटजवळ उंच टाचांच्या चपला फेकून देऊन ती अनवाणी चालूं लागली...

साडेबाराच्या सुमारास 'कॅनव्हस'वर एका मोठ्या दिव्याचा प्रकाश पाडून मनूचें रंगकाम चालूच होतें. दारावर थापा ऐकून त्याला आश्चर्य वाटलें, पण दार उघडल्यावर बाहेर उभी असलेल्या गंगाला पाहून वाटलेल्या आश्चर्यापुढें तें कांहींच नव्हे. एक मिनिटभर तो स्तिमित होऊनच उभा राहिला.

थकलेली, घामाघूम झालेली, आरक्त गालांची चमकदार डोळ्यांची गंगा त्याला म्हणाली,

"मनू, मला कशाला बोलावलंस? ही मीं आलें—" मनूला कांहीं उमगेना, त्यानें विचारलें.

"माझी चिठी मिळाली तुला?"

"मिळाली, मंदाव्हेननें वाचून दाखविली–मीं गुंतलें होतें जरा–तरीपण 'रात्रीं अकरानंतर माझ्या खोलींत ये, तुझी वाट पाहतों आहें,' हे शब्द नक्की आठवत आहेत मला. मला वाटलं तुला कांहीं होतं आहे. पण तूं तर चांगला दिसतो आहेस–कशाला बोलावलंस?"

मनूनें तिला हात धरून आंत आणली, आराम-खुर्चीवर नीट बसवली, तिचे पाय दुसऱ्या एका खुर्चीवर ठेवले, पंखा चालू केला, तिला पाणी प्यायला दिलें. मग तिच्या अगदीं जवळ बसून तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो म्हणाला,

"गंगा, लाडके, माझ्याशीं ताबडतोब लग्न करण्यासाठीं बोलावलं मी तुला–

तुझ्याशिवाय एक पळभरदेखील राहवत नाहीं मला आतां. या रात्रीं, लग्नाला तयार आहेस का तूं ?"

गंगाचें उत्तर शब्दांनीं आलें नाहीं...

रात्रीं दोन वाजतां मित्रांच्या मदतीनें आर्यसमाजांत विधिपूर्वक त्याचें लग्न लागलें. खोलीवर परत येतांना टॅक्सींत मनूनें विचारलें,

"गंगा, त्या चिठींत खरं काय लिहिलं होतं माहीत आहे का तुला ?"

"असेल कांहींतरी," संतुष्ट आवाजांत ती म्हणाली, "ही आहे माझ्याजवळ ती चिठी, पण मला एक अक्षरहि लिहितांवाचतां येत नाहीं—खेड्यांत जन्म गेला माझा..."

# १४. नाटकी भाषा

काशिनाथ खूप श्रीमंत होता. विश्वनाथ दरिद्री होता. वास्तविक मुंबईच्या रहाणींत त्यांचा एकमेकांशीं संबंध येण्याचें कांहीं कारणहि नव्हतें; पण एके दिवशीं अचानक कॉलेजच्या दिवसांपासून तुटलेली त्यांची ओळख पुन्हां जोडली गेली.

ऐन मे महिन्याचे दिवस; मुंबईंत रहाणाऱ्यांना अगदीं शिजल्यासारखें होत होतें. ज्यांना शक्य होतें ते थंड हवेच्या ठिकाणीं गेले होते, आणि बाकीचे शेंकडा नव्याण्णव पूर्णांक नव्याण्णव शतांश, मुंबईंतच पंखे, बर्फ, चौपाटीवरची हवा इत्यादि उपायांनीं उकाड्याला तोंड देत होते.

काशिनाथाचीं सगळीं माणसें, सधन स्नेहीसोबती, वगैरे जवळची मंडळी माथेरानला गेली होती. त्याला मात्र मुंबईला कांहीं कामासाठीं पंधरा दिवस मागें राहणें प्राप्तच होतें. त्याचा जिच्याशीं प्रीतिविवाह ठरला होता, ती गुलाबसुद्धां आपल्या माणसांबरोबर माथेरानलाच गेली होती. तो मुंबईला अगदीं एकटा, उघडा पडला होता. त्याचा वेळ जातां जात नव्हता. स्वतःशीं चरफडत, सारखा वणवण भटकत तो दिवस मोजीत राहिला होता.

या स्थितींत त्याला चौपाटीच्या वाळूवर जेव्हां विश्वनाथ भेटला तेव्हां काशिनाथ त्याच्या अगदीं गळ्यांत पडला; त्या विरही जीवाला आपलें दुःख सांगायला कोणी सखा हवा होता. कॉलेजनंतर चारपांच वर्षांत विसरलेली ओळख त्यानें चारपांच मिनिटांतच पूर्ववत् करून टाकली. या हंगामी एकलकोंड्या आयुष्यांत एका स्नेह्याचा सहवास मिळावा म्हणून त्यानें विश्वनाथाला पाहुणचार, सरबराई, अगत्य वगैरेंची रेलचेल करून टाकली. दरिद्री विश्वनाथाला बरें वाटलें; पण या आदरातिथ्याबरोबरच आपल्या मित्राचे विरही निःश्वास व त्याच्या प्रेमदेवतेचीं वर्णनें ऐक-

ण्याचा प्रसंग आला तेव्हां तो समजून चुकला; आणि मित्राच्या कटकटीला उत्तर म्हणून विश्वनाथ त्याला आपल्या कविता वाचून दाखवूं लागला!

एका सायंकाळीं उष्मा फारच झाल्यामुळें काशिनाथ व विश्वनाथ चौपाटीवर व्हिआनेलीच्या गॅलरींत थंड पेयें पीत बसले होते.

हळूच काशिनाथानें एका सुंदर तरुणीचा फोटो आंतल्या खिशांतून काढून ग्लासाला टेकवून ठेवला; व 'अहाहा! गुलाब!' म्हणून तिच्याकडे खूष चेहऱ्यानें तो पाहूं लागला. जरा वेळानें तो विश्वनाथाला म्हणाला,

"खरं सांग विश्वनाथ, तूं इतकी सुंदर मुलगी पाहिली आहेस कधीं?"

"सुंदर आहे खरी—पण काशिनाथ, हें भावगीत ऐक, आवडेल तुला," आत्मसंरक्षणाचें शस्त्र, आपली कविता, खिशांतून काढीत विश्वनाथ म्हणाला.

"आतां आठच दिवस राहिले, ती मला भेटणार! मग माझ्यासारखा राजा नाहीं दुनियेंत!"

"पण माझी ही कविता तर पहा—"

"गुलाब! एकटी आहे बिचारी माथेरानला—आणि मी पडलों असा इथं! तरी पण माझा दोस्त गेला आहे नुकताच माझा निरोप घेऊन—"

"कोण?"

"मधुकर, आजच त्याचं पत्र आलं आहे कीं ती सारखी माझी आठवण काढीत असते म्हणून—"

"या कवितेंतही तसंच—"

"बरं वाच बुवा एकदां तुझी ती कविता! पण आपण आपलं मत मात्र खरें तें देणार हं—"

"अर्थात्—" म्हणून हलक्या आणि भावपूर्ण आवाजांत विश्वनाथानें आपलें भावगीत वाचून दाखविलें.

वाचणें पुरें झाल्यावर 'कां कसें आहे?' अशा चेहऱ्यानें त्यानें काशिनाथाकडे पाहिलें. काशिनाथ कांहींच बोलला नाहीं. पुन्हां विश्वनाथानें तोंडानें तो प्रश्न विचारला.

"रद्दी," त्याचा श्रीमंत मित्र उद्गारला.

"काय?"

" खरं मत सांगतों. या भावगीतांत तूं दुर्दैवी माणसाच्या तक्रारी लिहिल्या आहेस ना ? "

" नव्हे, ते नैराश्याचे पडसाद आहेत—"

" हेंच—हेंच म्हणतों मीं ! निराशेनें किंवा दुर्दैवाच्या फेऱ्यामुळं मनुष्य तूं लिहिल्यासारख्या नाटकी भाषेंत कांहीं बोलत नाहीं. "

" ती भाषा नाटकी नाहीं, उत्कट भावनेचा सहज स्रोत असतो तसा. रोजच्या व्यवहारांत कोणी बोलत नाहीं तसं, पण प्रसंगच आला तर मनुष्याच्या हृदयांतली खळबळ त्याच्या तोंडावाटे अतिशय परिणामकारक शब्द बोलवते. "

" मला नाहीं शक्य वाटत. दुर्दैवी मनुष्य बडबडतो काय ? तर चारदोन इर-साल शिव्या पुटपुटतो व ढेकुण किंवा हवापाणी अशा गोष्टींबद्दल तक्रारी करतो. अशीं हॅम्लेटसारखीं भव्य वाक्यें सोडून देत नाहीं भराभर. "

" आपला मतभेद आहे; प्रसंग तितकाच अनपेक्षित आणि विलक्षण आला तर माणसाच्या तोंडांतून सहज-स्फूर्तीनें अवघड भाषाही येते—"

" अर्थात् काव्यांत सगळं खपून जातं—"

" तसं नाहीं माझं काव्य-मी वास्तववादी आहें "

" म्हणजे काय ? बरं जाऊं दे. नको हा काथ्याकूट—"

दोघे बराच वेळ हिंडून फिरून रमतगमत काशिनाथाच्या घरीं गेले. जेवायचें होईपर्यंत आचाऱ्याला सरबत आणून ठेवायला सांगून काशिनाथ कपडे काढूं लागला. इतक्यांत त्याचें लक्ष टेबलावरच्या नुकत्याच आलेल्या पत्राकडे गेलें. त्यानें तें उघ-डलें व १।२ मिनिटांनीं घोगऱ्या आवाजांत तो ओरडला,

" विश्वासघात ! स्त्रीजात तेवढी निमकहराम ! कसचं आलं आहे प्रेम-झूट आहे सगळं ! आणि स्नेह म्हणजे तर इमानाचा वैरी !..."

विश्वनाथाला वाटलें हा आपल्या मघांच्या बोलण्याची चेष्टा करतो आहे, पण काशिनाथ त्याच्याजवळ येऊन शून्य दृष्टीनें म्हणाला,

" विसू तुझं म्हणणं अगदीं खरं आहे—"

तें पत्र त्यानें विश्वनाथापुढें टाकलें. तें गुलाबचें पत्र होतें, ती मधुकरशीं लग्न करायला त्याच्याबरोबर लोणावळ्यास पळून गेली होती.

## १५. शीर शिकारी

बी. ए. च्या परीक्षेची वेठ वारून मोकळा झाल्यावर कांहीं दिवस विश्रांति म्हणून मुंबईबाहेर कोठेंतरी जाण्याचा माझा विचार व्हायला आणि काकांकडून बोलावणें यायला एकच गांठ पडली. काका आसाममध्यें सिल्चरला सिव्हिल सर्जन होते. त्यांनीं लग्न केलें नसल्यामुळें त्यांच्या मागें कुटुंबाचा व्याप नव्हता. स्वारी थोडी लहरी व आंबट वृत्तीची होती; पण आम्हां सर्व भावंडांत माझ्यावर त्यांची किंचितशी मर्जी होती. 'अण्णाच्या लेंढारांत हेंच पिल्लूं थोडेंसें रानटी दिसतें' ही त्यांच्या कौतुकाची तऱ्हा! त्यांनीं मला बोलवण्याचें पत्र पाठवलें होतें, तें देखील असेंच विक्षिप्तपणाचें. 'बी. ए. ची परीक्षा झाली म्हणजे आपण मोठे शहाणे झालों असें तुला वाटत असेल. पण तूं इकडे आलास तर तुला दिसेल कीं इकडच्या रानटी लोकांतल्या एकाचीही अक्कल तुझ्यासारख्या दहा ग्रॅज्युएटांना नाहीं.'

काकांचें आव्हान स्वीकारून मी सिल्चरला गेलों. ते बोलण्यानें शक्य तितकें चिडवीत, पण माझी बरदास्त त्यांनीं एकाद्या बड्या साहेबासारखी ठेवली होती. माझ्यांत नी त्यांच्यांत वीस वर्षांचें अंतर असून देखील ते मला बरोबरीनें वागवायचे, आपल्याबरोबर सगळीकडे घेऊन जायचे, व खाणें-पिणें-खेळणें सगळें मला जोडीनें घेऊन करायचे.

सिल्चरच्या आसपासचे रानटी लोक—विशेषतः 'नाग' जातीचे लोक—कसे आहेत हें पाहण्याची मला फार उत्कंठा होती. डॉक्टरकाकांनीं आपल्या चेष्टेच्या मधून मधून मला त्यांची पुष्कळ माहिती दिली, त्यांचे नमुने दाखवले, त्यांच्या

आचारविचारांबद्दल गप्पा मारल्या. हे नाग लोक मोठे क्रूर आहेत. अगदीं परवांपर्यंत त्यांच्यांत एक भयंकर प्रकार चालू होता,–अजूनहि चोरून मारून ते ती गोष्ट करतात. एकाद्या शत्रूवर किंवा परक्या माणसावर हिंस्र पशूसारखी पाळत ठेवायची, लपतछपत त्याचा तासन्तास पाठलाग करायचा; एकान्त स्थळीं बेसावध स्थितींत त्याला ठार मारायचें व त्याचें मुंडकें कापून आणून आपल्या झोंपडीच्या बांबूवर शोभेची वस्तू म्हणून अडकवून ठेवायचें! ही नाग जात शीर शिकारी म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांच्या कैक जुन्या झोंपड्यांच्या उभ्या दांड्यांवर वाळून गेलेलीं मस्तकें दिसतात. विचारणाऱ्याला ते सांगतात कीं तीं जुनीं, बेकायदा जमान्यांतलीं आहेत. पण काका म्हणाले कीं, तें कांहीं सांगतां येत नाहीं–आणि तूं जरा जपूनच वाग, एकाद्या नागकन्येवर डोळा ठेवूं नको; नाहींतर तुझेंहि पोकळडोकें एकाद्या बांबूवर पाहावयाचा मला प्रसंग येईल!

या शीर शिकाऱ्यांच्या भेसूर रूढीनें माझ्या कल्पनाशक्तीला फार चालना दिली. त्यांच्या स्वतंत्रतेच्या कालाचें चित्र माझ्या मनःचक्षूपुढें उभें राहूं लागलें. रक्तानें थबथबलेलें ताजें मुंडकें घेऊन विजयी मुद्रेनें एकदा नाग वीर आपल्या खेड्यांत येतो; पुरुषांत मत्सरी कुजबूज व बायकांत सादर आश्चर्याचे चीत्कार सुरू होतात; आपल्या झोंपडीपाशीं येऊन तो वीर एका उंच बांबूवर तें मुंडकें बसवतो व त्याच्याकडे अभिमानपूर्वक पहात उभा राहतो; तें शीर कोणाचें असेल हें केवळ त्या शिकाऱ्याच्या लहरीवर अवलंबून असतें. द्वेषाची लहर असली तर शत्रूचें, मत्सराच्या अतिरेकांत मित्राचें व निव्वळ खेळकर वृत्तींत एकाद्या निरपराधी तिऱ्हाइताचेंही डोकें कापून नाग वीर आपल्या झोपडींवर अडकवील. आणि या विजयचिन्हानें त्या वीराला किती महत्त्व येतें! शेजारीपाजारी अदबीनें वागूं लागतात, खेड्यांतले दुढ्ढाचार्य विचारपूस करूं लागतात व ज्या तरुणीवर त्याची नजर असते ती रस्त्यानें जातांना थबकून, आपल्या खालींवर होणाऱ्या उन्नत वक्षस्थलावर एक हात ठेवून, श्रोणीभाराला मंद हेलकावे देत टपोऱ्या डोळ्यांनीं त्या मस्तकाकडे पाहते, व नंतर अनन्य भक्तिभावानें त्या वीराकडे पाहते–तेव्हां त्याला श्रमाचें सार्थक झालेंसें वाटत असेल; त्याच्या खुषीला सीमा रहात नसेल. रक्ताचे थेंब ठिबकणारें तें शीर व आतां गिधाडांचें भक्ष्य झालेलें तें धड, या गोष्टी त्याला अनुपमेय समाधान देत असतील. त्याचें तत्त्वज्ञान किती साधें!

# चोर बाजारांतील चिजा

ज्या डोक्यांत शत्रूचें सगळें कारस्थान चालायचें, तेंच निर्जीव डोकें झोपडीच्या वाशावर टांगणें, यापेक्षां शत्रूला निरुत्तर करण्याचा, त्याची बाजू उलटविण्याचा व त्याच्यावर तात्त्विक विजय मिळविण्याचा मोठा मार्ग दुसरा कोणता ?...

सिल्वरला काकांचा बंगला अगदीं तुरळक वस्ती असलेल्या शहराच्या टोंकाला होता. आमच्या पलीकडे विद्याभूषण साहा म्हणून एक सेवानिवृत्त प्रोफेसर राहात होते व त्यांच्या पलीकडे चेतराम खन्ना म्हणून एक श्रीमंत पंजाबी व्यापारी राहात होता. एके दिवशीं सकाळीं आम्हीं फेरफटका करून परत येत होतों. साहाबाबूंच्या बंगल्यापाशीं काकांनीं नेहमींपेक्षां कांहींतरी जास्त भडक कोटी केली व मी इतक्या मोठ्यानें हांसलों कीं तोल जाऊन रस्त्याच्या कडेला असलेल्या कुंपणाला जाऊन पकडण्याची वेळ आली. हांसून हांसून डबडबलेल्या डोळ्यांनीं, धापा टाकीत मीं थोड्या वेळानें वर पाहिलें–

एक सुंदर तरुण मुलगी निर्विकारपणें माझ्याकडे एक दृष्टिक्षेप टाकून निघून गेली. ती कम्पाउंडच्या दुसऱ्या बाजूला बंगल्याच्या आवारांत फुलें तोडीत होती. माझ्या बेभान हांसण्याकडे थोडा वेळ तुच्छपणें पहात ती उभी असावी असें मला वाटलें. तिचा शुभ्र साधा पोषाख व चालण्यांतला सहज डौल या गोष्टी पाहून मी अगदीं सर्द होऊन गेलों. मीं काकांच्यावर माझा राग काढला.

" बस्स करा काका तुमचा पांचटपणा ? भर रस्त्यांत माझी शोभा केलीत— "

" आस्ते, आस्ते बच्चा ! इतक्या तावडतोब घायाळ झालास ? अरे, ती साहाबाबूंची छोकरी हेमा–आणि हें बघ, विनाकारण उमेदवारी करूं नको ! शहरांतले सगळे तरुण तिच्यासाठीं जान कुर्बान करायला टपले आहेत–पण जिंकणार कोण हेंहि ठरून गेलं आहे–पंडित चेतराम ! "

" अस्सं ? ठीक आहे, पाहून घेईन ! " म्हणून मीं मोठ्या रुबाबांत ( नसलेल्या ) मिशीवर ताव दिला-आणि सणावारी हांसणाऱ्या मिष्किल काकांनीं हास्याचा मोठा स्फोट उडवून दिला.

तेवीस वर्षांच्या निश्चिंत जीवनामुळें आलेल्या बेछूट आत्मविश्वासानें मीं हेमाला जिंकण्याचा चंग बांधला. काकांना ओढून नेऊन त्यांच्याकडून साहाबाबूंच्या घरीं ओळख करून घेतली. सेवानिवृत्त झाल्यावर देखील पंडित विद्याभूषण

यांचा व्यासंग चालू होता. प्राचीन इतिहासावर ते एक जाडा ग्रंथ लिहीत होते. हेमाच्या सहवासासाठीं, गुप्त, पांड्य, चालुक्य वगैरे वंशांवरचीं केक व्याख्यानें मी धीमेपणानें ऐकलीं ! रोज पंडितवर्यांकडे जाण्याचा क्रम सुरू केला व नुकताच कॉलेजांतून बाहेर पडलेला तरुण सुंदर मुलीवर छाप पाडण्यासाठीं ज्या ज्या गोष्टी करील त्या सर्व गोष्टी पद्धतशीरपणें सुरू केल्या.

पण हेमा जितकी सुंदर तितकीच बुद्धिमान्, जितकी हांसरी तितकीच खोल बुद्धीची, खेळकर तितकीच खबरदार होती. तिनें मला आपल्या मनाचा थांगसुद्धां लागूं दिला नाहीं; ती फार सलगीपर्यंतहि प्रकरण येऊं द्यायची नाहीं व तोडूनहि टाकायची नाहीं. मी आणि माझा प्रतिस्पर्धी चेतराम यांना सारख्याच निःपक्षपातानें वागवायची.

या प्रतिस्पर्ध्याचा मी चांगला व्यवस्थित अभ्यास करायला सुरवात केली. त्याची कोणती तरी लंगडी बाजू शोधून काढून त्याच्यावर हेमासमोर मात करण्याचा असा घाट घातला. पण चेतराम खन्ना सर्व बाजूंनीं इतका पूर्ण होता कीं माझ्या मनांत हताशपणाचे सूर निघायला लागले. तो मोठा धूर्त, व्यवहारी माणूस; कपडेलत्ते ठाकठीक; बोलणें मिठास आणि रीतिरिवाजांत पक्का मुरलेला. त्याचा रुबाब, त्याची सफाई, त्याचा दरबारीपणा, सर्व कांहीं और होतें. तो चांगला श्रीमंत होता. द्रव्याबरोबरच त्याची अभिरुचीहि चांगली होती. त्याच्या बंगल्यांत सुंदर वस्तूंचा जणूं अजबखाना होता. सुमारें पस्तीस एक वर्षाचें त्याचें वय असेल. पण सडपातळ व बांधेसूद शरीर आणि वाटोळा रेखीव चेहरा यांनीं तो फार छाप पाडीत असे. त्यानें मुद्दाम थोडे अव्यवस्थित ठेवलेले चरचरीत केस व शौकतअल्ली छापाच्या त्याच्या दाढीमिशा भुरकट रंगाच्या होत्या ( चोर मेंदी लावीत असला पाहिजे ! ) मोठा ऐटदार मनुष्य दिसायचा तो. माझ्याशीं त्याची वागणूक आदब-शीर, पण थोडी जादा रुबाबदार होती. माझ्याशीं बोलतांना तो थोड्या भुंवया उचलायचा—जसा कांहीं किंचित् हलक्या इसमाबरोबर मेहेरबानीखातर बात करतो आहे अशी ऐट ! तो जितक्या मिठासपणें वागायचा तितका माझा संताप वाढायचा.

तरीपण या बोक्याला हेमाबरोबर एकटा सोडायचा नाहीं, असा निर्धार करून मीं त्याचा पिच्छा पुरवीत होतों. तिच्याबरोबर बहुतेक आम्ही दोघे एकावेळीं

असायचे. कदाचित् सकाळीं मीं एकट्यानें येऊन आघाडी मारली तर संध्याकाळीं मी क्लबांत गेलों असतां तो एकटा हेमाचा सहवास साधून बरोबर करायचा. आम्ही प्रतिस्पर्धी होतों, पण वागण्यांत अगदीं चोख! त्यांतल्यात्यांत मीं आपला एक छोकरा ( नवजवान ) म्हणून ठरलों होतों व व्यावहारिक शहाणपणाचा गृहस्थी गड्डा चेतरामकडे होता. हेमा त्याच्याशीं मोठ्या गांभीर्यानें वागायची; पण माझ्या रोमँटिक कल्पनांची मात्र थोडी चेष्टाच करायची. एकदां आम्ही दोघें एकटीं असतां तर मी स्पष्ट बोलून गेलों कीं, मी तुझ्यासाठीं तळमळतों आहें, मी काय करूं म्हणजे तूं माझी होशील ?

ती त्यावेळीं हांसलीहि नाहीं व त्रासलीहि नाहीं. ती म्हणाली, "केशव, (ती मला बरोबरीचा म्हणून एकवचनी हांक मारायला लागली होती; चेतरामला ती 'खन्नाजी' म्हणे. आमच्या एकवचनी संबोधनानें मला भीति मात्र पडली होती कीं, भावाबहिणीचें सोज्वळ नातें निर्माण करून ती माझ्या प्रणयाचा खून पाडणार कीं काय!) मारामाऱ्या करून किंवा जीव धोक्यांत घालूनच मुलींच्या मनांत पुरुष भरतात असें का तुला वाटतं ? अरे वेड्या, माझ्यासारख्या सामान्य मुली तर फार अल्पसंतोषी असतात. क्षुल्लक गोष्टींत पण वेळेवर पुरुषानें आमची हौस पुरवली तरी देखील आम्हांला धन्य वाटतं. बारीकसारीक बाबतींत आमच्या पोरकट लहरींना मान देणारा, आमच्या आवडीनिवडी लक्षांत ठेवणारा पुरुष मोठ्या लोकोत्तर माणसापेक्षां आम्हांला जास्त आवडतो. डोळे दिपून प्रेम वाटत नाहीं, आवडीमुळें वाटतें."

त्याच रात्रीं मला दोषिक तापानें ग्रासलें. आसाममधला दोषिक ताप म्हणजे तराई-तापाचा चुलत भाऊ, असें काकांनीं वर्णन केलें. मी आजारी पडलेला पाहून त्या विक्षिप्त माणसाला मौजच वाटली!

"ही उल्लूपणाची शिक्षा! त्या हेमाचा जप करीत जागरणें केलीं असशील, आतां पडलास आ वासून! या दोषिक तापांत तिला मी या बंगल्याजवळ देखील येऊं देणार नाहीं. लवकरच तिला भेटायचं असलं तर लौकर बरा हो. इच्छाशक्तीशिवाय या तापाला औषध नाहीं; चांगला कुंभाराच्या गाढवासारखा धडधाकट आहेस. औषधें पीत पडण्यापेक्षां बरं होण्याचा निश्चय केलास तर लवकर उठशील."

## शीर शिकारी

पंधरा दिवस, दुपारीं बाराला मुंबईच्या रस्त्यावर लोळल्यासारख्या स्थितींत, एकशें पांच ताप घेऊन मी पडलों होतों. माझ्या शुश्रूषेला सुहासिनीदेवी म्हणून एक म्हातारी, काळी, कुरूप व दुर्मुखलेली नर्स काकांनीं हॉस्पिटलमधून मुद्दाम-बोलावून घेतली होती. तिच्या चिडीनें तरी मी उठेन असा त्यांचा कयास असावा; कारण ती वेठीस धरल्यासारखी काम करायची, आणि तिच्या मुद्रेवर आविर्भाव असा कीं, ' आटोपला सगळा कारभार, आतां कसची आली आहे आशा ! '

एके दिवशीं मीं तिला हांकून लावलें. तिनें नुकतेंच माझें टेंपरेचर घेतलें होतें. तें १०५ होतें हें पाहून मला एक प्रकारें बरें वाटलें. काका हॉस्पिटलमध्यें गेले होते. मीं कपडे घातले व साहाबाबूंच्या बंगल्यांत गेलों. हवेंतून चालत गेल्या-सारखें मला वाटलें. मनांतल्या संतापापुढें अंगांतला ताप विसरून गेलों होतों. त्या बदमाश चेतरामानें पंधरा दिवसांची आघाडी मारली होती—

घरापुढच्या हिरवळीवर हेमा व चेतराम बसलीं होतीं. हेमा एकदम उठून पुढें आली, " केशव, तूं बरा झालास ? "

तिनें माझे दोन्ही हात धरले व मला आपल्या दुसऱ्या बाजूला बसविलें. अर्धाएक तास आम्हीं बोलत होतों. बोलतां बोलतां तिचें अवधान व्यग्र झालें, मुद्रा खिन्न झाली. तिच्या या स्थितीवरून कयास बांधायला मी शिकलों होतों कीं एकाद्या क्षुल्लक गोष्टीची हिला अनिवार इच्छा झाली आहे.

आणि चेतरामहि—चोर बेटा—ही गोष्ट उमगून गेला. " कसली आठवण झाली, हेमा ? " आम्हीं दोघांनीं एकदम विचारलें. तिचा चेहरा थोडासा लाजरा व हिरमुसल्या-सारखा झाला. " अगदीं पोरकट लहर, " ती थोड्या शरमिंद्या आवाजानें म्हणाली, " कोंवळ्या नारळाचें सार करून खाण्याची मला इच्छा झाली होती. मला सांगा-यला देखील लाज वाटते—पण दोनतीन दिवस मला अगदीं ध्यास लागला आहे. "

" अशक्य; या दिवसांत येथें शहाळें मिळणार नाहीं, " पुऱ्या माहितीच्या विश्वा-सानें चेतराम म्हणाला. " गांवांतलीं सगळीं झाडें साफ झालीं आहेत. वाण्यांकडे फारतर जून बिनपाण्याचे नारळ मिळतील."

" नारळाच्याऐवजीं आमसुलाचें सार नाहीं का चालायचें ? " तापांतून उठलेल्या माणसाला शोभेल अशा आचरटपणें मीं विचारलें. माझ्या बोलण्याकडे कोणी लक्षही दिलें नाहीं.

चोरबाजारांतील चिजा

पंडित विद्याभूषण बाहेर येऊन उभे राहिले होते. "टेकडीवर जहीर चौधऱ्याच्या वखारींत कधींकधीं असोले नारळ असतात," ते म्हणाले, "पण हेमा, जिव्हालौल्याच्या इतकं आधीन होण्यापेक्षां आत्मसंयमनानें रोजच्या मिताहारावर संतुष्ट राहणं हाच मोठा नैतिक विजय—"

"काकडीची कढी देखील मोठी चवदार असते–" मीं बावळटपणाचा दुसरा आवाज काढला.

सगळ्यांनीं क्षणभर एकाद्या चमत्कारिक जनावराकडे पहातात तसें माझ्याकडे पाहिलें. लौकरच निरोप घेऊन चेतराम तेथून निसटला–तो असोल्या नारळाच्या शोधार्थ जातो आहे, ही कल्पना माझ्या मनांत चमकून गेली. घरांतल्या कामासाठीं म्हणून हेमा उठून गेली व साहाबाबू बागेंत हिंडूं लागले. शून्य दृष्टीनें त्यांच्याकडे पाहात असतां बागेंतल्या वेल चढविलेल्या एका उंच बांबूकडे माझें लक्ष गेलें. डोक्यांत रक्त एकदम उसळल्यासारखें झालें. तसल्या बांबूवर शत्रूचें मुंडकें अडकविणारा नागजातीचा लढवय्या, त्या ठिबकणाऱ्या मुंडक्याकडे व त्या वीराकडे आळीपाळीनें पाहणारी पीनपयोधरा, टपोऱ्या डोळ्यांची त्याची रमणी...प्रीतीचें प्रतीक–शत्रूचें शीर...

मी हळूंच उठलों. बंगल्यांत परत आलों. व्हरांड्याबाहेर माळ्याची नुकतीच पाजवलेली तजेलदार कुऱ्हाड पडली होती, ती उचलली, आणि स्वतःशीं खूष होऊन हंसें दाबीत चेतरामच्या बादशाही बंगल्याकडे वळलों. माझ्या प्रेमांत व्यत्यय आणणाऱ्या त्या राक्षसाला—

त्याची व माझी दृष्टादृष्ट झाली मात्र, तो समजून चुकला. त्यानें माझ्या कुऱ्हाडीकडे पाहिलं आणि एकदम पळ काढला. एकाद्या हरणासारखा पळत तो रस्त्यानें टेंकडीकडे निघाला. वायुवेगानें मी त्याचा पाठलाग करीत होतों, सुमारें एक मैल तो धांवला; तो चपळ होता, पण मलाहि अमानुष शक्ति आली होती. शेवटीं एका लहानशा खिंडींत मीं त्याला रोखून धरलें.

प्राणावर बेतली तरी त्यानें डोकें ठिकाणावर ठेवलं होतें. शक्य तितका प्रयत्न करून तो नैसर्गिक आवाजांत म्हणाला, "केशव, तूं तापानें वेडा झाला आहेस, शुद्धीवर ये, ती कुऱ्हाड मजजवळ दे. परत जाऊन बोलत बसूं—"

"मी आतां तुझं डोकं कापून घेऊन परत जाणार—बाबूजींच्या बागेतल्या बांबू-वर तें मोठं शोभिवंत दिसेल—"

"चांगलं ! असं बडबडूं नको ! हेमा या जंगलीपणाला काय म्हणेल ? "

"हेमा ? त्या शेकाव्यावर तुझं शीर लटकलं म्हणजे माझ्याकडे अभिमानानें पाहील. शत्रूच्या मस्तकापेक्षां प्रेमदेवतेच्या पायावर वाहण्यास दुसरी कोणती गोष्ट लायक आहे ? चल, बऱ्या बोलानें मान पुढें कर. रुबाबांत राहिलास तसा मिजाशींत मर. "

तो निसटायचा प्रयत्न करूं लागला, पण मीं त्याला पकडलें. त्यानें वळवळ केली; पण त्याच्या छातीवर बसून दोन चार घावांतच त्याचें शीर तोडून मीं धडावेगळें केलें व तें तडफडणारें कबंध तेथेंच टाकून भुरकट रंगाच्या चरचरीत केसांनीं आच्छादलेलें, रक्त ठिबकणारें त्याचें डोकें उचललें. डोळ्यांची एकदोनदां उघडझांप झाली; पण मी तें शीर हातरुमालांत बांधून रस्त्याला लागलों. ठिका-णाला पोहोंचून हेमेच्या बागेंतल्या उंच काठीवर तें शीर अडकवलें व एका खुर्चीवर वाट पाहात बसलों. बऱ्याच वेळानें ती बाहेर आली.

"केशव, कुठें गेला होतास मधेंच ?" तिनें आश्चर्यानें विचारलें.

" त्या बांबूच्या टोंकाला पहा—"

तिनें एक हलकेच किंकाळी फोडली—आनंदाची ! " केशव, मला आवडेल अशीच गोष्ट तुला कशी सुचली ? थोडा ठिबकतो आहे, पण चालेल. अशाच क्षुल्लक गोष्टींनींच प्रेमाचा उगम होतो." ती माझ्याजवळ येऊन म्हणाली.

क्षुल्लक गोष्ट ! चेतरामचें मुंडकें काढून तिनें आपल्या पदरांत घेतलें.

स्त्रीजात तेवढी एक. क्रूरपणानें प्रेम व्यक्त करा, कीं ती तुमची झाली. हेमा माझ्याजवळ आली.

" केशव, तूं माझ्या परीक्षेला उतरलास. या गोष्टीनें तूं मला जिंकलंस. मी तुझी झालें. "

मी तिला गाढ आलिंगन दिलें.

थोड्यावेळानें स्वयंपाकाला—नारळाचें सार करायला ती आंत गेली. इतक्यांत काका संतापानें ओरडत आले,

# चोरबाजारांतील चिजा

“ गद्धया, बिछाना सोडून इकडे कुठें मरायला आलास ? आणि वेड लागल्या-सारखा धुमाकूळ घालीत गांवभर हिंडलास ! वायु झाला आहे तुला—”

“ कसला धुमाकूळ ?”

चेतरामनें आपल्या घरांतून तुला पाहिलें व मला निरोप पाठविला. कुऱ्हाड घेऊन तूं टेंकडीवरच्या जहीर चौधऱ्याच्या मागें लागलास, आणि त्याच्या वखारीं-तला असोला नारळ लुटून आणलास...”

* * *

माझें हेमाशीं—एका बंगाली पोरीशीं—लग्न रजिस्टर झालें हें ऐकून बाबांनीं ‘माझा मुलगा मेला असें समजतों’ म्हणून काकांना तार केली. काकांनीं मला दत्तक घेत-ल्याची तिकडे उलट तार केली व आपल्या तीस हजारांच्या विम्याचा, पंचेचाळीस हजारांच्या प्रॉव्हिडंट फंडाचा आणि बाकीच्या सर्व स्थावरजंगम इस्टेटीचा मला वारस केला. विद्याभूषण पंडित पहिल्यानें जरा रुष्ट झाले होते, पण त्यांच्या ग्रंथांचीं सगळीं प्रुफें तपासण्याचें धाडसी वचन दिल्यावर त्यांनीं खुषीनें मुलगी माझ्या स्वाधीन केली.

## १६. विद्वत्ता आणि प्रेम

शहाणपण कोठें शिकावें हा या दिवसांत मोठा प्रश्न पडला आहे. शास्त्रेंपुराणें मूर्ख ठरलीं, नीतितत्त्वें 'बुरसलीं,' 'बालादपि सुभाषितम् ग्राह्यम्' वगैरे 'कित्ता-वचनें' कचऱ्याच्या टोपलींत गेलीं, मधमाशीच्या उद्योगाचें उदात्त उदाहरण कोणी-मानीनासा झाला, धर्म वगैरे शिष्ट संस्था विचारवादाच्या धडकीनें कोसळून पडल्या, एक तत्त्व मात्र कायम राहिलें कीं, ज्ञान नुसती भेट देऊन जातें, (राहिलेंच तर) शहाणपण शिल्लक राहतें. ज्ञान हें जोरानें पडून जाणाऱ्या पावसाच्या सरीसारखें आहे; शहाणपण दंवासारखें आहे, जोराचा पाऊस वाढीस लागलेल्या झुडुपाला थोडा हैराणच करतो, दंव त्याच्या भोंवतीं जिरून त्याला ताजेंतवानें करतें, त्याच्या वाढीला मदत करतें. तेव्हां विद्वत्तेपेक्षां धूर्तपणा, सारासार निर्णयशक्ति किंवा थोड-क्यांत म्हणजेशहाणपण, तें मिळविणें किती बरें उपयुक्त आहे !

ही पन्नास वर्षांपूर्वीच्या पद्धतीनें केलेली गोष्टीची सुरवात नाहीं. हें आधीं सांगून टाकलेलें नीरस तात्पर्य आहे. आतां निर्धास्तपणें गोष्ट सुरू करायला हरकत नाहीं.

रात्रीं अकराच्या सुमारास चौपाटीवर एका अंधारांतल्या बाकावर शंकर जाऊन बसला. बाकाच्या दुसऱ्या टोंकाला एक मनुष्य बसला होता. तो चौपाटीवरच्या बाकावर आयुष्याचे बरेच तास काढणाऱ्या ठराविक नमुन्याचा होता. मळके गबाळ कपडे, घामट मुद्रा, विड्या व खोकला.... पांच मिनिटें त्यानें शंकराकडे पाहिलें, नंतर तो ठराविक लाचार आवाज काढून म्हणाला,

# चोरबाजारांतील चिजा

"दादा, एक आणा द्याल का गरीबाला ? सकाळपासून भुका आहे, चणे खाईन."

शंकर मुंबईला निर्ढावलेला होता, तो थंडपणें म्हणाला, " अस्सं ! तूं या वर्षांत चारवेळां मला हेच शब्द बोललास, आणि एकदोनदां त्याच दिवशीं आधीं तुला मीं भेळ–गंडेऱ्या खातांना पाहिलें होतें. तुझ्या खिशांत आतां तीनचार रुपयांची चिल्लर सहज असेल. जा; एकाच माणसाला दोनदां बनवायच्या आधीं त्याच्याकडे बारकाईनें पहात जावें आणि मग सुरवात करावी—"

तो भिकारीहि पक्का खप्पी होता. आपला नेहमींचा डाव फसला हें पाहून त्याला यत्किंचितहि लाज वाटली नाहीं. तो लाचारपणें थोडा हांसला, व खिशांतून एक विडी काढून त्यानें शिलगावली.

शंकर त्याच्याकडे पाहून थोड्या वेळानें त्याला म्हणाला–

"पण. हें बघ, तुला मी चार आणे देतों–तुझी ही स्थिति कशानें झाली हें सांगशील तर; मी वर्तमानपत्राचा बातमीदार आहें."

तो भिकारी मोठ्यानें हांसला; त्यानें चार आणे खिशांत टाकले, तो उद्गारला, " वा राव वा ! अहो, मी काय काल अलीबागेहून आलों आहें होय ? तुम्ही मात्र मालवणाहून आल्यासारखें बोलतां आहांत अगदीं ! अहो वर्तमानपत्राचे बातमीदार भिकाऱ्यांची चौकशी करायला कशाला जातील ? देशभक्त पोट कसें भरतात, अशा बातम्या त्यांना पाहिजे असतात. मी कांहीं तुम्हांला ओळखत नाहीं होय ? अहो, या मुंबईंत माझ्यासमोरून जाणाऱ्या प्रत्येक माणसाचा नूर मी ओळखतों—

" माझ्याबद्दल काय ओळखतोस सांग पाहूं ? "

"तुम्ही ? तुम्ही बापाच्या पैशावर कॉलेजांत चैन करणारे स्टूडंट असाल, नाहीं तर कारकुनाच्या नोकरीवर साहेबाची ऐट आणीत गांवांत छाप पाडीत असाल, नाहींतर एखाद्या विलायती कंपनीचे फिरते एजंट असाल ! तुमच्या सगळ्या रुबा-बाला तुम्हांला हवी तशी 'लेडी' मिळत नाहीं म्हणून चौपाटीची हवा खायला आलां आहांत—"

" कोण म्हणतो मिळत नाहीं—" शंकर एकदम म्हणाला. लगेच त्यानें जीभ चावली. त्या भिकाऱ्याला धीटपणा आला. भुक्कड माणसाच्या सलगीकडे थोडा काणाडोळा केला म्हणजे तो जसा गळीं पडायला येतो, तसा तो बाकावर चार बोटें शंकराच्या बाजूला सरकला.

" हें पहा राव ! तुमचीच कांहींतरी सांगण्यासारखी गोष्ट आहे ! मी भीक मागतों, पण मलाहि चौपाटीवर रात्रीं हवा खाणाऱ्या लोकांबद्दल माहिती मिळवावीशी वाटते. मी मनुष्यस्वभावाचे नमुने पाहण्यांतच करमणूक करून घेतों. आणखी चार आणे द्याल तर तुमच्याहि गोष्टींत मला गोडी लागेल ! प्रेम, विद्वत्ता असल्या अजब गोष्टींची मला ओळख करून घ्यायची आहे. "

त्याच्या निर्लज्ज धाष्टर्याचें शंकरला जरा कौतुकच वाटलें. त्यानें आणखी चार आणे काढून त्या भिकाऱ्याच्या हातावर ठेवले.

" ऐक कुळकर्णी, देशपांडे, किंवा जोशी—जें तुझें नांव असेल तें—"

" धानोरकर—"

" ठीक आहे, धानोरकर. भीक मागणें हा तुझा दुय्यम धंदा दिसतो. तूं हौशी भिकारी दिसतोस, संपादक होऊं पाहणारा फ्रूफवाच्या तर तूं नाहींस ना ? किंवा दारोदार सुगंधी सामान विकत जाणारा–किंवा विमा एजंट ? "

" नाहीं. मीं एका कारखान्यांत बाटल्यांवर लेबलें लावतों. "

" मग कांहीं हरकत नाहीं. माझी गोष्ट तुला सांगायला धास्ती नाहीं. "

बेछूटपणें शंकरानें त्याला आपली कहाणी सांगितली. आपण मोटरचा सेल्समन असल्यामुळें मोटरवाल्या लोकांत आपलें जाणेंयेणें कसें पडलें, सॉलिसिटर जहागिरदारांच्या लावण्यवती कन्येवर, कुसुमवर, आपलें प्रेम कसें बसलें, पण तिच्या बरोबरीचीं माणसें म्हणजे कशीं बडीं प्रस्थें आहेत, ती स्वतः किती रुबाबदार, बुद्धिमान् व अभिमानी आहे, तिच्या भोंवतीं उमेदवारांची गर्दी आहे, त्यांच्यापुढें आपल्याला कांहींच ' चान्स ' कसा नाहीं, इ. इ.

" मग तिला तुम्हीं पळवीत कां नाहीं ? "

या वेड्या पीराला काय सांगायचें ? पण शंकरानें सांगितलें कीं, ती आपल्याशीं जरी मोकळेपणानें, बरोबरीनें, स्नेहभावानें, वागते, तरी ' तसें ' कांहीं बोलायला

लागलों कीं नुसती हंसायला लागते. आपण रुबाबांत राहतों, पण तिच्या मानानें आपला दर्जा कांहींच नाहीं.

"दुसऱ्या पोरींच्यावर तुमची छाप पडते का? तिला कांहीं बहिणीबिहिणी असतील! इतर मुली तुम्हांला मोठा उमदा जवान समजत असतील!"

"असतील, पण—"

पण याच मुलीच्या बाबतींत तुम्ही घाबरतां, असेंच कीं नाहीं? मला वाटलेंच! माझीहि गोष्ट थोडीशी अशी आहे! ती ऐकलीत म्हणजे तुम्हांला मार्ग सांपडेल—"

शंकरला या भिकारड्याचा संताप आला. आपल्या रम्य प्रेमकथेंत हा भिकारडा आपलीं लक्तरें ढकलतो हें पाहून आठ आणे परत मागायचा त्याला मोह झाला! पण धानोरकरानें थंडपणें सुरवात केली होती—

"पांच वर्षांपूर्वी मुंबईत आलों तेव्हां चांगला पहिलवान होतों मीं. मला आख्ख्या मुंबईत जोड नव्हती. मोठमोठ्या भारी जवानांच्या पाठीला माती लावायचा मी. पण सगळें—आपल्या गल्लीच्या आखाड्यांत! जाहीर कुस्ती ठेवली कीं तीन मिनिटांत चारीमुंड्या चीत झालोंच! पांचसहा वेळां मला कंत्राटदारांनीं कुस्तीला उभा केला, पण दर वेळेला हीच रड. भोंवतालीं गर्दी पाहिली कीं गळाठलोंच मी. माझा मलाच संताप यायचा. त्या रागांत रात्रीं अपरात्रीं गल्लीकुचींत हिंडून कुरापती काढून मी वाटेल त्याच्याशीं मारामाऱ्या करायचा, लोकांना फेकून द्यायचा दोन्हीबाजूंना! एकदां मी पीला-हाउसच्या बाजूनें एकदीडच्या सुमाराला भटकत होतों. आठ दिवसांत माझी कुठेंच मारामारी झाली नव्हती; मला अगदीं चुकल्याचुकल्यासारखें झालें होतें. इतक्यांत कुठल्याशा थिएटरमधून तमाशा संपल्यामुळें चारपांच मुसलमान बाहेर आले. ते रंगेलपणें डुलतडुलत थट्टामस्करी करीत चालले होते व माझ्याजवळून जातांना एकानें मला धक्का देऊन फुटपायरीच्या खालीं ढकललें. मला हेंच हवें होतें; मी एकदम त्याची गर्दन धरली. बाकी सगळे आ वासूनच उभे राहिले. त्या माणसाची नि माझी झटापट थोडावेळ झाली, पण शेवटीं मीं त्याला एक मोठी उखड देऊन भिंतीवर फेंकला, तो तेथेंच पडून राहिला.

"त्याच्याबरोबर एक माणूस माझ्याजवळ आला व त्यानें मला निरखून पाहिलें, 'अबे उल्लू, जानता है तूंने किसको सफा किया?'

"असेल कोणी दादा! मला पर्वा नाहीं. मला धक्का कां दिलान् त्यानें? तुम्हांला हवें असेल तर तुम्हीहि या एकएकजण—'

'अरे शैतान, वो करीम बांडा–तमाम बंबैका शेर कुस्तीबाज—'

इतक्यांत 'पोलीस!' म्हणून पुकार झाली आणि आम्ही सगळेच पळालों. तो करीम बांडा जाहीर सामन्यांत माझ्या समोर आला असता तर मीं आधींच उताणा पडून त्याला कुस्ती आदा केली असती! तात्पर्य काय, कीं नुसत्या मनानें धास्ती घेऊन आपण प्रसंगाला पाठ देतों, गुण असला–नसला तरी हिंमत पाहिजे. मला हिम्मत नव्हती–तुम्हांलाहि नाहीं—"

"मला मवाल्यांशीं मारामारी करायची नाहीं—"

"पण मनांतली गोष्ट एका पोरीपुढें बोलायची आहे. ती मुरब्बी मुलगी असणार; तुम्ही आहांत कच्चे—"

"चला मला उशीर झाला," म्हणून घड्याळाकडे पाहून शंकर उठला, व चालूं लागला.

"अहो शेट, लक्षांत ठेवा, हिंमत नाहीं तोंपर्यंत नुसती चौपाटीवर हवा खायलाच येणार तुम्ही माझ्यासारखे—"

शंकर चरफडत भराभर पावलें टाकीत निघून गेला. 'मिकाऱ्याला हृद्गत सांगण्याच्या गाढवपणाचें प्रायश्चित्त योग्यच मिळालें' तो विचार करीत होता, 'लेकाचा म्हणतो मला हिंमत नाहीं....'

रात्रभर तो अस्वस्थ होता. पहाटेच्या सुमाराला त्याचा एक निश्चय झाला व त्याला झोंप लागली. आठ वाजतां त्यानें उठून गडबडीनें वेषभूषा केली, व तडक तो आपल्या कंपनींत गेला. तेथें कोणी लोक आले नव्हते. त्यानें जहागिरदारांच्या घरीं टेलिफोन केला.

"हॅलो, जहागिरदारांचें घर का?"

"होय, आपण कोण?"–तो स्वर्गीय आवाज!

"तूं आहेस होय–खरोखरच तूं?"

## चोरबाजारांतील चिजा

"कोण बोलतं आहे?"

"मी—आणि हें बघ, मला तुला सरळ एक प्रश्न विचारायचा आहे, ताबडतोब उत्तर पाहिजे—आंगचोरपणा चालणार नाहीं—"

"कोण शंकरराव? तुम्ही होय!"

"होय मीच, पण वायफळ बडबड नको. मुद्यावर येऊं या आपण; माझं तुझ्यावर प्रेम आहे; हा पागलपणा किती दिवस चालला हें तुला माहीत आहे—माझ्याशीं तूं लग्न करणार आहेस का नाहीं, ताबडतोब सांग—"

"हळू, हळू, शंकरराव! केवढा हा ताशेरा! मला कल्पनासुद्धां नव्हती हो! फोनवर कसं सांगतां येईल? घरीं यांना इकडे—!"

तो दहा मिनिटांचे आंत जहागिरदारांच्या बंगल्यांत दाखल झाला. रामानें त्याला व्हरांड्यांत खुर्ची दिली. घरांतली मंडळी आपापल्या कामांत गुंतली होती. शंकर छाती काढून बसला होता त्याचा विचार चालला होता 'हिंमत नाहीं म्हणतो काय तो भिकारडा, ये म्हणावें आतां मला पाहायला—'

इतक्यांत आंतून आवाज आला 'कुठें? व्हरांड्यांत?'

बाहेर येणाऱ्या माणसाची वाट पाहीपर्यंत शंकरराव एकदम ढिले पडले. समोरचा पहिलवान जाहीर कुस्तीच्या रंगणांत उतरतांना पाहून कालच्या भिकाऱ्याला जें वाटलें असेल त्याचा अनुभव शंकराला आला.

हॉलमधून एक तरुणी बाहेर आली—कुसुमची धाकटी बहिण गिरिजा.

ती शंकरला इतकी सुंदर पूर्वीं कधींच दिसली नव्हती. तिच्या चेहऱ्यावर दिव्य तेज झळकत होतें; तिचे डोळे तारकांप्रमाणें चमकत होते. ती शंकरच्या अगदीं जवळ येऊन म्हणाली,

"टेलिफोनवर बोलण्याची गोष्ट का ही? मला आधीं का बोललां नाहींत? ताईसाठीं तुमचा प्रयत्न होता असं मला वाटत होतं—शंकर, मला तूं किती सुखी केलं आहेस!"

तिनें अशा नजरेनें त्याच्याकडे पाहिलें कीं तो कुसुमला विसरून गेला. आपण अखेर कच्चेच ही जाणीव त्याला झाली, पण तो संतुष्ट होता. तीं दोघें बागेंत गेलीं.....

## १७. जोगेश्वरीचा जोगी

१९४० पर्यंत थंड हवेसाठीं शहर सोडून जाण्याचा प्रघात इतका वाढला होता कीं, महाबळेश्वर, माथेरान, लोणावळें, सिंहगड या ठिकाणीं उन्हाळ्यांत बेसुमार गर्दी व्हायला लागली होती. पुणें आणि नाशिक हीं शहरें देखील जास्तच गजा बजून जात होतीं. या सुमारास मुंबईच्या एका धूर्त माणसानें शोध लावला होता कीं, अंधेरी–जोगेश्वरी–कांदिवली या भागांत मुंबई बेटापेक्षां उन्हाळ्यांत दहा डिग्री थंड हवा असते. मुंबई शहरांत ‘ झुकानेवाले ’ पुष्कळ निघाले. या भागांत छोट्या छोट्या बंगल्या भराभर उगवल्या व दोन तीन मोठमोठीं हॉटेल्स चालू झालीं. उन्हाळ्यांत मुंबईच्या फॅशनेबल वस्तीचा ओघ जोगेश्वरीकडे वळला. जोगेश्वरी हें मुंबईच्या जवळचें थंड हवेचें मुख्य ठिकाण बनलें !

ही बनवाबनवी सुरू होण्याच्या आधींपासून जोगेश्वरीच्या डोंगरावर एक जोगी रहात होता. त्याची कीर्ति जवळपास बरीच झाली होती. उन्हाळ्यानें गांजलेल्या चैनी लोकांचे थवे जोगश्वरीला लोटूं लागले, तसतशी साधुबुवांची ख्याति जास्तच झाली. जोगेश्वरीचीं लेणीं, तळीं व इतर प्रेक्षणीय ठिकाणें याबरोबरच यतिमहाराजांची झोंपडी हेंहि एक स्थळ लोकांच्या करमणुकीचें साधन झालें.

डोंगरांतल्या गुहेला जोडलेल्या त्याच्या झोपडींतून निघून पायथ्याच्या तळ्यावर स्नानाला जातांना त्याला पाहिलें म्हणजे त्याची चाळीशीच्या आसपासची उमर, लांब सडक, मध्यें भांग पाडलेले केस, विंचरलेली दाढी, व टागोर फॅशनचा खादीचा

झगा यांनीं त्याची आकृति मोठी भव्य दिसे. स्नान करून तो परत झोंपडींत आल्यावर त्याच्या बरोबर आंत जाऊन डोकावलें तर दिसे कीं, हा संन्यासी धुमी पेटवून चिलीम ओढणाऱ्या अलख निरंजनापेक्षां बराच वरच्या कोटींतला आहे. त्याची गुहा ( जिच्यापुढें पत्र्याची झोंपडी काढून जास्त निवाऱ्याची व्यवस्था केली होती ) स्वच्छ आहे. जमिनीवर चटया व कृष्णाजिनें. भिंतीवर एकदोन देवादिकांचीं चित्रें. एका ओबड धोबड शेल्फवर कांहीं पुस्तकें, कोंपऱ्यांत दोन मोठ्या लोखंडी पेट्या; एकींत त्याच्या रोजच्या आहाराचा शिधा व दुसरी—दुसरीचें कुलूप इतकें गंजलेलें कीं कैक वर्षांत ती उघडली नव्हती हें उघड दिसत होतें. एका कोपऱ्यांत एक कोनाडा खोदलेला असून त्यांत आरसा, कंगवा व तेलाची बाटली हें सामान होतें. कारण साधुमहाराज जरी जीवन्मुक्त होते तरी स्वतःच्या रूपाबद्दल एकाद्या थिऑसॉफिस्टाइतके खबरदार होते. गुहेंत फॅशनेबल संन्याशाला साजेलसें इतरहि कांहीं सामान होतें.

त्याला तेथें राहून दहा वर्षें होत आलीं होतीं. पांच वर्षांपूर्वी डोंगराखालीं आलेल्या ‘ गिरिनार आश्रम ’ या हॉटेलला त्याच्यामुळें गिऱ्हाइकी वाढत होती. कालीगुफा व पद्मतलाव यांच्या बरोबरीनें ‘ पहाडनो जोगीबाबा ’ ला महत्त्व होतें. त्याच्याबद्दल दंतकथाहि पुष्कळ प्रचलित होत्या. त्याला साक्षात्कार झाला आहे, त्याच्या हाताला औषधी गुण आहे, तो क्रांतिकारक आहे, तो विद्वान् मनुष्य एका पोरीनें नाकारल्यामुळें विरक्त झाला आहे, वगैरे चर्चा गिरनार आश्रमाच्या पाहुण्यांमध्यें चालायची. हॉटेलच्या व्यवहारदक्ष मालकानें या जोगीबाबाचा पुरा फायदा करून घेण्याचा चंग बांधला होता. आपल्या जाहिरातींत देखील तो एक ओळ द्यायचा कीं, ‘ होटलनी पाछळ पहाडउप्पर जोगेश्वरीनो जूनो अने जाणीतो जोगी रहे छे, जेणुं जीवन घणूंज भेदी अने रहस्यमय छे ’. हॉटेलमधून जोगीबाबाला वरचेवर ताट जायचें.

आज जोगीबुवा कोणाची तरी वाट पहात होते. त्यांनीं आपली दाढी दोनतीनदां विंचरली, खडावा घातल्या व आपला दंड घेऊन झोंपडीबाहेरच्या एका शिळेवर ते ध्यानस्थ बसले. त्यांना फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. गुहेकडे येणाऱ्या पाउलवाटेनें एक तरुणी चढून येत होती. तिच्या चलाख चालीकडे, नख·

शिखांत मुसमुसणाऱ्या सौंदर्याकडे, साधुमहाराजांचें ध्यान लागलें होतें. लौकरच ती वर आली व धापा टाकीत बुवांच्या समोरच्या शिळेवर बसली. ते नुसते अनिमिष नेत्रांनीं तिच्या रूपाची आराधना करीत बसले. जरा वेळानें ती म्हणाली,

" जोगी होऊन डोंगरावर राहणें आणि स्त्रियांनीं डोंगर चढून आपल्या दर्शनाला येणें,–मोठी भाग्याची गोष्ट आहे नाहीं ? "

जोगी हंसला.

" या डोंगराचें भाग्य, " तो म्हणाला, " कीं अप्सरा आपल्या कोमल पदकमलांनीं त्याला पुनीत करतात ! "

त्या मुलींत चंचलपणा पुरा भरलेला होता–फुलपांखरासारखी वृत्ति ! एका पायांतली चप्पल टाकून त्या पायाला हेलकावे देत देत, तिनें वांकड्या मानेनें बुवांकडे पाहिलें. बुवा तिच्या त्या गोंडस पायाकडे न पाहण्याची शिकस्त करीत होते.

" आईचं डोकं दुखतं आहे. म्हणून ती निजली आणि मला यायची संधि मिळाली. या हॉटेलमध्यें फार उष्मा होतो बाई. यंदां आम्हांला माथेरानला जायला परवडलं नाहीं म्हणून इथं यावं लागलं. कुठलं भिकार हॉटेल आहे कोण जाणे. "

सौंदर्याबरोबर सामान्यतः निगडित असणारा उथळपणा तिच्यामध्येंही होता, पण जोगीमहाराजांना त्याची दादही नव्हती; ते भावनापूर्ण आवाजांत म्हणाले,

" काल रात्रीं मी डोंगराच्या अगदीं माथ्यावर चढून उभा राहिलों होतों. तुझ्या हॉटेलचे दिवे तेथून दिसत होते आणि रेडिओमधल्या संगीताची एकादी लकेरही ऐकूं येत होती. हॉटेलच्या दिवाणखान्यांत एकाद्या तरुणावर आपल्या सौंदर्याची प्रभा तूं पाडीत असशील—त्या भावनेनें मला किती हुरहूर लागली ! "

" काल रात्रीं मी आईचं डोकं चोळीत होतें. हॉटेलमध्यें बरेचसे दरिद्री तरुण आले होते. दरिद्री तरुण आसपास आले कीं आईचं डोकं एकदम दुखायला लागतं—एकादा श्रीमंत मनुष्य असला तर मात्र मला घेऊन तासन्तास दिवाणखान्यांत एका खुर्चीवर, मांडी न मोडतां तिला बसतां येतं. माझ्या तीनही वडील बहिणी श्रीमंतांना दिल्या आहेत. मला श्रीमंत नवरा मिळेपर्यंत आईची डोकेदुखी थांबायची नाहीं. मीं ऐकलं आहे कीं, श्रीमंतांच्या मागें मुलीच्या लग्नाचा नारळ घेऊन लागते

म्हणून लोक तिला 'नारळीबाई' म्हणतात!—मला या सगळ्या प्रकारचा कंटाळा आला आहे. जोग्यांसारख्या जोगणीहि असतात का हो–एकट्या, स्वतंत्र राहणाऱ्या?"

तिनें आपल्या काळ्याभोर पापण्यांच्या झालरींतून आपले टपोरे डोळे बुवांकडे रोखले. बिचारा नुसता जागच्याजागीं चुळबुळला व त्यानें एक उष्ण सुस्कारा सोडला. मुंबईच्या चार सुप्रसिद्ध सुंदर बहिणी 'धोळकिया भगिनी' म्हणून ज्या प्रसिद्ध होत्या त्यांतली सर्वांत धाकटी, शिल्लक राहिलेली ही कांचनगौरी.

"पण मी एकटीच किती बोलतें आहे!" ती गोडपणें हंसून हलक्या आवाजांत म्हणाली, "तुमच्या आयुष्यांतल्या नवलकथेबद्दल मला कळलं आहे. आमच्या हॉटेलवाल्यानें नियमांच्या यादीच्या शेवटीं तुमचा वृत्तांत दिला आहे थोडासा—खरंच, तुमचा प्रेमभंग झाला म्हणून तुम्ही जोगी बनलांत?"

"होय, खरं आहे तें—पण हॉटेलच्या नियमांबरोबरच माझी कथा छापली त्यांनीं? जाऊं दे, जगाशीं मला आतां काय करायचं आहे?...ती त्यावेळीं देवी वाटली मला. तिच्याशिवाय जग व्यर्थ वाटलं म्हणून गिरिगव्हरांत येऊन राहिलों तिची स्मृति उराशीं बाळगून..." गंभीर आवाजांत जोगी म्हणाला.

"किती उदात्त गोष्ट ही! पण जोगी होण्यांतहि सुख आहे, कपड्यांची कटकट नाहीं, शिष्टाचारांच्या भानगडी नाहींत; लग्नाचा जुलूम नाहीं—स्वतंत्र आयुष्य—कांहीं जोगी लग्नं करतात काहो कधीं?"

"योग्य जोड मिळाली तर कोणीहि जोगी करील!"

"पण तीच मिळाली नाहीं म्हणून ते जोगी झालेले असतात ना?"

"त्यांचा तो नुसता भ्रम असेल—नंतर जर शहाणपण आलें व योग्य जोडीदारीण त्यांच्यासमोर आली तर त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडतो."

"दरिद्री लोकांकडे पहायची देखील मला बंदी आहे—पण प्रत्येक जोग्याचं गुप्तधन कुठेंतरी जवळपास पुरलेलं असतं म्हणतात."

"माझं कांहीं नाहीं," जोगी खिन्नपणें म्हणाला.

"अरेरे, माझी समजूत होती कीं—पण आतां मला गेलं पाहिजे!" ती उठून उभी राहिली. तिच्यासारखें लावण्य त्यानें जन्मांत पाहिलं नव्हतें. गद्‌गद् आवाजांत तो म्हणाला,

" सुंदरी—"

" माझं नांव कांचनगौरी धोळकिया, अगदीं जवळचीं माणसं मला कांची म्हणतात." ती त्याच्याकडे उन्मादक नजरेनें पहात म्हणाली, " तुम्ही हॉटेलमध्यें मला भेटायला या कीं एकादे वेळीं."

" मी या गुहेपासून शंभर पावलांच्यावर दहा वर्षांत कधीं गेलों नाहीं—"

" संध्याकाळचे या, मी तुमची वाट पाहीन, पण गुरुवारीं नाहीं हो! लक्षांत ठेवा, गुरुवारीं मी भेटायची नाहीं."

एकाद्या हरिणीसारखी ती वाट उतरून दृष्टीआड झाली. जोगी उठून इकडे तिकडे पाहूं लागला. आपण जर खालीं उतरलों तर आपल्या कीर्तीवर काय परिणाम होईल हा विचार तो करीत होता.—' कांचनगौरी—कोणा भाग्यवंताशीं तिचं लग्न होईल बरं?' हिंडत हिंडत तो परत आपल्या मठीजवळ आला.

तेथें एक गृहस्थ उभा होता.

तो गृहस्थ पुष्ट, तजेलदार व चैनी दिसत होता. त्याच्या रेशमी कोटाला सोन्याचीं बटणें, हातांत रुप्याच्या मुठीची काठी, दुसऱ्या हातांत उंची चिरूट होता; कोण असेल हा?—हां—दिवेचा! नरभेराम दिवेचा, जोग्याचा जुना स्नेही, त्याच्यापेक्षां वयानें पांच वर्षांनीं मोठा, पण दिसत होता पांच वर्षांनीं लहान!

जोग्याची व त्याची दृष्टादृष्ट होतांच तो ओरडला, " तूं घेलाभाई टेकचंद! तुझ्या दाढीनें, तुझ्या छाटीनें, मी फसणार नाहीं! मीं तुला ओळखलं, खालच्या गिरनार–आश्रमाच्या नियमांखालीं तुझ्याबद्दल माहिती छापली आहे. दहा वर्षं दडी मारून बसला होतास, पण तें कशासाठीं बाबा?"

" तूं पहिल्यासारखाच वाचाळ आहेस नरू"—जोगी आपल्या शिळेवर बसतां बसतां म्हणाला, " बैस समोरच्या दगडावर—जन्मांत एकदां तरी कठिण बैठकीवर बसण्याचा अनुभव घे."

नरभेराम बसला. तो जोग्याकडे निरखून पहात म्हणाला, " घेला! हा काय प्रकार आहे? दहा वर्षं एकाद्या बाईचं नांव तूं सोडण्याइतका चक्कर होतास, पण एका बाईसाठीं जगाकडेच दहा वर्षं पाठ फिरवायचं कारण काय? तुझी हकीकत

मला माहीत आहे. शोभावती शहानें तुला झिडकारलें म्हणून तूं विरक्त झालास. अरे वेड्या, तिनें तर कैक लोकांना बनवलं! इतकं मनाला लावून घेणारा तूं एकटाच निघालास. बाकीचे कोणी प्यायला लागले तर कोणी कॉंग्रेसमध्यें पडले. कोणी दुसऱ्या पोरींच्या मागें फिरूं लागले—पण शोभावती शहा—पोरगी मोठी जलाल खरी! काय तो रुबाब, ती बुद्धि, तें रूप!"

"मीं जगाला रामराम ठोकल्यावर दहा वर्षांत तिचं नांवसुद्धां ऐकलं नाही." जोगी खालीं पाहात म्हणाला.

"तिनें माझ्याशीं लग्न केलं." नरभेराम उत्तरला. जोग्यानें दुसरीकडे पाहिलं. नरभेराम गंभीरपणानें म्हणाला,

"तूं मनांत काय म्हणत असशील ही मला कल्पना आहे; पण ती दुसरं काय करणार? तिचं कुटुंब मोठं, त्यांना तर ऐटींत राहायला पाहिजे. तुझ्या बुद्धीची छाप तिच्यावर पडली, पण माझ्या तीन मोटारी, दोन बंगले आणि सहा बॅंकांतले अकाउंट तिनें जास्त पसंत केले! शिवाय मी तिला तेव्हां थोडा आवडलोंहि होतों!"

"आणि आतां?"

"आतां आमचें एकमेकांशीं वैर नाहीं—पण आमचं पटत नाहीं. लग्नानंतर पांचसहा वर्षांतच आमच्या लक्षांत आलं हें. आम्ही संगनमत करून बडोद्याला गेलों आणि छेडा-छुटका—घटस्फोट करून घेतला! शोभावती आतां स्वतंत्र आहे, मीं तिच्या पोटगीसाठीं एक लाख रुपये दिले तिला. मला वाईट कांहीं देखील वाटत नाहीं. पटलं तितक्या दिवस आनंद केला, आतां पुन्हां मोकळे ते मोकळे! पण घेला, तुझा हा त्रिदंडी संन्यास—हा आचरटपणा आहे असं नाहीं का वाटत तुला?"

जोगी दाढींतल्या दाढींत हांसला. त्यागाच्या दहा वर्षांनीं त्याच्यांत जबरा आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. या टेकडीवर म्हणजे आपण कैलासावर आहोंत आणि बाकीच्या मानवी जन्तूंचे हताश प्रयत्न तुच्छतेनें पहात आहोंत अशी स्वतःची खात्री त्यानें करून घेतली होती—आणि शिवाय नुकतीच एक त्रैलोक्यसुंदरी

त्याच्या आयुष्यांत आली होती, तिच्यापुढें दहा वर्षांच्या अंधुक आठवणीची काय किंमत ?

लवकरच नरभेराम गेला. साधु हळूहळू आपल्या पाकसिद्धीला लागला. खुदखुषीनें तो अजूनहि स्वतःशीं स्मित करीत होता. या क्षुल्लक धडपडींच्या अतीत आपण झालों आहोंत. आपल्याला स्वर्गीच्या अप्सरा येऊन भेट देतात...वगैरे त्याचे विचार चालले होते.

इतक्यांत झोंपडीबाहेर कोणी आल्याची चाहूल त्याला लागली. शेगडी पेटविण्याचा राकेलचा कांकडा चटकन् लपवून तो उठला. त्यानें प्रश्न केला,

" कोण ? "

दारांत एक स्त्री येऊन उभी राहिली—शोभावती शहा ! त्यानें तिला ताबडतोब ओळखलें. दहा वर्षांत तिच्या तडफदार तारुण्याचें परिवर्तन मादक मध्यावस्थेंत झालें होतें; परिपक्व शरीरसौष्ठवाला डौलदार गांभीर्याची जोड मिळाली होती; डोळ्यांतलें चांचल्य कालाच्या ओघानंतर स्थिर झालें होतें. दोघांनीं जवळ जवळ मिनिटभर निश्चलपणें एकमेकांकडे पाहिलें. नंतर ती मंद आवाजांत बोलली,

" मी खालच्या गिरनार हॉटेलमध्यें उतरलें आहे. तिथं तुमच्याबद्दल मला कळलं. तुम्हांला भेटल्याशिवाय मला राहवेना. मला तुमची क्षमा मागायची आहे. मीं पैशासाठीं माझं सुख विकलं. माझ्यावर दुसऱ्या माणसांचा भार होता—पण त्या सबबीनें माझा गुन्हा कांहीं कमी होत नाहीं. तुम्ही दहा वर्षं इथें राहात आहांत, माझी स्मृति उराशीं बाळगून ! मी आंधळी होतें. जगांतल्या सगळ्या धनाला इमानी हृदयाची सर नाहीं हें मला आतां कळलं; जर—पण आतां कांहीं उपयोग नाहीं, होय ना ? "

ती स्वतःला अर्पण करायला, आपल्या चरणाशीं विलीन व्हायला आली आहे हें जोगी उमगून चुकला. त्याच्या तपाचें फल समोर आलें होतें. त्यानें पृथ्वीचें राज्य जिंकलें होतें. नुसती इच्छा दर्शविण्याचा अवकाश, तें त्याला मिळत होतें मूर्तिमंत विजयश्री त्याला माळ घालायला उभी होती— त्याला हवी असली तर ! क्षणभर जुन्या स्मृतींच्या मधुर लहरींनें त्याचें हृदय थरारलें-पण पुन्हां त्याला

आठवण झाली कीं एकदां झिडकारून आतां हें आडगि-हाइकी झालेलें प्रेम त्याच्या-पुढें आलेलें होतें. आणि शिवाय एक तरुण अप्सरा त्याच्या डोळ्यांसमोर नाचूं लागली होती—कांचनगौरी.

"आतां कांहीं उपयोग नाहीं." तो निश्चयी आवाजानें म्हणाला.

शोभावती परत फिरली. पंधरा वीस पावलें गेल्यावर तिनें एकदां थबकून वळून पाहिलें परंतु तो जडपणें उभा राहिला होता. तिचे मोठे तेजस्वी डोळे एकवार आशेनें—भुकेल्या आशेनें त्याच्या डोळ्यांना भिडले, पण त्यानें आपलें कठोर औदासिन्य कायम ठेवलें.

कांचनगौरी दोनतीन दिवस न आल्यानें गुरुवारीं जोगी अगदीं बेचैन झाला होता. संध्याकाळ झाली; चंद्र उगवला. जोग्याला एकदम ऐहिक, पार्थिव, मानवी मोहानें पछाडलें. गिरनार हॉटेलच्या रेडिओमधून कांहीं मधुर संगीताच्या लहरी त्याच्या कानावर येऊन आदळल्या—त्याचा कांहींतरी निश्चय झाला.

गुहेंत जाऊन गंजलेल्या कुलपाची पेटी त्यानें उघडली. गुहेंत त्यांतून काढलेल्या दहाबारा मेणबत्त्या लावून त्यानें रोशनाई करून टाकली. कात्री, वस्तरा वगैरे साहित्य काढलें. महत्प्रयासानें त्यानें दाढी-मिशा उडवून साफ केल्या. स्वतःचे केस तर कापणें त्याला अशक्यच होतें, पण शक्य तितके आखूड—मानेवर येतील इतपत ते कमी केले; नंतर दहा वर्षांपूर्वीचे ठेवणींतले कपडे काढले व त्यानें पोषाख केला. पेटीच्या कोपऱ्यांत एका वळचणीला ठेवलेल्या बाराशें रुपयांच्या नोटाहि काढून त्यानें खिशांत ठेवल्या. झोपडी बंद करून तो खालीं उतरूं लागला. . .

दहा वर्षांपूर्वीचे फॅशनेबल कपडे! आणि शिवाय दहा वर्षात त्याच्या शरीरांत झालेला फरक आणि त्याचे लांब केस—आणि चाळीस वर्षांच्या वयाला न शोभणारा चेहऱ्यावरचा उत्साह! जोगी कसा दिसत होता हें सांगणेंच अशक्य आहे—चोर-बाजारांतल्या कपड्यांनीं नटलेला एकादां बेकार सिनेमानट—पण सिनेमानट उपाशी असला तरी फॅशनेबल असतो. गांवठी पाद्री—पण पाद्री लांब केस ठेवीत नाहीं. जोगी कशासारखाच दिसत नव्हता! इतकें मात्र खरें कीं त्याचा दुपारचा उदात्त अवतार आणि आतांचें हास्यास्पद स्वरूप, हें विलक्षण परिवर्तन पाहून कोणालाहि खेद झाला असता.

तो मोठ्या उत्सुकपणें हॉटेलच्या बाहेर येऊन पोहोंचला. आज गुरुवार, तरी कांचनगौरी रागावणार नाहीं ही त्याला खात्री होती.

हॉटेलच्या आंत विशेष रोशनाई केलेली असून एक ख्रिश्चन बँड वाजत होता. मंडळी भपकेदार पोषाखांत व गडबडींत होती. बाहेरच्या भय्याला पूर्वाश्रमींच्या जोग्यानें विचारलें, "आज काय आहे ?'

भैया उद्गारला, "वा, माहीत नाहीं का तुम्हांला ? आज बडे लाखोपति शेठ नरभेराम यांचा वाङ्निश्चय आहे, धोळकिया शेठाणीच्या धाकट्या मुलीशीं—कांचनगौरीशीं–त्यांचें लग्न ठरलें आजच !"

# १८. सुखभूमि

"जात, धर्म, वंश वगैरे गोष्टींवर माझा काडीइतका विश्वास उरला नाहीं," चिनय्या म्हणाला.

आम्ही दोघें त्याच्या मोटरमधून अपॉलो बंदरच्या बाजूनं फेरफटका मारीत होतों रस्त्यांत दिसणाऱ्या निमगोऱ्या युरेशियन मुलींच्या घमेंडखोरपणाबद्दल मीं नुकतेच उद्गार काढले होते.

"तें कांहीं जातीमुळेंच नव्हे. कोणी 'जातीवर गेला' म्हणून कोणाबद्दल म्हटलें तर मला तें पटत नाहीं. जातिवैशिष्टय वगैरे कांहीं नाहीं, मनुष्यप्राणी तेवढा येथून तेथून सगळीकडे सारखाच." चिनय्या पुढें बोलूं लागला, 'कलकत्ता युनिव्हर्सिटींत पेरियप्पन् म्हणून एक वंशवेडा मुलगा होता माझ्या ओळखीचा—"

चिनय्याच्या अनेक मनोरंजक आठवणींपैकीं एक ऐकायला मिळणार म्हणून मीं कान टंवकारले. त्यानें कफ् परेडवरून चर्चगेट स्टेशनाच्या बाजूनं समुद्रावर गाडी नेऊन उभी केली व आपली गोष्ट सांगितली.

चिनय्या एक हरहुन्नरी इसम होता. अर्धवट शिकलेल्या सूटबूट घालणाऱ्या माणसाला साधतील असे सगळे धंदे करून तो मोकळा झाला होता. पुस्तकांचा फिरता विक्र्या, 'कार्निव्हल'मधला ललकाऱ्या, जाहिरातींचा एजंट, सिनेमाचा डोअरकीपर, नट, कॅांग्रेस स्वयंसेवक, टायपिस्ट, कारकून—एकना दोन, कैक उलाढाली

त्यानें केल्या होत्या. तूर्त त्याचा धंदा मोटर-दलालाचा होता. माझी व त्याची ओळख कशी झाली हें माझ्या लक्षांत नाहीं, पण मुंबईतच असल्यामुळें वरचेवर भेट व्हायची व गृहस्थ मोठा बडबड्या असल्यामुळें करमणूकहि मिळायची. एके दिवशीं ऑफिसांतल्या 'पाट्या टाकून' उपरणें झटकून, 'सहा-सात'ची लोकल पकडायला चर्चगेटला मी जात होतों. या स्वारीनें मला स्टेशनजवळ हांक मारली व फिरायला नेऊन नंतर घरीं पोहोंचविण्याचें आमिष दाखविलें. तिमाजी नायकाच्या चाळींतल्या माझ्या शेजाऱ्यांवर बिऱ्हाडापुढें मोटरींतून उतरून छाप मारण्याची संधी मीं मोडली नाहीं—म्हणूनच आम्ही आतां मोटरींत होतों.

मी कलकत्त्यास त्यावेळीं कमिशन एजंटचा धंदा करीत होतों, ( चिनय्यानें सुरुवात केली ) त्याचवेळीं एका स्नेह्याच्या टर्म्स भरण्याचेंहि माझें काम चालू होतें ! युनिव्हर्सिटींत इतर विद्यार्थ्यांत माझें खूप जाणें येणें होतें. इथल्यासारखीच सगळीकडे माझी ओळख, खेळाडू मुलांसारखीच अभ्यासी मुलें—आणि मुली देखील—

त्यांच्यांत पेरियप्पन् म्हणून आंध्र प्रांतांतला एक मुलगा होता. त्याची आणि माझी विशेष दोस्ती होती. मी मूळचा आंध्र किंवा तेलंगीच; पण पेरिया हा अस्सल आंध्र होता. मद्रासी या सर्वसाधारण वर्गात येईल असा एकहि गुणधर्म त्याच्यांत नव्हता. त्याला इतिहासाचें मोठें वेड. एम्. ए. ला देखील पुराण-इतिहास हा विषय त्यानें घेतला होता आणि नेहमीं त्यांतच तो गढलेला असायचा. आंध्र-प्रांताच्या पुराणेतिहासानें तर त्याला पछाडलेंच होतें. पांड्य, चोल, कलिंग, कनिष्क, धनुष्य, आणि अशाच कसल्याशा राज्यांत तो गढलेला असायचा; आपण स्वतः अस्सल चोल वंशाच्या राजघराण्यांतले आहोंत असें त्यानें मला सांगितलें.

त्याच सुमारास कलकत्ता युनिव्हर्सिटींत बालिनी पांडियन् म्हणून दुसरी मद्रासी मुलगी होती. ती प्राणिशास्त्राची विद्यार्थिनी, पण दूरदेशांतले सजातीय एके ठिकाणीं जमायचे, त्याप्रमाणें आम्ही तिघेंहि बरोबरच हिंडत असूं. पेरिया तिच्यावर खूष होता. ती निर्भेळ पांड्य वंशांतली आहे असें त्यानें मला सांगितलें. बाकी दिसायला ती जोडी योग्यच होती; दोघेंहि नाकाडोळ्यांनीं चांगलीं, लहानखुऱ्या बांध्याचीं खरीं, पण काळींभोर. फरक इतकाच कीं पेरियाचा काळेपणा जुन्या घोंगडीसारखा लालसर होता तर बालिनीचा काळेपणा अमावास्येच्या आकाशासारखा निळसर होता.

त्या दोघांचीं विद्वत्ताप्रचुर संभाषणें नेहमीं चालायचीं व पुढेंमागें तिची ज्ञानगंगा त्याच्या बुद्धिसागराला मिळणार अशी धास्ती मला पडली होती. कोर्स संपला तरी पेरिया कलकत्त्यालाच घोंटाळत राहिला. थोड्याच दिवसांत हा बालिनीला 'विचारणार' अशीं चिन्हें दिसायला लागलीं होतीं—

एके दिवशीं सकाळीं अस्ताव्यस्त स्थितींत तो मला भेटला व बालिनी नाहींशी झाल्याची त्यानें बातमी दिली. तिचा पत्ता त्याला कोठेंच लागला नाहीं. तिनें राहायची जागा सोडून दिली होती आणि कॉलेजमध्यें जाणेंहि बंद केलें होतें. पेरिया अगदीं उदास होऊन गेला; त्यानें त्या पोरीचा ध्यास मनाला फार लावून घेतला होता: 'आतां आयुष्यांत कांहीं गोडी लागणार नाहीं, वगैरे ठराविक प्रेमविव्हलतेचे शब्द तो बोलूं लागला. त्याच्या नेहमींच्या व्यवस्थित राहणीची घडी पार बदलून गेली. पोरगा वायां जाणार असें शिष्ट लोक म्हणूं लागले. माझ्यात्याच्या भेटी क्वचित्च होत. मी पूर्वींची जागा सोडून दुसरीकडे राहायला गेलों होतों व ती जागा त्याला माहित नव्हती.

बालिनी बेपत्ता झाल्यावर सुमारें महिन्यानें तो मला डलहौसी रोडवर भेटला. तो पुन्हां ठिकाणावर आल्यासारखें दिसत होतें, पण थोड्याच वेळांत माझा गैरसमज दूर झाला. अवांतर गप्पा मारल्यानंतर त्यानें मला विचारलें.

"चिनू तुझा काय उद्योग चालला आहे सध्यां?"

कमिशन एजन्सी चालत नसल्यामुळें ती बंद करून दुसरा एकादा रोजगार सुरू करण्याचा माझा विचार मीं त्याला सांगितला.

"तुला चार सहा महिने पुरेल अशी नोकरी देतों. परदेशीं यावें लागेल माझ्याबरोबर, वेळ पडल्यास स्वयंपाक्यापासून सेक्रेटरीपर्यंत सगळीं कामें करायचीं माझा मदतनीस म्हणून. आहे तयारी?"

"पण जायचें कुठें?"

"डच ईंडीजमधें—जाव्हा सुमात्रा-बोर्निओ वगैरे. मला रिसर्च स्कॉलरशिप मिळाली आहे तिकडच्या हिंदी संस्कृतीचे प्राचीन अवशेष पाहाण्यासाठीं; त्या पैशांत दोघांचीहि सोय होईल. मला माझी एक स्वतंत्र कल्पना धसास लावून

पाहायची आहे तिथें. प्राचीन इतिहासांतल्या पांड्य, चोल, आणि कालिंग या जातींनीं तिकडे वसाहती केल्या होत्या असा माझा तर्क आहे—पण तें जाऊं दे. माझ्या विषयांत तुला गोडी नसली तरी प्रवास होईल. तीन चार महिने मजा करितां येईल, अंगमेहनत मात्र तुला पडेल."

मी कबूल झालों. लौकरच आम्हीं बटेव्हिआ ( जाव्हा ) चा रस्ता सुधारला. आम्हीं जबरदस्त वशिले लावले होते. कलकत्त्याच्या डच कॉन्सलची 'मजबूत' शिफारस असल्यामुळें व शिवाय 'नेदर्लेंडन्स् युनिव्हर्सिटी' कडूनहि पत्रद्वारें पुरस्कार मिळविल्यामुळें, बटेव्हिआला पोहोंचल्यानंतर आम्हांला अडचण कोठेंहि पडली नाहीं. प्रवासाच्या पंधरा तीन वारांच्या अवधींत पेरियानें डच भाषेचा बराचसा अभ्यास केला होता तोही त्याच्या कामास आला. संशोधनासाठीं आम्हांला मुक्तद्वार मिळालें.

हिंडत हिंडत आम्ही सुमात्रामध्यें साक्रोबहामी या ठिकाणाला आलों. तेथील तद्देशीय लोक त्याला 'सुखभूमि' म्हणतात या एकाच कारणानें पेरियाच्या मनानें घेतलें कीं येथें जवळपास नक्की कांहीं अवशेष सांपडणार. विचारपूस करीत करीत आम्ही जंगलांत शंभर सवाशें मैल आंत शिरलों. अखेर एक लहानशी वसाहत लागली. व्हॅन ग्रूटेन नांवाच्या एका संपन्न डचमनची ती इस्टेट होती. त्यानें सभ्यपणें आमचें स्वागत केलें व आपल्या घरीं मुक्काम ठेवण्यास सांगितलें. त्याची इस्टेट सुमारें १०० चौरस मैल पसरली होती. तें सगळें जंगल होतें. सुमारें दोन तीन हजार लोक त्यांत काम करीत असत; रबर, लाख, ऊद, डिंक वगैरे वन्य पदार्थ ते गोळा करून आणीत व ग्रूटेन त्यांना पांचवा हिस्सा मेहनतीदाखल देऊन चार हिस्से माल आपल्या वखारींत भरीत असे. ते लोक फारच तक्रार करूं लागले तर ( ग्रूटेन साहेबानें डोळे मिचकावीत सांगितलें ) पांचव्या हिश्शाऐवजीं नाइलाज म्हणून तो त्यांना सहावा हिस्सा देत असे ! तो चांगलाच गबर झाला होता. नेदर्लेंडस् हॅंडेल बॅंकेंत आपण वर्षाला नियमानें साठ हजार गिल्डर ठेवीत असतों असें त्यानें थंडपणें सांगितलें. इस्टेटीवर जुने अवशेष भरपूर होते, व स्थानिक लोकांचा धर्म नांवापुरता जरी ख्रिस्ती किंवा इस्लामी होता, तरी जंगलांतल्या सगळ्या देवांना ते नवस करतात ही माहिती पण ग्रुटेन यानें दिली. दुसऱ्या दिवसापासूनच आमच्या संशोधनाच्या सफरी सुरू झाल्या.

## चोरबाजारांतील चिजा

जंगलाच्या उत्तरेच्या बाजूला एक मोठें पडीक देऊळ असल्याची बातमी एक दिवस एका मजुराकडून आम्हांला मिळाली. दुसऱ्याच दिवशीं सकाळीं आम्ही तिकडे गेलों. तें देऊळ पडीक पण भव्य होतें. त्याच्या खांचाकपारींतून झाडेंझुडपें उगवलीं होतीं तरी नक्षीकाम मात्र उघड उघड हिंदू धर्तीचें दिसत होतें. पेरिया तर तें पाहून अगदीं उड्या मारायला लागला. कुडगुडपुरम् येथील व्यंकटेशाच्या मंदिराची ही हुबेहूब प्रतिकृति असल्याचें त्यानें सांगितलें. जाळ्यावेलींमधून मार्ग काढून त्या मंदिराचें महाद्वार आम्हीं शोधून काढलें. त्यापासून एक पाऊलवाट होती यावरून अजूनहि कांहीं लोक या देवळांत येत असावेत असें दिसलें. हळूहळू आम्ही वेगळे होऊन सभामंडपांत एकएकटेच हिंडायला लागलों. थोड्या वेळानें मी गाभाऱ्यांत गेलों. वरच्या झरोक्यांतून येणाऱ्या अंधुक प्रकाशांत पाहतों तों पेरिया कपडे काढून टाकून मूर्तीच्या चौथऱ्यावर बसलेला.

" वा, छान शोभतो आहेस " मी म्हणालों, पण त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. मी त्याला ओढून खालीं उतरवायला गेलों, पण हात लावतों तों ती दग-डाची मूर्ति !

क्षणभर मला वाटलें कीं मंदिर भ्रष्ट केल्याबद्दल पेरियावर हा देवाचा कोप झाला असावा, पण इतक्यांत नेहमींच्या कपड्यानिशीं मागून पेरिया स्वतःच आंत आला. " तुला लपवावा आणि याला दाखवावा, " मीं मूर्तीकडे बोट दाखवून म्हटलें.

त्यानें बराच वेळ मूर्तीकडे टक लावून पाहिलें. " माझ्या चोल पूर्वजाची प्रतिमा " तो पुटपुटला. मीं हांसलों.

" थट्टा नाहीं, पहा पाहिजे तर " म्हणून कपडे उतरून पेरिया मूर्तीच्या पवित्र्यांत खालच्या पायरीवर बसला.

दोन्ही आकृतींत थोडादेखील फरक नव्हता.

*" मग तूंच या मन्दिराचा स्वामी " मीं त्याला म्हणालों.*

इतक्यांत सभामंडपाच्या दाराशीं आवाज ऐकूं आले. कपडे गोळा करून व माझा हात धरून पेरियानें झटकन् एका अंधाऱ्या कोंपऱ्यांत मला नेलें.

आम्हीं लपलेल्या जागेंतून पहात होतों. सातआठ तद्देशीय बायकापुरुष आंत आले. फळें फुलें वस्त्रें वगैरेचा नैवेद्य त्यांनीं देवापुढें ठेवला. एकानें कांहीं मंत्र

म्हटले ( त्यांत बरेचसे ओळखीचे संस्कृत शब्द ऐकूं आले ); नंतर सर्व मंडळी साष्टांग नमस्कार घालून चालती झाली. आम्ही पुढें आलों. भूक सपाटून लागली होती.

" माझ्या पूर्वजापुढें ठेवलेल्या प्रसादाचा परामर्ष मींच घ्यायला पाहिजे " पेरिया म्हणाला, व आम्हीं दोघांनीं यथेच्छ फराळ केला ! परत जायला म्हणून मंदिराच्या दारापाशीं आलों, तों लांबून कोणी गाणें गुणगुणत येत असल्याचा आवाज आला.

बाजूच्या झरोक्यांतून जरा बारकाईनें पाहिलें तों सुमारें दोनशें पावलावर नैवेद्याचें ताट खांद्यावर घेऊन देवळाकडे संथपणें येणारी एक तद्देशीय मुलगी दिसली. तिनें आम्हांला पाहिलें नाहीं, पण देवळाकडे तोंड केलें तेव्हां तिचा चेहरा दिसला—

देहभान विसरून घोगऱ्या आवाजांत पेरिया उद्गारला, " बालिनी ! तेथें नाहींशी होऊन येथें अवतरली ! "

ती बालिनी पांडियन्‌चीच मूर्ति होती. जंगली जीवनामुळें तिच्या शरीराचा घाट जास्त चांगला होता, पण मुद्रा सहीसही बालिनीची. पेरियानें माझा हात पकडून मला पळत पळत गाभाऱ्यांत नेलें. तेथील मूर्ति उचलायला मला खूण केली. ती माणसाएवढी दगडी मूर्ति मोठ्या मुष्किलीनें उचलून आम्हीं अंधाऱ्या कोपऱ्यांत ठेवली. पेरियानें आपले कपडे काढून टाकले व मघाच्या लोकांनीं वाहिलेल्यापैकीं एक वस्त्र गुंडाळलें. थेट मूर्तीसारख्या पवित्र्यांत तो आपल्या ' पूर्वजाच्या ' ठिकाणीं बसला. मी कोपऱ्यांत पूर्वीप्रमाणें लपलों. त्याचा निश्चलपणा पाहून मला जरा चमत्कारिकच वाटलें.

बालिनीच्या रूपाची ती मुलगी देवळांत आली. आपल्या जवळचा नैवेद्य पेरियापुढें ठेवून तिनें त्याची स्वतःच्या भाषेंत बरीच प्रार्थना केली; हात जोडून डोळे मिटून थोडा वेळ तशीच बसली. पुन्हां डोळे उघडून बरोबर आणलेला फुलांचा हार मूर्तीला घालायला म्हणून ती उठली—तेव्हां पेरियानें डोळे उघडले व तिनें पुढें केलेल्या हारासकट तिचे हात धरले !

तिचें अंग एकाएकीं थरारून गेलें, पण ती बिलकूल भ्याली नाहीं. तिचे डोळे नक्षत्रासारखे चमकूं लागले. देवानें आपली हांक ऐकली ही तिची खात्री झालेली

दिसली. तिनें जशी कांहीं अपेक्षाच केली होती कीं देव आपल्याला जवळ घेईल; तिला विशेष आश्चर्य वाटलेंसें दिसलें नाहीं. पेरियानें तिला जवळ ओढून घेतली व घट्ट आलिंगन दिलें. त्या मुलीच्या मुद्रेवर जन्माचें सार्थक झाल्याचा भाव स्पष्ट दिसत होता. नंतर एकमेकांच्या गळ्यांत पूजासाहित्यांतले हार त्यांनीं घातले व हातांत हात घालून तें जोडपें देवळाबाहेर पडलें.

तीं दोघें लांब जाईपर्यंत मी 'आ' करून पहातच राहिलों होतों, पण बरींच लांब गेल्यावर शुद्धीवर आलों व ओरडून पेरियाला हांका मारूं लागलों. पण तो व ती हळूहळू जंगलांत दिसेनाशीं झालीं!

त्यानंतर पेरियाचा कांहीं पत्ता लागला नाहीं. मोठ्या मिनतवारीनें मैन्हीर व्हॅन ग्रूटेनकडून हिंदुस्थानाला परत येण्यापुरते मीं पैसे काढले. पेरिया जंगली झाला ( gone native ) असें ग्रूटेन साहेबांचें मत पडलें. एक महिन्यानें मी कलकत्त्याला परत येऊन पोहोंचलों.

पेरियाची गोष्ट ऐकून बालिनींची मोठी करमणूक झाली—

हो तुला सांगायला विसरलोंच, बालिनी नाहींशी झाली म्हणून पेरिया सांगत आला होता ना? ती तेव्हां नाहींशी होऊन माझ्या नव्या घरांत सौ. चिनप्या म्हणून स्थापन झाली होती. जंगलांतली मुलगी पाहून मी पहिल्यानें चमकलों होतों, पण जवळून बारकाईनें पाहिल्यानंतर ती माझी बालिनी नव्हे हेंहि मीं ओळखलें होतें!

## .१९. उलटलेली चाळिशी !

'साडेतीनशें–पंचवीस द्वितियांश—साडेसातशें'च्या ग्रेडमध्यें केशवराव दाखल झाले तेव्हांपासून त्यांनीं आपल्या रहाणींत आमूलाग्र फरक केला. डिंग्याच्या चाळींतील अठरा वर्षांची जागा सोडून ते दादर हिंदु कॉलनींत स्वतंत्र गाळा घेऊन राहूं लागले. मॅट्रिकच्या वर्गातल्या आपल्या गोपूला त्यांनीं केस राखायची परवानगी दिली; पत्नी सत्यभामाबाई यांना छापाचीं पातळें घेऊन दिलीं; स्वतः लॉंग कोट व रुमाल हा पेहराव सोडून त्यांनीं सूट, टायकॉलर व हॅट वापरण्यास सुरवात केली. पुढल्या दिवाणखान्यासाठीं घडीच्या सहा खुर्च्या व जादा एक टेबल आणलें व जुन्या धोतरांचे पडदे शिवून दरोबस्त खिडक्यांना लावण्याविषयीं सत्यभामाबाईंना फर्मावलें.

पावणेचारशें पगार झाल्यावर तर कॉलेजांत गेलेल्या गोपूलासुद्धां त्यांनीं पाटलोणी शिवविल्या. घरीं चोवीस तासाचा गडी ठेवला. बायकोला जरीच्या चपला, बॅग, लांडी छत्री, वगैरे आयुधें खरेदी करून दिलीं व कचेरींतून परत आल्यावर बायकोबरोबर फिरायला जाण्याचा क्रम सुरू केला. ते स्वतः डोक्यावरचे तुरळक करडे केस विंचरून भांग पाडूं लागले, रोज सफाचट दाढी करूं लागले व थर्ड क्लास ऐवजीं सेकंड क्लासनें ऑफिसला जाऊं लागले. महिन्यांतून एक शनिवार टॅक्सी करून सपत्निक सिनेमाला जाण्याची संवय त्यांनीं ठेवली–व त्याचा परिणाम म्हणून कीं काय ते पत्नीशीं थोडाबहुत रोमान्सहि करूं लागले.

आज सकाळीं ते बरेच लौकर जागे झाले होते. थोडीबहुत थंडी पडूं लागल्यामुळें हवेंत मोठी खुमारी वाटत होती, आणि या थंडीमुळें मागच्या वर्षी शिवलेला उंची कापडाचा गरम सूट वापरण्याची संधि आली, या विचारानें तर केशवरावांची तब्येत जास्तच खूष होती. सकाळीं उठून चहा, दाढी, स्नान वगैरे रोजचे व्यवसाय चालू असतां, आपल्या आयुष्याच्या एकंदर स्थितीबद्दल ते विचार करीत होते......पंचेचाळिशीच्या घरांत गेलों असलों तरी आपली प्रकृति सुदृढ, साधा-

रण चाळिशीच्या आंतलेच आपण दिसत आहोंत, आपली अंगयष्टी रुबाबदार—थोडी गरगरीत असली तरी ती सुखवस्तु स्थितीच दाखविते; आणि चेहऱ्यावर सुखी जीवनाची तुकतुकी. ऑफिसांत अधिकाराची जागा आणि पुढील बढती जवळ आलेली, बँकेंत सगळे मिळून बारा साडेबारा हजार शिल्लक, घरची रहाणी आरामशीर, मुलगा चांगला सूज्ञ निघालेला—दोनचार वर्षात तो बी. ए. झाल्यावर साहेबाच्या वशिल्यानें त्यालाहि कुठेंतरी चिकटवून घ्यायला पाहिजे! गृहिणी तर आपण शिकवूं त्याप्रमाणें वागणारी—खरोखर, घराचें सगळें सुख या सहधर्मचारिणीमुळें आहे! किती शांत आणि प्रेमळ स्वभाव, संसाराची किती दक्षता, घरांत टापटीप किती, वागणूक किती रुबाबदार! आपल्यासारख्या अम्मलदाराला शोभणारी बायको खरी! चाळिशीच्या घरांत तीहि असेल, पण वाटायचें नाही कोणाला! आमचा जोडा पाहून तरुण जोडप्यांनीं देखील लाजावें. ती रूपानें मोठी लावण्यवती नसली तरी काळासांवळा मोहक चेहरा, प्रतिष्ठित मध्यम बांधा व कपडा वापरण्याची हातोटी—छे छे! आपण भाग्यवानच म्हणायला पाहिजे अशी जोडीदारीण असायला; डिंग्र्याच्या चाळींतली साडेतीन वर्षांपूर्वीची ती टोपपदरी सत्यभामा हीच असें कुणी ओळखायचेंसुद्धां नाहीं—आणि आपला तो लॉग कोट—जाऊंद्या, एकंदर आपल्याला तक्रारीला कांहीं जागा नाहीं म्हणायची, सुखाची नोकरी, सुखाचा संसार, ठीक आहे, समाधान आहे आपल्याला......

नवीन आयुष्यक्रमाला अनुसरून खुर्ची-टेबलावर जेवायला बसले असतांना तर समोर बसलेल्या पत्नीबद्दल त्यांना अधिकच अभिमान, आदर नि, कौतुक वाटूं लागलें. साधारणपणें आपल्या स्थितींतल्या एकाद्या साहेबाइतके आपण सुखी आहोंत ही त्यांची खात्री होऊं लागली. जेवण झाल्यावर सत्यभामाबाईंना त्यांनीं विडा करून देऊन तो आपल्याबरोबर खायला लावला. आज पेहरलेल्या आपल्या ठेवणींतल्या सूटवर उगीचच पत्नीकडून ब्रश मारून घेतला.

आणि ऑफिसांत जाण्यास दारांतून बाहेर पडायच्या आधीं तर बायकोला जवळ ओढून केशवरावांनीं तिचें चुंबनच घेतलें!!!

चटकन् दार बंद करून ते जिन्यावरून उतरले, ते इतक्या गोंधळलेल्या स्थितींत, कीं नित्यनियमाप्रमाणें त्यांचे पाय स्टेशनाकडे न वळतां विरुद्ध दिशेला ट्रॅम टर्मिनसच्या बाजूला वळले; पण आपली चूक लक्षांत आल्यावर परत फिरणें त्यांच्या

जिवावर आलें. चार पांच पावलें अनिश्चितपणें जाईपर्यंतच त्यांनीं ठरवलें कीं आज ‘ बस ’ नेंच आरामांत जाऊं थेट ऑफिसच्या दाराशीं ! हा विचार ठरल्यावर त्यांनीं आपली नेहमींची दुडकी चाल सुरू केली व नेहमींच्या संवईप्रमाणें ताठ मान करून समोर पाहून ते चालूं लागले.

त्यांनी वर पाहायला आणि समोरून एक अतिसुंदर तरुण मुलगी यायला एकच गांठ पडली. तिची व त्यांची दृष्टादृष्ट झाली, सुमारें पांच सेकंद तिनें त्यांच्याकडे पाहिलें, तिच्या तोंडावर एक मधुर स्मित उमटलें व तोंपर्यंत जवळ येऊन त्यांच्या बाजूनें ती निघूनहि गेली.

तिच्या टपोऱ्या घाऱ्या डोळ्यांची ती नजर किती बेडर ! तिच्या शुभ्र नितळ कपाळावर भुरक्या केसांचीं एकदोन वलयें आलेलीं होतीं. तिच्या सरळ नासिकेच्या बाजूला पडणाऱ्या स्मिताच्या रेषा तरी किती रेंखीव—आणि तिच्या हनुवटीवरची खळगी ! हंसीसारखी शुभ्र आणि गोल अशी तिची मान, अरुंद पण भरदार असे ते तिचे स्कंद, नाजुक गोंडस हात, गुलाबी कमलाच्या पाकळ्या आंथरल्यासारखीं कोमल पाउलें आणि अशा प्रकारच्या या नितांतरमणीय शरीराला उठाव देणारी, छापाचें नाजुक पातळ नेसण्याची ती कला—सौंदर्य, यौवन, रसिकता, बुद्धि, यांची जणूं मूर्तीच !

आणि तिनें आपल्याकडे पाहून स्मित केलें—खरोखरच आपल्या चेहऱ्यांत कांहीं विलक्षण आकर्षण असलें पाहिजे आज—सकाळपासूनच एक प्रकारचा कसा अवर्णनीय उत्साह वाटतो आहे. ही भेट जशी काय दैवानें ठरवलीच होती आजच्यासाठीं ! तिला आपल्या चेहऱ्यांत काय विशेष दिसलें असावें बरं ? सुखवस्तूपणाचा तजेला ? का एकंदर भारदस्त रुबाब—का आपली तरतरी आणि उत्साह—का आपल्या मुद्रेवर झळकणारें बुद्धिमत्तेचें तेज ? साहेब आपल्या हुषारपणाची पसंती दाखवितो—तीच हुषारी तर या चाणाक्ष मुलीनें ओळखली नसेल ? खरोखर बुद्धीलाच बुद्धीची ओळख पटते, आणि तरतरीतपणा किंवा रुबाबदार वागणूकसुद्धां एकाच दृष्टिक्षेपांत लक्षांत घेणारी ती पोर रसिक खरी ! पुन्हां तिला व्यवहारी वृत्तिही योग्य तीच असली पाहिजे—आपल्या सुस्थितीची चेहऱ्यावरची खुलावट ओळखून तिनें स्मित केलें—महा धोरणी ती ! दुसरी एकादी पोरकट, धांदरट मुलगी असती तर तिच्या

लक्षांतसुद्धां आलों नसतों आपण—एकाद्या लांब केसाच्या किडकिडीत चष्मेवाल्या पोरावर आपले नयनबाण सोडले असतेन् !

खरंच, एकाद्या सुंदर तरुणीचें लक्ष वेधून घेण्याइतकें व्यक्तित्व आपल्यामध्यें आहे एकूण ! सौंदर्यान्वेषी दृष्टि जशी आपल्याला आहे तशी सुखान्वेषी दृष्टि तिला असेल का ? त्या सौंदर्याचें योग्य चीज करणारा कोणी भेटावा यासाठीं तिची तळमळ नसेल कशावरून ? संपत्तीशिवाय सौंदर्याचें चीज कुठें होणार, आणि त्या संपत्तीचें मूर्तिमंत तेज आपल्यामध्यें तिला खात्रीनें दिसलें असावें. बारा हजार रुपये—कोणाच्या दृष्टीनें ही संपत्ति नसेल, पण आज इतके तरी कोणाजवळ असतील ? आपल्या कोंकणांतल्या केळशी गांवांत नगद बारा हजारांचा धनी एक तरी आढळेल ? आपल्या ग्रेडच्या तर एकाहि माणसानें इतकी माया केली नसेल ! पण त्या बारा हजारांची या सौंदर्यापुढें काय किंमत आहे. तिच्यावर ओवाळून टाकावेत ते ! एकदां खर्चायलाच पैसे काढले तर काय शक्य नाहीं ? तिची ओळख वाटेल तशी करून घेतां येईल ! मुंबईत भेटी घ्यायला निवांत ठिकाणेंहि कांहीं कमी नाहींत–तो रंगराव परवांच सांगत होता—वेळ पडली तर काश्मीरलासुद्धां जाऊं दोघेंजण—नोकरी ? एकदां त्या स्वर्गीय प्रेमाच्या साम्राज्यांत विहार करायला लागल्यावर किंमत काय नोकरीची—आणि त्या रुक्ष गद्य संसाराची ? या सौंदर्याच्या प्रेरणेनं लाथ मारूं तेथें पाणी काढूं—अहाहा किती मोहक तें स्मित !......

ते बस स्टँडवर येऊन उभे राहिले होते. त्यांना हवी ती बस आल्यावर ते एकद्या पोरासारखे टुणकन् उडी मारून वर चढून गेले—थेट अगदीं पुढच्या सीटवर जाऊन बसायचें त्यांनीं ठरवलें. मधल्या बाकावरच्या एका माणसानें त्यांच्याकडे चमकून कुतूहलपूर्वक स्मितपूर्वक पाहिलें—त्यांच्याहि तोंडावर उन्मादाचें स्मित झळकलें ‘ पाहणारच तो,’ ते मनांत म्हणाले,’ प्रीतीच्या पाइकावर दुनिया दिलखुष असते !’ बांकावर बसतांबसतां त्यांनीं बसमधल्या आरशांत पाहिलें—व ते धाडकन् त्या गादीच्या सीटवर बसले !

मध्यमवयस्क रंगेलपणाचें प्रतीक–घरांतून निघतांना पत्नीचें चुंबन घेतांना लागलेलें तिचें कुंकू,–त्यासाठींच तो मागचा मनुष्य हांसला–आणि–अरेरे ! त्यासाठींच ती मुलगीहि पण हांसली होती...

## २०. भाऊचा धक्का

शेवटची पावली टाकून मोतीरामानें एक सिगारेटचें पाकीट व काड्याची पेटी घेतली. एक सिगारेट पेटवून युनिव्हर्सिटीच्या बाजूनं तो 'ओव्हल' कडे चालूं लागला. शेवटची दहा रुपयांची नोट त्यानें सकाळींच काढली होती. तीन महिन्यां-पूर्वी मार्च पहिलीला मिळालेला, वर्षाच्या हातखर्चासाठींचा हजाराचा चेक आतां शेवटचाच ठरला होता. आतां त्याच्या खिशांत पैदेखील उरली नव्हती. श्रीमंतीच्या ऐश्वर्यातला चैनीचा जीवनक्रम एकाएकी थांबला होता, पण त्याला विशेष वाईट वाटत नव्हतें; गरिबीचा पहिला अनुभव त्याला जरा मजेदारच वाटत होता; जणुं संपन्न स्थितीतून त्याला सुटका झाल्याचं समाधानच होत होतें! हवेंत बंद पडलेल्या विमानांतून उडी टाकणाऱ्या माणसाला पाराशूट उघडल्यावर जो बेछूट निश्चिंतपणा येतो, तो त्याला आला होता. धास्ती त्याच्या गांवींहि नव्हती. 'पुढें काय' हा विचारसुद्धां त्याच्या मनाला शिवला नाहीं; 'झालें काय?' याचा विचार करीत तो ओव्हलच्या बाजूनं संथपणें चालला होता.

झालें तें अगदीं सरळ क्रमवार झालें होतें. आपले धनाढ्य मामा दीनानाथ धारणे यांच्या घरीं पोरका मोतीराम सात वर्षांपासून राहत होता. तोच एकटा त्यांचा वारस होता—दुसऱ्या बहिणीचा एक मुलगा मामांजवळ त्याच्या आधीं होता खरा, पण त्यानें 'गुण उधळल्यामुळें' मामांनीं त्याला हांकून देऊन त्याच्या जागीं मोतीरामाची स्थापना केली होती. आपल्यापूर्वीच्या त्या मुलाचें नांव शांताराम पिठोरे या पलीकडे मोतीरामभाऊला कांहीं माहिती नव्हती, व त्याला पर्वाही

नव्हती. मामांच्या भव्य बंगल्यांत पेडर रोडवर राहायचें, भपकेदार कपडे करायचे, आपल्या " बाबागाडी "तून हिंडायचें; सिनेमा, क्लब, होटेल्स, वरळी, जुहू, वगैरेंचा परामर्ष घ्यायचा; बिलें येतील तीं सगळीं मामांकडे पाठवायची; व वर वर्षाला हजार रुपये हातखर्चासाठीं घ्यायचे, हा त्याचा सामान्य कार्यक्रम होता. धारणेशेठ त्याच्या खर्चाबद्दल हूं का चूं करीत नव्हते; बंदरांत येणाऱ्या आगबोटीवर लागणारें हरएक सामान पुरविण्याचा ( स्टीव्हेडोरचा ) त्यांचा धंदा जोरांत चालला होता. बारा लाखांची माया त्यांनीं एव्हांना करून ठेवली होती. भाऊचा खर्च म्हणजे त्यांना ' किस झाडका पाला ' होता. आपल्या वारसानें रुबाबांत पण इभ्रत सांभाळून राहावें हीच त्यांची इच्छा. चार चार दिवसांत भाऊची नि त्यांची समोरासमोर भेट व्हायची नाहीं ! त्याचीं बिलें देणें व त्याला पैसे देणें हेंसुद्धां परस्पर आपल्या सॉलिसिटरच्या मार्फत ! पण या थंड कार्यक्रमांत एकाएकीं व्यत्यय आला. कोणाच्या, भाऊच्या देखील, स्वप्नीं नव्हतें. त्याचें प्रेम एका मुलीवर बसलें व तिच्याशी लग्न करण्याची त्याची इच्छा मामांना कळतांच त्यांनीं तुफान करून, त्याचा वारसा वगैरे सगळें रद्द करून त्याला घराबाहेर केलें !

हें सगळें काल समाप्त झालें होतें. वर्षाचा हातखर्च नेहमीप्रमाणें तीन महिन्यांतच खलास झाला होता. पण आतां केवलरामभाईना आळवून कांहीं मिळण्यासारखें नव्हतें. केवलरामभाई हे ' मेसर्स तनसुख अँड मनसुख सॉलिसिटर्स, ' या फर्ममधले वरिष्ठ भागिदार; नेहमीं हातचे सगळे पैसे उडवून भाऊ त्यांच्या गळीं पडला म्हणजे ते कोठून तरी त्याची ' सगवड ' करून द्यायचे. पण भाऊ आतां कायदेशीर ' बिनवारस ' झाल्यावर मामांच्या सॉलिसिटरपुढें उभा राहून त्याला काय उपयोग ? भाऊवर त्यांची मर्जी खरी, पण त्यांनीं मेहरबानीनें दिलेले त्यांचे स्वतःचे पैसे भाऊला नको होते.

आणि म्हणूनच सकाळीं घराला रामराम ठोकून अंगांतल्या एका सुटानिशी बाहेर पडलेला भाऊ अखेरची दहाची नोट मोडून ती खलास करून आठाच्या सुमाराला मोकळा झाला होता !

ओव्हलच्या हिरव्यागार मैदानाभोंवतालची गर्दी कमी झाली होती. समुद्राचे वारे नारळीच्या पानांतून सळसळत होते. चर्चगेट रस्त्याला मोटरची रहदारी चालू

होती. पण ओव्हल व युनिव्हर्सिटी यांच्या मधला रस्ता शांत होता. राजाभाई टॉवरमध्यें साडेआठाचें संगीत वाजलें, फुटपाथवरून फेऱ्या मारून दमलेला मोतीराम ओव्हलच्या कडेच्या एका बांकावर बसला.

त्या बांकाच्या टोंकाला एक मनुष्य हातावर डोकें ठेऊन बसला होता. आयुष्यांतल्या सर्व आकांक्षांची राख झालेल्या मुंबईच्या हजारों मळकट पांढरपेशांचा तो एक ठराविक नमुना असेल, डोळ्यांसमोर चालणारी समाजांतली निर्लज्ज विषमता पाहून तापणारें डोकें एकांताच्या कैफानें शान्त करायला तो आला असेल, नाहींतर अभिजात निष्क्रियतेंत आयुष्य वेंचणारा शहरचा शिलेदार, किंवा स्वाभिमानाची कल्पनाहि नसलेला लाचार बांडगूळ बाण्याचा बारगीर असेल. कोणीहि असला तरी मोतीरामाच्या सृष्टींत तो कधीं दिसलेला नव्हता. ‘ मोटारमधून हिंडणारे व पायीं चालणारे ’ असे दोनच मानव वर्ग त्याला माहित होते. हा बांकाच्या टोंकावर बसलेला मनुष्य मोटारींत न बसणाऱ्यांपैकीं आहे इतकेंच त्यानें पाहिलें, व अंगीं बाणलेल्या शिष्टाचाराला अनुसरून नाकासमोर पाहत बांकाच्या आपल्या टोंकाला तो सिगारेट फुंकीत बसून राहिला.

मुंबईच्या मानवी समुद्राच्या लाटांनीं किनाऱ्यावर वरचेवर फेंकलें जाणारें तें जिवंत शेवाळें बांकाच्या दुसऱ्या टोंकावरून किलकिल्या डोळ्यांनीं मोतीरामाकडे पाहत होतें. ती व्यक्ति चुळबुळ करून खांकरून आपलें अस्तित्व मोतीरामाला जाणवूं लागली; अखेर त्या माणसानें घोगऱ्या आवाजांत काड्याची पेटी मागितली.

मोतीरामानें मुकाट्यानें पेटी दिली. विडी शिलगावून ती परत देतांना तो मनुष्य म्हणाला, ‘ शेठसाहेब, सकाळपासून भुका आहें मी—’

मोतीरामानें खिन्न स्मित केलें,

‘ शेवटची पावली मीं सिगारेटसाठीं खर्च केली, आतां मी अगदीं कफल्लक आहें—’

‘ पण तुमचे कपडे तर—’

‘ तेवढेच माझ्याजवळ शिल्लक आहेत. ’

‘ घरदार बिऱ्हाड ? ’

‘ कांहीं नाहीं. ’

‘ कां—माफ करा हं साहेब, घरांतून कोणी काढून दिलं वाटतं ? ’

मोतीराम चपापला, तो चांचरत म्हणाला,

‘ छे छे, घर बेलिफाच्या ताब्यांत गेलं —नोकरीहि गेली आहे माझी—’

‘ च् च् च् ! त्या माणसाला खरोखरच हळहळ वाटल्याचें दिसलें. ‘ फार वाईट झालं शेठ ! एकदम काळ फिरला म्हणजे काय होईल याचा नेम नाहीं; माझंहि अगदीं तुमच्यासारखं झालं बघा—’

‘ तुझं ? मोतीराम आश्चर्यानें त्या माणसाकडे न्याहाळून पाहूं लागला. त्याचे कपडे गबाळ, दाढी वाढलेली, डोळे आंत गेलेले होते, पण त्याचा आवाज सभ्य माणसासारखा होता, भाषाहि शुद्ध होती, हें मोतीरामाच्या लक्षांत आलें.

‘ माझ्यासारखं झालं म्हणजे काय ? ’

‘ एकदम श्रीमंतींतून दारिद्र्यांत पडलों मी. तुमची नोकरी गेल्यामुळें तुम्ही असे इकडे आलांत, पण मी नोकरबिकर नव्हतों—एका गर्भश्रीमंत माणसाचा वारस होतों. माझे पाय कधीं जमिनीला लागणार नाहींत अशा ऐषआरामांत होतों. एकाएकीं बुड्ढेबुवांची मर्जी फिरली—थोडासा अविचार झाला असेल माझ्या हातून; पण त्या म्हाताऱ्यानं, माझ्या मामानं, मला एकदम दूर लोटला, अन् दुसरा एक भाचा हुडकून आणून वारस बनविलंन् ! ’

भाऊनें आपल्या चेहऱ्यावरची उत्कंठा दाबून विचारलें, ‘ किती दिवस झाले या गोष्टीला ?’

‘ सात एक वर्षं झालीं. ’

‘ हं ऽ ऽ मग इतकीं सगळीं वर्षं याच स्थितींत आहेस तूं ? ’

‘ जवळ जवळ याच; संवयच पडली होती मला या जिण्याची ! पण आतां मोठी भानगड आली आहे एक; आज सकाळीं एका सॉलिसिटरच्या शिपायानें माझं मकाण शोधून काढून मला एक पत्र दिलं ( मकाण कसचं ! त्या जरमहालाच्या जिन्याखालीं टाकतों माझीं लक्तरं— ) मला उद्यां सकाळी दहाला बोलावलं आहे—माझ्या त्या मामाची मर्जी पुन्हां फिरली म्हणे ! आहे त्या भाच्याला हांकलून आतां पुन्हां मला वारस करणार आहे असं होतं त्या पत्रांत—’

आपला सगळा निग्रह एकवटून स्थिर हातांनीं भाऊनें एक सिगारेट पेटवली; अगदीं सहज विचारल्यासारखें त्यानें विचारलें,

'नांव काय तुझं ?'

'शांताराम पिठोरे. तुमचं काय शेठ ?'

मोतीरामानें एक मिनिटभर अडखळून आपल्या ओळखीचा सर्वांत तिरस्करणीय मनुष्य डोळ्यांपुढें आणला,

'अन्तू गोवेकर म्हणतात मला—'

'अस्सं...हें पहा गोवेकरसाहेब, एक वेळ पोटभर खाण्यापुरती तुमची मदत पाहिजे होती मला; माझे हातपाय अगदीं गळून गेले आहेत ! उद्यां मी बारा लाखांचा वारस होईन-पण-मला भयंकर धास्ती वाटते आहे ! मी उद्यांपर्यंत जगेन हा भरवंसा वाटत नाहीं मला ! हा प्रसंग येईल ही कल्पनासुद्धां नव्हती-कांहीं सुचत नाही-धाकधुक होते आहे—' तो प्राणी काकुळतीनें विवळूं लागला.

'हां, थांब, फार्स करूं नको,' भाऊ कठोरपणें म्हणाला, 'तुझी गडबड पाहून कोणाला वाटेल कीं तुला संपत्ति मिळायची नसून ती तूं आतांच घालवून बसला आहेस. शान्त हो, मी आज एका दिवसांत रसातळाला गेलों, पण मला तुझ्या उलट वाटतं आहे !'

'नशीब तुमचं !—अहो तुम्हांला दारिद्र्य माहित नाहीं—लूत भरलेल्या कुत्र्याचं जिणं अजून पुढेंच आहे-तुमची आशा धक्के खाऊन अर्धमेली झाली नाहीं-पैशाची, सुखाची, वैभवाची किंमत तुम्हांला नसेल—माझा हा पुनर्जन्म आहे—सगळं जग माझ्या डोक्याभोंवतीं फिरायला लागलं आहे-माझा बुद्धिभ्रंश होईलसं वाटतं आहे-मला आतां जीवंत राहिलंच पाहिजे-इतक्या दिवस मरणाची वाट पाहत होतों, पण आतां-आतां मला मरूं देऊं नका हो ! मला जगवा-उद्यांपर्यंत सांभाळा—माझ्या जवळ राहा—मला सोडूं नका !'

तो उठून उभा राहिला. त्याचें बोलणें उन्मादानें किंचाळण्यासारखें येऊं लागलें, मोतीरामानें त्याला ओढून खालीं बसवलें.

'हें बघ शान्तारामा, घाबरूं नकोस, मी राहतों तुझ्याजवळ; असा तमाशा करूं

नको. तिकडे बघ, त्या पोलिसानें दोनतीनदां या बाजूला पाहिलं. जरा हिंमत धर, ही सिगारेट पेटव आणि उठून सावकाश माझ्याबरोबर चल थोडासा. '

थोडें धाकानें, थोडें कृतज्ञतेनें त्या माणसानें भाऊचें ऐकलें; दोघे हळूहळू बरोबर चालूं लागले. पूर्वीपेक्षां बऱ्याच संथ आवाजांत तो मनुष्य म्हणाला, ' खरोखर तुमचे मोठे उपकार आहेत हे; मला धीर द्यायला कोणी नसलें तर मी वेडा होईन. बारा तासांनीं बारा लाखांचा वारसा मिळायचा आहे, पण तोंपर्यंत हें दारिद्र्य देखील मला अगदीं घातकी वाटायला लागलं आहे ! पोटात कांहीं असतं तर हिंमत इतकी खचली नसती. पण—'

मोतीरामानें हलकेच त्याला एका बांकावर बसविलें.

' मीं कांहींतरी कोशीस करून कांहीं खायला आणतों. तूं बसून रहा इथें; आतां इतक्यांत आलों.' असें म्हणून तो म्यूझियमच्या बाजूला गेला. कॉर्कसन बारमधें खिशांत दिडकी नसतांहि कायम आश्रयदात्याच्या आत्मविश्वासानें तो शिरला. त्याचे कपडे चांगले होते. थेट काउंटरपाशीं जाऊन तेथील पार्शाला तो म्हणाला,

' रुस्तम; बाहेर एक मनुष्य अगदीं हलाखींत भुकेनें व्याकुळ होऊन गिरगांवपासून धडपडत आला आहे; बिचारा मरूनसुद्धां जाईल एकादेवेळीं; तुझ्या इथल्या बशांतून उरलेले पावाचे तुकडे आणि असाच कांहीं खाना त्याला देऊन टाकण्यासारखा असला तर बघ, बांधून दे मजजवळ, मी त्याला देऊन येतों.'

रुस्तमनें मान डोलविली. ' अरे सेठ खराब खाना कसाला ? आमाला बी दया हाय. तेनची फिकर तुमी नको करूं. अरे पिंटो—'

पिंटोनें आणलेली ' सँडविचेस ' ( पावाच्या दोन थरांत वेगवेगळे पदार्थ भरलेल्या वड्या )चा पुडा घेऊन मोतीरामानें परत त्या बांकाकडे नेला. पुडा उघडून पाहून त्या माणसाला एक मिनिटभर खरें वाटलें नाहीं; नंतर एक एक तुकडा मोठ्या चविष्टपणानें खात तो म्हणाला,

' तीन वर्षांत मी इतक्या नामी चिजा खाल्ल्या नाहींत. तूं कोणती युक्ति लढवून भीक मागितलीस–मला तरी सांग. यांतलं निम्मं राखून ठेवूं उद्यां सकाळसाठीं–खरंच गोवेकर, तूं मला इतकी मदत केली आहेस कीं उद्यां माझं काम झाल्यावर मामाकडून तुला एकादी नोकरीदेखील देववीन—पण तो उद्यांचा दिवस कधीं

उगवेल–का तो येणारच नाहीं–मला तो पाहायला मिळायचा नाहीं ? एकदां वाटतं नको तो कांहीं कटकट–या थांबण्यानें–वाट पाहत ताटकळत बसण्यानें, अगदीं वेड लागायची पाळी येते. खरं नाहीं वाटत उद्यांचं ! मला बनवीत तर नसतील ना— कां नकोच जाऊं मीं—'

' बडबड बंद कर आणि नीज पाहूं या बांकावर. '

' तूं जाणार नाहींस ? '

' नाहीं. '

' उद्यां सकाळीं सॉलिसिटरच्या ऑफिसांत नेऊन पोहोंचवशील सहीसलामत ! '

' होय, हा मी इथंच या टोकाला आहें. '

एका बाजूला हात उशाशीं घेऊन तो भिकारी झोंपी गेला व दुसऱ्या बाजूला दगडी पुतळ्यासारखा निश्चल बसून डोळे उघडे ठेवून मोतीरामानें रात्र घालविली.

सकाळीं बरोबर दहाला ते केवलरामभाईच्या टेबलापुढें उभे राहिले. केवलराम हे सॉलिसिटर असल्यासुळें त्यांना मानवी भावना नव्हत्याच. शांतारामाच्या भिकारी-पणाबद्दल त्यांना बिलकूल आश्चर्य वाटलें नाहीं व मोतीरामाचें त्याच्याशीं साहचर्य पाहूनहि ते निर्विकार राहिले. नाकावर चष्मा ठेवून ते म्हणाले,

' शांताराम पिठोरे, काल तुला पत्र लिहिल्यानंतर आमच्या अशिलानं पुन्हां विचार बदलल्यामुळें, तुझे कांहीं काम नाहीं, हें कळविण्यास मला वाईट वाटतें. '

' वाटलंच मला ! भलत्या गोष्टी कुठें होतात ? हा चाललों मी ! '

त्या भिकाऱ्याच्या चेहऱ्याकडे मोतीराम पाहतच राहिला. कालची सगळी भीति, धास्ती, घाबरटपणा, लाचारपणा, निस्तेजपणा जाऊन शांतारामाच्या चेहऱ्यावर पुन्हां छान टवटवी आली होती !

तो निघून गेल्यावर केवलराम कांहींच न झाल्याच्या आवाजांत पुढें म्हणाले,

' आणि मोतीरामभाऊ, तुला मामांनीं परत घरीं राहूला बोलावलं आहे. तुझ्या इच्छेच्या ते आड नाहींत–अरे, हें काय ?-अरे सोनू पाणी आण जलदी, पंखा चलाव, सेठ बेहोष झाले बघ—'

चोवीस तासांच्या दारिद्र्याच्या भयंकर स्वप्नांतून, परत नेहमींच्या ऐश्वर्यात जागें होण्याचा भाऊला धक्का बसला होता. भोंवळ येऊन तो खुर्चीत पडून राहिला....

## २१. किन्नराश्रमांतील पाहुणे

महालक्ष्मी बॅटरीच्या जवळपास कुठेंतरी एक छोटेंसें हॉटेल आहे, पण त्याचें गुपित त्याच्या कांहीं निवडक आश्रयदात्यांनीं इतकें खबरदारीनें राखून ठेवलें आहे की सामान्य माणसाला त्या होटेलचा पत्ताच लागणें शक्य नाहीं ! किन्नराश्रम हें त्याचें नांव; कंबाला हिलच्या समुद्राच्या बाजूला एका गर्द झाडींत त्याची टुमदार इमारत आहे. पाठीमागें टेकडी व पुढें क्षितिजापर्यंत पसरलेला समुद्र असा दुहेरी देखावा दिसण्याचें भाग्य त्या किन्नराश्रमाला लाभलेलें आहे. महालक्ष्मीला बॅटरीवरून जाणाऱ्या रस्त्यावरची वाहतूक तेथून नुसती अस्पष्ट ऐकूं येते, दिसत नाहीं. ह्या होटेलचे आश्रयदाते मुंबई शहरांतले व इलाख्यांतले सुखवस्तू भाग्यवान् असे कांही आंतल्या गांठीचे थोडे लोक आहेत; ते त्या होटेलबद्दल इतके सावध आहेत की कानाच्या कोंपऱ्याला सुद्धां त्यांचें अस्तित्व कळूं देत नाहींत, अगदीं विश्वासू असेल, व जो माहितीचा दुरुपयोग करून त्या होटेलचा आब घालविणार नाहीं, अशा एखाद्या दुसऱ्या निवडक मित्रालाच हे वस्ताद आश्रयदाते या होटेलची माहिती गुप्तपणें देतात.

या होटेलवर पाटी नाहीं. पुऱ्या माहितीच्या आत्मविश्वासानें जो पाहुणा टॅक्सींतून आपल्या सामानासह ऐटींत बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन ठेपेल, तो आश्रयदात्यांच्या रहस्यांत सामील झाला आहे, असें गृहित धरून त्याचें स्वागत करण्यांत येतें. होटेलचा चालक होटेलवाल्यासारखा दिसत नाहीं, नोकर एखाद्या खासगी बंगल्यांतल्या नोकरांप्रमाणें स्वच्छ, जलद व मुकाट्यानें काम करणारे

आहेत. यांतील खोल्या हवाशीर, फर्निचर उंची व खाद्यपेयें अप्रतिम, अशी याची तारीफ आश्रयदाते आपल्या एकाद्या जिवलग मित्राजवळ मनमोकळेपणाच्या कैफांत करतात.

अशा या होटेलमध्यें ऐन जूनच्या कहरांत संध्याकाळीं सातच्या सुमाराला एक सुंदर, रुबाबदार व सभ्य स्त्री येऊन दाखल झाली. तिचें सामान बेताचेंच पण निवडक होतें. तिनें कारकुनाला नांवाची नोंद करण्यासाठीं आपली काड दिली—

'श्रीमती कमलिनी राजे'

तीं कुमारिका, सुहासिनी, का विधवा ही चौकशी कोणी केली नाहीं. त्याचप्रमाणें राजे हें तिचें आडनांव का किताब हा प्रश्न कोणाला पडला नाहीं. किन्नराश्रमाला शोभेल अशीच एक पाहुणी बाई आली आहे, हें आश्रमांतील नोकरचाकर व इतर पाहुणे यांनीं गृहीत धरलें.

तिच्या वास्तव्याच्या कालांत तिची वागणूक नमुनेदार होती; वाजवीपेक्षां जास्त ती कधीं बोलली नाहीं, व बोलली तेव्हां तिच्या आवाजांत मार्दव व अधिकारवाणी यांचें योग्य तेंच प्रमाण राहत असे. इतर पाहुण्यांना तिचे खानदानी वागणुकीनें संतुष्ट करून सोडलें होतें, कधीं डोळे रोखून कोणाकडे पाहिलें नाहीं व कधीं मुद्दाम कोणाची नजरहि चुकविली नाहीं. फक्त रात्रीं समुद्रावर पंधरा मिनिटें फिरून येण्यापुरतीच किन्नराश्रमाच्या बाहेर ती पडे. एरवीं दिवसभर आपल्या खोलींत, कधींकधी आश्रमाच्या वाचनालयांत व योग्य वेळीं जेवण्याच्या दिवाणखान्यांत, असा तिचा राहण्याचा क्रम असे. सकाळीं साडेआठच्या चहाला अगदीं साध्या पण टापटिपीच्या पोषाखांत, दुपारीं दीडच्या जेवणाला स्नानानंतरच्या साध्या वेषांत, (दुपारच्या चहाला ती येतच नसे) पण रात्रींच्या जेवणाला मात्र व्यवस्थित शृंगारांत ती सर्व पाहुण्यांबरोबर हजर राहत असे. रात्रीचा तिचा पोषाख इतका सुंदर असायचा कीं, इतर अतिथींची, ही कोणी राजघराण्यांतील बाई गुप्तपणें येथें येऊन राहिली आहे अशी खात्री व्हावी. दोनतीन प्रकारचीं जॉर्जेटचीं पातळें डोक्यावरून पदर घेऊन गोल पद्धतीनें ती आलटून पालटून नेसत असे; तिचे अंगावरचे दोनतीन ठळक अलंकार अतिशय नाजुक पण उठावदार दिसत; डाव्या खांद्यावर दोन लहानसे लाल गुलाब टोंचून अडकवि-

ण्याची तिला आवड होती. जेवणाच्या दिवाणखान्यांतच थोडें एका बाजूला तिचें लहानसें टेबल मांडलेलें असायचें; आवाज न करतां आपल्या नाजुक बोटांनीं नी एकेक पदार्थ खाऊं लागली तरी म्हातारे म्हातारे पाहुणेसुद्धां तिच्याकडे भान विसरून पहात बसायचे! कोंपऱ्यांतल्या 'वॉश बेसीन' मध्यें सर्वांच्या आधीं हात धूऊन, चटकन् तोंड पुसून, सगळ्यांचा निरोप घेतल्यासारखें एकदां पाहून, नी वरच्या आपल्या खोलींत जेव्हां निघून जायची, तेव्हांच इतरांचें उरलेलें जेवण व्यवस्थित व्हायचें!

किन्नराश्रमांत बाईला येऊन चारपांच दिवस झाले तेव्हां एका सकाळीं एक तरुण गृहस्थ येऊन तेथें उतरला. त्याची आकृति सर्व प्रकारें आश्रमाच्या पाहुण्याला शोभेलशी होती. साधा पण भारी पोषाख व अनुभविक जगांत वावरलेल्या माणसाची मुद्रा! त्यानें आपली खोली ठरवून घेतली. चार पांच दिवस राहण्याचा विचार प्रकट केला, व विलायतेला जाणाऱ्या बोटींचीं माहितीपत्रें गोळा करून तो आपल्या खोलींत जाऊन स्थापन झाला. एकदोन दिवसांतच पाहुण्यांची तो आपल्यापैकींच एक असल्याची खात्री झाली—इतकी त्याची वागणूक अचूक व व्यवस्थित होती. या नवीन माणसाचें नांव 'वीरेन्द्र मन्त्री' असें हळूहळू सर्वांना समजलें.

त्या दिवशीं रात्रींच्या जेवणाचे वेळीं तरुणाची जागा बरोबर बाईच्या टेबलासमोर आली होती. त्यांच्यांत परस्पर कटाक्ष झाले असले तरी ते समजायला मार्ग नाहीं; कारण किन्नराश्रमांतले पाहुणे दुसऱ्यांच्या भानगडींकडे मुद्दाम पूर्ण दुर्लक्ष करतात. दुसऱ्या रात्रीं नेहमींप्रमाणें जेवल्यावर हात धुऊन जातांना कमलिनीबाईंच्या किल्ल्या खालीं पडल्या. तरुणानें चटकन् उचलून त्या त्यांच्या स्वाधीन केल्या.

त्यावेळच्या 'थँक्स' पासून संभाषणाला संधि मिळाली. लौकरच औपचारिक संभाषणाचें रूपान्तर गप्पागोष्टींत झालें. किन्नराश्रमाच्या त्या विश्रांतीच्या वातावरणांत तोंडओळखीचें पर्यवसान दाट परिचयांत होण्यास किती उशीर?

एका संध्याकाळीं पोर्चवरच्या गच्चीवरून समुद्रावरच्या सूर्यास्ताकडे पाहात दोघें उभीं होतीं. आपोआपच आपण या स्थळीं कसे प्राप्त झालों हा विषय निघाला.

'नेहमीं त्याच त्या ठिकाणीं जायचा कंटाळा येतो—महाबळेश्वर झालें, माउंट

अबू झाला, मसुरीच्या देखील खेपा झाल्या.' बाई आपल्या मंजूळ आवाजांत गुण-गुणल्या, 'शेवटीं जवळच्या जवळ इतकी शान्तता आहे असं कळलं, मग कशाला जा त्या गोंगाटांत ?"

'खरं आहे.' तरुण म्हणाला, 'गलबला चुकविण्यासाठीं दर वेळीं मी समुद्राचाच प्रवास करतों – कधीं कोलंबो – कधीं एडन – कधीं सिंगापूर – पण बोटीवरहि असे चिकट लोक भेटतात कीं नको होऊन जातं—'

'मी इथं आलें हें कुणाला कळलं तर सगळी गर्दी इथेंच लोटायची ! याच्या-इतकं शान्त स्थळ मला एकच आठवतं – गुल्मार्गला आमच्या कनकपूरच्या चीफ-साहेबांची कोठी—'

'मीं बाली बेटाला जायचा विचार करीत होतों, पण त्या आधीं म्हटलं एकदां किन्नराश्रमाच्या कीर्तीचा पडताळा पहावा,'

'मला फार तर तीन दिवस आणखी राहतां येईल इथं – सतरा तारखेच्या फ्रँटियरनं निघायलाच पाहिजे.'

'मलाहि सोमवारींच हलावं लागेल येथून–अमेरिकन एक्स्प्रेसची टूरिस्ट बोट पकडायला पाहिजे.'

'हंऽऽऽ', म्हणून बाईंनीं एक सुस्कारा टाकला,

'हें ठिकाण कितीहि रम्य असलं तरी कायम कांहीं राहणं शक्य नाहीं इथं; गार्डन पार्टीज असायच्या, भेट–परतभेट, मोठेपणाच्या जबाबदारीचे सगळे सोहळे मागें लागलेले असतात–पण हे दिवस–मी कधींहि विसरणार नाहीं.'!

'आणि मीं पण–त्या सतरा तारखेच्या फ्रँटियर मेलचा मला आत्तांच राग आला आहे !'.......

त्याच गच्चीवर तीन दिवसानंतरच्या सकाळीं सोमवारीं सतरा तारखेला बाई आणि तरुण बसलीं होतीं. आश्रमाच्या नोकरानें चहाचें तबक आणून ठेवलें व तो निघून गेला.

बाई खालीं मान घालून बसल्या होत्या. हातांतल्या बॅगशीं त्या खेळत होत्या. ती बॅग त्यांनीं उघडली व आंत असलेले सहा रुपये त्यांनीं काढून तळहातावर धरले. निश्चयानें कठोर झालेल्या हलक्या आवाजांत त्या बोलल्या,

## चोरबाजारांतील चिजा

‘ मन्त्रीसाहेब, होटेलचं बिल चुकतं करून, नोकरांची बक्षिशी देऊन, उरलेले हे पैसे—मला लालबागेपर्यंत टॅक्सीला पुरतील, आणि पहिल्या तारखेपर्यंत उरलेल्या पैशांवर भागवावं लागेल. पहिल्या तारखेला माझा पगार येईल. मी पोयबावडीच्या कैलास हॉस्पिटलमध्यें नर्स आहें. आपण सभ्य आणि सच्चा दिलाचे दिसतां—आपल्याला फसविण्याची माझी इच्छा नाहीं. किन्नराश्रमांत पंधरा दिवस राहण्यासाठीं मीं दोन वर्षे पैसे सांठवतें आहें. या होटेलची तारीफ एक श्रीमंत शेठजी आमच्या हाऊस—सर्जन जवळ करीत होते ती मीं दाराअडून ऐकली. आपल्या नेहमींच्यापेक्षां वेगळ्या जगांत कांहीं दिवस राहण्याची हुरहूर मला लागली होती; पैसे सांठवले, कांहीं मैत्रिणींचें प्रवासी सामान जमवलें, दोनचार उंची साड्या भाड्यानें त्या जेठालालच्या दुकानांतून आणल्या व पंधरा दिवसांच्या हक्काच्या रजेंत इथं येऊन राहिलें. माझं खरं नांव कमला राजेवाडीकर—जातें आतां मी—’

‘ थांबा ’ तो म्हणाला, तुम्हांला वाईट वाटण्याचं कारण नाहीं. माझं खरं नांव विसू नाईक—मी पेट्रोल पंपावरचा कारकून आहें. माझा एक कॉलेजियन स्नेही सुटींत परगांवीं गेला होता त्याचा सगळा जामानिमा घेऊन मी येथें आलों आहें. आमचे शेट हळूच एका श्रीमंत गिऱ्हाइकाला या आश्रमाबद्दल सांगत होते तें ऐकून मलाहि इथें राहण्याची उत्कंठा झाली; मीहि आतां चिखलवाडींतल्या माझ्या खोलीवर जाणार—तुमच्यांतलेच दोन रुपये मला उसने दिलेत तर उपकार होतील—शनिवारीं मी परत करीन—संध्याकाळीं पावणे सहाला हॉस्पिटलच्या बाहेर भेटाल का मला—कमलाबाई ?—आपण पॅलेस सिनेमाला जाऊं—’

‘ अगदीं खचित भेटेन—विश्वनाथराव—पण—हिंदमाता सिनेमाला कसली फिल्म आहे गडे ?......’

## .२२. चि कि वा ल्या ची प्र ण य क था

“ उद्यांपरवां इतक्यांतच निघूं आम्ही काश्मीरकडे जायला. ” ओढणीच्या कांठाशीं बोटांचा चाळा चालवीत सकीना म्हणाली.

“ आजच सकाळीं कळलें मला हें; ” डाव्या गालावरच्या कोंवळ्या रेशमी दाढींतून एक बोट फिरवीत जाफर म्हणाला, “ लगेच तुला भटायला आलों. ” तिची भेदक नजर चुकवायचा त्यानें बराच प्रयत्न चालवला होता. ती कठोर आवाजानें बोलली.

“ तुम्हांला खबर मिळाली ही अल्लाची खैरच म्हणायची ! कळवीन म्हटलें तर पत्ता होता कुठें तुमचा इतके दिवस ? ” मानेला एक नाजुक हिसका देऊन ती खिडकीच्या बाहेर दूर दिसणाऱ्या दर्याकडे पाहूं लागली. जाफरनें जागच्या जागीं चुळबुळत दिलगिरीचे अर्धवट आवाज काढले व अजिजीच्या नजरेनें तो तिच्याकडे पाहूं लागला. पण सकीनानें त्याजकडे दुर्लक्ष केलें.

लुकमानजी व आक्समवाला या कुटुंबांत फार दिवसांचा घरोबा होता; इतकेंच नव्हे तर चारपांच परस्पर लग्नसंबंधांनीं त्यांच्यांत जवळचें नातेंहि तयार झालें होतें. दोनीहि घराणीं श्रीमंत, हौशी व बरींच पुढारलेलीं होतीं. ‘ लुकमानजी महाल ’ जरी चकला स्ट्रीटला व ‘ अक्झम मंझील ’ जरी चौपाटीवर होते, तरी दोन्हीकडच्या माणसांचें एकमेकांकडे जाणें येणें, परस्परांच्या घरीं उठणें बसणें रोजचें होतें. आपापसांतल्या पुरुषांपुढें या कुटुंबांतले जनाने पडदे देखील पाळीत नसत. मुलांमुलींना बरेंच स्वातंत्र्य होतें, दोनतीन मुली कॉलेजपर्यंतहि शिकल्या होत्या.

# चोरबाजारांतील चिजा

सकीना लुकमानजी सेंट झेवियर्समध्यें वर्ष दोन वर्षें जाऊन आलेली होती. जाफर अक्समवाला लहानपणींच धंदा शिकायला हबसाणांत गेला होता; त्याच्या घराण्याचा त्या देशांत मोठा व्यापार होता व त्यांच्या अक्सम येथील मुख्य ठाण्यावरूनच त्यांना हें आडनांव पडलेलं होतें. सिद्दिस्तानांत लढाई सुरू झाली म्हणून जाफर नुकताच स्वदेशीं आला होता. परदेशांत राहून साहजिकच अंगीं आलेला रुबाब, तरतरीतपणा, बहुश्रुतता, रंगेलपणा वगैरे गुणांनीं सकीनावर त्यानें तेव्हांच छाप ठेवली—दहा वर्षांच्या अपरिचयानें त्याच्याविषयीं तिला अगोदर आकर्षण वाटतच होतें.

पण अलीकडे महिना दीडमहिना त्याचें वर्तन बदललें होतें. त्यानें तोंडहि दाखवणें सोडलें होतें, व म्हणूनच आज तो औपचारिकपणें आलेला पाहून सकीना त्याच्यावर रागावली होती.

एक मिनिटभर दोघेंहि एकमेकांशीं न बोलतां बसलीं होतीं. इतक्यांत खिडकीच्या बाहेरच्या रस्त्यावरून पुकार ऐकूं आली.

"मिठाय्! शएरी मिठाइ! चालू जमानानी नवाई! बदननी बधाइ और दिलनी खुलाइ! अमेरिकन चीकी–टेसदार टोफी!"

जाफरच्या कपाळाला आंठी पडली, "काय पागलसारखी 'बूम पाडतो' आहे–उल्लू लेकाचा!"

सकीनेनें भुंवया चढवून त्याच्याकडे पाहिलं, "अस्सें! दोन महिन्यांपूर्वी याच माणसाची तुम्हाला मोठी गंमत वाटत होती....याच्या मिठाईला गुंडाळून येणाऱ्या कागदावरचे शएर, त्या उर्दू कविता, आपण मोठ्या हौसेनें वाचीत होतों–पण आतां माझ्यासारखाच त्याचाही वीट आला असेल तुम्हांला!"

जाफर कांहीं बोलला नाहीं. रस्त्यावरच्या चिकीवाल्यानें नेमकी खिडकीपुढं हातगाडी उभी केली. सकीना व जाफर दोघेंहि खिडकीशीं गेलीं. जाफरानें आठ आणे खालीं टाकले. चिकीवाल्यानें तें नाणें पकडलें व झटकन् कागदाच्या पुड्यांत चिकी बांधून तो पुडा अचूक खिडकींत फेंकला. जाफरनें तो झेलून टेबलावर ठेवला.

"या चिकीवाल्याची शादी होणार असें दिसतें," सकीना रस्त्यांत हळूहळू दूर जाणाऱ्या त्याच्या आकृतीकडे पाहून म्हणाली. खरोखर महिन्यापूर्वीचा चिकीवाला आज ओळखूं येत नव्हता; त्यानें एक उंच केंसाळ टोपी तिरपी ठेवली होती; त्याचा भडक पट्टयांचा झगझगीत रेशमी शर्ट गुडघ्यापर्यंत पोंहोचला होता, खालीं सफेद चुडीदार पैजामा पेहनला होता, पायांत मोठ्या बकलचे चकचकीत पेटंट लेदरचे बूट होते, व एक भयानक रंगाचा टिकल्या लावलेला रेशमी हातरुमाल त्याच्या लाल साटीनच्या जाकीटांत खोंचून ठेवलेला होता. सकीना पुढें बोलली, "दोन महिने कुठें गायब झाला होता कोण जाणे! आणि आला तो या पोषाखांत —ईदला तर अजून पत्ताहि नाहीं—जरूर शादीचा मामला दिसतो आहे याचा!"

जाफर कांहीं न बोलतां ठेबलावरचा पुडा सोडायला लागला.

"सबूर, इतक्यांत खोलूं नका," सकीना उद्‌गारली. तिनें ड्रॉवरमधून आपलें पॅड काढलें व त्यांतून एक तेलकट कागद काढून त्यावर कांहींसें छापलेलें तिनें जाफरला दाखविलें.

"आपण पहिल्या खेपेला घेतलेल्या चिकीच्या भोंवतीं हा कागद गुंडाळलेला होता—"

"बरेच दिवस झाले त्या गोष्टीला." तो खालीं पाहून गुणगुणला.

सकीनेनें मोठ्यानें त्या कागदावर छापलेला उर्दू शएर वाचला—

'जोंपर्यंत अस्मानांतला चांद उगवत राहील तोंपर्यंत तुझ्या मोहबतीशीं माझा दिलहि इमान ठेवील.'

जाफर खालीं मान घालून बसलेलाच होता. थोडा वेळ दोघेंहि अक्षर न बोलतां बसलीं होतीं. सकीनेनें क्षुल्लक विषयांवर गप्पा मारण्याचा प्रयत्न केला.

"आम्हीं पंधरा दिवसांपूर्वीच निघणार होतों पण अब्बाजानना वेळ नव्हता. मुंबईत सध्यां कांहीं गंमत नाहीं. आमच्या ओळखीचीं सगळीं माणसं कुठें तरी थंड हवेला गेलीं आहेत. गांवांत करमणुकीलासुद्धां नाहीं कांहीं. —नाहीं म्हणायला कोणचीशी नाचनारीण पीलाहाउसच्या थिएटरमध्यें नाचते, तिकडे मात्र गर्दी होते म्हणतात—पुष्कळ लोकांना पागल बनवलें आहे तिनें म्हणे!"

जाफर गोरामोरा होऊन दुसरीकडे पाहूं लागला. सकीनेनें पुन्हां विषय पालटला; समोरच्या भिंतीकडे शून्य नजरेनें पहात ती म्हणाली,

" त्या दिवशीं हा आतांचा कागद आपण बरोबरच वाचला होता, पुन्हां दिसला तेव्हां त्या चिकीवाल्याला थांबवून पांच रुपये इनाम दिले होते मीं. "

जाफरनें पुडा सोडला व टेबलावर साफ करून त्याच्यागरच्या उर्दू ओळी त्यानं मोठ्यानें वाचल्या,

' शराबी कैफामध्यें या बागेची वाट मी चुकलों होतों, म्हणून हे गुलाब, रागावून जास्त लाल होऊं नको–रहेम कर. "

सकीनेचा चेहरा लज्जेनें आरक्त झाला, तिनें तोंड फिरवलें. जाफरच्या मनांत एकदम आशा उत्पन्न झाली, खुर्चीवरून उठून तो हलक्या आवाजांत म्हणाला,

" सकीना !—"

तिनें नागिणीसारखा एकच कटाक्ष त्याच्याकडेटाकला, पण पुन्हां कठोर आवाजांत ती बोलली.

" सकीनाबानू म्हणणें शिष्टाचाराला जास्त शोभेल–किंवा मिस लुकमानजी म्हणालांत तर फार बरें होईल. "

जाफर तिच्याजवळ गेला.

" सकीना, तूं माझी कैफियत ऐकलीच पाहिजेस—तुझ्या माफीला मी लायक नाहीं हें मला माहित आहे, तरीहि मी माफी मागतों आहें. जवानीमध्यें एकादे वेळीं पागलपणाचा असा कैफ येतो कीं माणसाची अक्कल नाहोंशी होते–पण मी आतां शुद्धीवर आलों आहें; तुझ्यापुढें मला दुनियेची किंमत नाहीं; इतक्या दिवस ज्या जंजिरांनीं मला जखडलें होतें ते मीं तोडले–बघ, ज्या जहेरी नखरेल नागिणीनें मला भुरळ पाडली होती तिचें नांव सोडून दिलें. आतांच्या कागदावरचा शएर माझ्या दिलाचेच बोल बोलला–मला माफ कर–तुझ्याशिवाय खरी मोहबत मी कोणावरहि करणें शक्य नाहीं–जोंपर्यंत अस्मानांत चांद उगवत राहील... "

*  *  *  *

ताडदेवला सिनेमाचे कारखाने झाल्यापासून बॉम्बे सेन्ट्रलच्या आसपास कलावन्त आणि कलावन्तिणी यांचा सुळसुळाट झाला होता. त्यांच्या गर्दीतच चिकी-

वाला राहत असे. सेन्ट्रल स्टेशनच्या कोपऱ्यावरून सरळ भायखळ्याकडे जाणाऱ्या बेलॅसिस रोडच्या एका बोळांत चिकीवाल्याचें मकाण होतें. आपली गाडी बोळाच्या तोंडाशीं आणून, कोपऱ्यावरच्या बंगल्याला जें नळाचें कुंपण होतें, त्यांतल्या वरच्या नळावर तो थोडा टेकत असे. इथें हवा खाऊन अंधार पडल्यावर नाइला-जानें तो आपल्या खोराडांत शिरे. तो बसे त्या ठिकाणासमोर, बोळाच्या दुसऱ्या बाजूच्या खिडकींत, 'अलम मुंबईची महशूर नाचवाली जहेरा जालीम' खुर्ची टाकून बसत असे. तिचे लांब दाट काळेभोर केस मोकळे सोडलेले असत, अंगा-भोंवतीं अलगद गुंडाळलेल्या जपानी किमोनोंतून उघडे राहणारे तिचे गोंडस हात खिडकीच्या चौकटीवर टेकलेले असत. फातमा ही तिची खास मोलकरीण तिच्या केंसांचें संगोपन करीत असतां, नाचून दमणाऱ्या मालकिणीच्या नाजूक पायांना दुसरी एक लौंडी मालीस करीत असे.

खालीं समोरच्या कट्टयावर रोज संध्याकाळीं विश्रांतीसाठीं बसणाऱ्या चिकीवा-ल्याकडे हळूहळू जहेराजानचें लक्ष जाऊं लागलें. दोघी दासींकडून सेवा करून घेत असतां, पुरुषास पागल बनवून, आपल्या नादीं लावून, गुलाम बनवून, लोळवि-ण्याचा, तिचा जो कायमचा खेळ त्या खेळांत थोडा खंड पडत असे,—आणि तेवढा देखील जालिम जहेराला असह्य होत होता. या वायां जाणाऱ्या वेळांत समोर एक पुरुष दिसत होता. तो चिकीवाला खरा, पण बसल्या बसल्या बाण मारून घायल करायला तेवढीच एक शिकार!

पहिल्यानें पांचसहा दिवस तुच्छतेनें न पाहिल्यासारखें करीत पाहून पाहून एक दिवस ती त्याच्याकडे एक मिठास, गुलाबी, स्मितयुक्त कटाक्ष टाकून मंजूळ विषारी आवाजांत बोलली,

"चिकिवाले हजरत; मी किती खुबसूरत आहें हें तुम्हीं कधीं पाहिलं आहे का?"

चिकीवाल्यावर काडीइतका परिणाम झाला नाहीं. सदऱ्याच्या बाहीनें कपाळा-वरचा घाम पुशीत कर्कशपणें हांसून तो म्हणाला,

"माझ्या गरीबाच्या मागें कशाला लागतां? खुबसुरती पाहयला आपल्याला वेळ

नाहीं! तारीफ करणारे दुसरे कोणी पहा—हंऽऽऽऽऽ...एकदोन दिवसांत बरसात पडेलसें वाटतें."

चिकीवाल्याला चीत करणें म्हणजे तिला पिंजऱ्यातल्या पोपटाला गोळी घालण्याइतकें सोपें होतें; पण शिकारीसाठीं चंग बांधलेल्याला कसलेंहि सावज चालावें अशी तिची स्थिति इरेस पेटल्यामुळें झाली होती. एका बाजूच्या घनदाट केशकलापाचा झोत उचलून तिनें खिडकीबाहेर सोडला, आपला उघडा हात उचलून, मागें गेलेल्या किमोनोच्या बाहींतून, बाहेर आलेली आपली केतकीसारखी नितळ, मृदु, गोल, गोंडस भुजा तिनें पुढें केली. ती पहिल्यापेक्षांहि गोड पण भेदक आवाजांत म्हणाली,

" चिकीवाले, इतकी सुंदर तुमची कोणी दिलरुबा आहे का? माझ्या केंसांहून मोहक केंस कधीं दिसले आहेत का तुम्हांला? इतका सुबक हात तुमच्या गळ्यांभोंवतीं कधीं पडला आहे का?"

केंकाटल्यासारखें भेसूर हांसून चिकीवाल्यानें आपली गाडी जरा सरळ केली,

" जाने दो मश्करी यार!" तो उद्गारला, "हा नाझ-नखरा माझ्यापुढें करून तुम्ही काय मिळवणार? सबूर! एका औरतकडून पागल बनायला मी काय पैसेवाला आदमी आहें? तुमच्या सगळ्या शकली थेटरमध्यें ठीक आहेत—त्या माझ्यावर चालवून मी काय शादीसाठीं उल्लू बनणार आहे? बस्स हुवा, बहोत हुवा! आतां मझाक् नको, खरें सांगा, कीं लौकरच पाऊस येईल असें दिसतें आहे कीं नाहीं?"

मुद्दाम केविलवाण्या पण तीक्ष्ण आवाजाची शिकस्त करून, डोळ्यांतली सगळी शक्ति एकवटून नाचवाली म्हणाली,

" मग काय? तुमच्या नजरेला मी खुबसूरत दिसत नाहीं?"

" मला करायची काय खुबसुरती पाहून? रोज दोनचार रुपयांचा उठाव झाला, कधीं सिनेमा पाहिला, कधीं कधीं आरामशीर हमाम घेतला, ईदला नवे पोषाख केले—इतके मिळालें कीं खूष आहोंत आपण! मग जन्नतची परी जरी आली तरी नको आहे मला!"

जहेरा जालिमच्या कपाळाला एक नाजुक आंठी पडली. ती लाडिकपणें म्हणाली,

# चिकीवाल्याची प्रणयकथा

" चिकीवाले जनाब, तमाम पुरुष माझ्या रूपाची तारीफ करतात, तुम्ही पण करायला पाहिजे. "

कंटाळल्यासारखी मान हालवीत चिकीवाल्यानं एक विडी काढून पेटविली. आपल्या हातगाडीचे दांडे धरून तो बोलला,

" चला, जावें आतां घरीं. आज रात्रीं सिनेमाला जायचं आहे मला—अलेक्झांड्रामध्यें मोठी धमाधमीची फिलम आहे—एकहि औरत नाहीं त्यांत ! "

त्यानें आपली गाडी बोळांत ढकलली व आपल्या भिकार घरट्याकडे तो निघून गेला. स्त्रीस्वभावाची कल्पनाहि नसलेल्या त्या आनंदी प्राण्याला असें कळलें असतें कीं, आपलीच शिकार पकडायला नाचवाली जाळें पसरत आहे तर त्याचा विश्वासहि बसला नसता.

पण दिवसानुदिवस एका यःकश्चित् चिकीवाल्यासाठीं, उभ्या मुंबईंत प्रसिद्ध असलेली ती नर्तिका खिडकींत बसून राहू लागली ! एकदां त्याच्या खंबीर व्यवहारी वृत्तीशीं झगडण्याच्या भरांत तर तिनें एका लाखोपति शेठियाला बाहेरच्या दिवाणखान्यांत अर्धा तास खोळंबून बसायला लावलें. चिकीवाल्याचें कठोर हांसणें तिच्या अहंकाराला असह्य होऊं लागलें; तिचा दिमाख बिघडूं लागला. रोज संध्याकाळीं फेरी संपवून परत आल्यावर बोळाच्या तोंडाशीं हवा खायला तो बसे, व त्याच वेळीं केशरचना करवून घेण्यासाठीं समोरच्या खिडकींत ती बसायची. पण तिचे मदनबाण त्याच्या गद्यपणाच्या कवचावर पडून फुकट जायचे. हळू हळू ती जास्तच इरेस पेटली; तिच्या रूपगर्वित वृत्तीला अशा रीतीनें डिंवचल्यासारखें झाल्यामुळें, तिला चेव आला व परिणामीं ती अशा तीव्र उत्कंठेनें त्या चिकीवाल्याकडे पाहूं लागली कीं, तिचा दुसरा एकादा श्रीमान् भक्त त्याच्या जागीं असता तर धन्यच झाला असता ! जसजसा चिकीवाला अर्धवट हेटाळणीनें तिच्या लीलांकडे पाहायचा, तसतशी ती आपले एकाहून एक पाजळलेले बाण त्याच्यावर टाकायची.

अखेर एके दिवशीं संध्याकाळीं तो नेहमींप्रमाणें येऊन बोळाच्या कोंपऱ्यावर बसला तेव्हां खिडकीबाहेर वांकून ती केविलवाण्या आवाजांत म्हणाली,

" चिकीवाले, जरा इकडे या, " तो जवळ आल्यावर ती हलके म्हणाली, " माझ्या नजरेला नजर भिडवा. "

पेटवायला काढलेली विडी तशीच हातांत धरून तो तिच्याजवळ गेला; लाकूड कापणाऱ्या करवतीसारखें त्याचें हांसणें, थोडें हळू येऊं लागलें, विडी हातांतून गळून पडली, तोंड उघडें पडलें; शरीर थरारल्यासारखें झालें.

" बस्स, पुरे " तिनें एक हास्याची लकेर सोडली, " मला जायला पाहिजे, उशीर होतो आहे. "

दुसऱ्या दिवशीं तिन्हीसांजा ठरलेल्या जागीं गाडी टेकणारा मनुष्य कोण होता बरें ? त्याच्या डोक्यावर एक केंसाळ टोपी तिरपी ठेवली होती, भडक पट्टयांचा रेशमी शर्ट, लाल जाकीट, रंगीबेरंगी हातरुमाल, चुडीदार पैजामा, बकलचे पेटंट लेदर बूट–तोच तो चिकिवाला होता ! त्यानें दाढी केली होती, स्नान केलें होतें, केसांना तेल दिलें होतें आणि डोळ्यांत सुरमा घातला होता.

जेवणाऱ्या माणसाच्या बाजूला बसलेल्या पाळीव मांजरासारखा तो त्या खिडकी-कडे पाहत टपून बसला होता.

थोड्या वेळांत जह्‌रा जालिम खिडकीशीं आली. तिचे मोकळे सोडलेले केंस एक दासी विंचरीत होती, पायांना मालीस करण्यासाठीं दुसरी तयार होती. नाचवालीनें चिकीवाल्याकडे स्मितपूर्वक पाहिलें व हळूहळू तिचें स्मित मावळून कंटाळल्याची छटा तिच्या चेहऱ्यावर आली.

शिकार पदरांत पडली होती.

ती आपल्या लौंडीशीं गप्पा मारूं लगली !

"आजची हवा मोठी मजेदार होती," चमत्कारिक बनावट आवाजानें चिकी-वाला ओढून ताणून गप्पा मारूं लागला, "बरसातीचें कांहीं चिन्ह दिसत नाहीं. आतां, आज खूप मोठी फेरी केली मी."

नाचवालीनें आपले दोन सुकुमार हात खिडकीबाहेर काढले, ते जुळवून त्यांच्यावर आपली हनुवटी टेंकून ती हळूच म्हणाली,

"जनाब, अब बोलो, तुम्ही माझ्यावर मोहब्बत करतां कीं नाहीं ?"

आपली गाडी सोडून चिकीवाला त्या खिडकीच्या शक्य तितका जवळ आला, भावनेच्या उत्कटतेनें घोगऱ्या झालेल्या आवाजांत तो बोलला,

"बानू, हाजी इस्माइलच्या दुकानावर मीं आजपर्यंत जमविलेल्या तीनशें रुपयांची ठेव आहे. इतके दिवस तुझ्या खुबसूरतीची बरदाश्त मीं केली नाहीं–त्याची

भरपाई आतां करतों—त्या तीनशें रुपयांचा एक जूता तुझ्या पायांत घातलास तरी मीं धन्य होईन!"

हास्याच्या लकेरीवर लकेरी त्या खिडकींतून येऊं लागल्या. हांसून हांसून नाचवाली घायल झाली, तिच्या डोळ्यांना पाणी आलें, तिची दासीहि तोंडपुजेपणानं हांसूं लागली. चिकीवाला उघड्या तोंडानें त्यांच्याकडे पाहून गोरामोरा होऊं लागला.

इतक्यांत दुसऱ्या मोलकरणीनें एक चिठी आणून नाचवालीच्या हातांत दिली, तीं आंत चालली;

"हाय! ओ खुदा, गरीबको कुद्रती इनसाफ नहीं!" असें कुरकुरत फजीत झालेल्या चिकीवाल्यानें गाडी हळूहळू बोळांत ढकलली.

तो थोडा पुढें गेला नाहीं तोच त्याला खिडकीच्या आंतून किंकाळ्यावर किंकाळ्या ऐकूं आल्या. कोणी जमिनीवर आंग टाकल्याचा व लाकडी तक्तपोशीवर लाथा झाडल्याचा आवाज आला, खिडकीशीं धांवत येऊन त्यानें विचारलें,

"अरे हुवा क्या?"

केंस विंचरणाऱ्या दासीनें उत्तर दिलें,

"बहोत बुरी खबर मिळाली आहे! बाईसाहेब ज्यांच्यावर जिवापाड मोहबत करीत होत्या ते लखोपती शेठ–जाफरभाई अक्समवाला, बाईंना सोडून काश्मीरला निघून गेले–तुम्ही पुरुष सगळे सारखेच!"

## २३. एक हजार रुपये

—"एक हजार रुपये," कागदांची पुन्हां घडी घालीत नाकावरच्या चष्म्यावरून मंचरशांनीं होमीकडे एकदां पाहिलें; गंभीर आवाजानें त्यांनीं वाक्य पुरें केलें, "आणि या पाकिटांत एक हजार रुपये आहेत हे घ्या."

होमी हांसला व त्यानें तें पाकीट उचललें. तो म्हणाला, "हजार रुपये म्हणजे मोठी अडनेडी रक्कम आहे! दहा हजार असते तर दहा दिवस चैन करून समाधान तरी वाटलें असतें, शंभर असते तर कांहीं प्रश्नच पडला नसता, आहेत कीं नाहींत—"

"तुझ्या काकांचें मृत्युपत्र मीं वाचलेलें तूं ऐकलेंस–" मध्येंच रुक्ष आवाजांत सॉलिसिटर मंचरशा म्हणाले, "तूं जर तपशिलाकडे लक्ष दिलें असलेंस, तर तुझ्या लक्षांत राहील– या हजार रुपयांचा हिशेब ते संपल्याबरोबर तूं मला द्यावयाचा आहेस. आपल्या मरहूम काकांच्या मृत्युपत्रांतल्या इच्छेला तूं मान द्यावास असें मला वाटतें."

"त्याची काळजी नको तुम्हांला–वेळ पडली तर हा हिशेब लिहायला एक कारकून ठेवून ही अट पुरी करीन–मग खर्च हजाराच्या वर गेला तरी हरकत नाहीं!" चावटपणें डोळे मिचकावीत होमी तेथून निघून आपल्या झर्झिझ क्लबाकडे निघून गेला. क्लबांत त्यानें चाळिशीच्या सुमाराच्या पोक्त व शांत एदलजीला शोधून काढलें. त्याला एका खुर्चीवर बसवून होमी म्हणाला,

"तुम्हांला एक गंमत सांगतों एदलजी—"

"एटलूंज ? मग दुसऱ्या कोणाला सांग नी ? पांचट गोष्टी ऐकायला वेळ नाहीं मला—"

"नाहीं नाहीं-खरीच मजेदार गोष्ट आहे-मी आतांच आमच्या सॉलिसिटर्स-कडून आलों-माहीत असतील तुम्हांला-दाबू अँड धोंडी ? बुढ्या मंचरशा धोंडीनें आतांच काकांचें 'विल' वाचून दाखविलें- मला एक हजार रुपये ठेवले आहेत त्यांनीं—"

"पण तुझे काका-सर सोराबजी शिवरीवाला ना ? त्यांनीं तर पंधरा एक लाख रुपये ठेवले आहेत अशी बाजारांत बातमी आहे—"

"तीच तर सगळी गंमत ! त्यांनीं ठेवले आहेत, पण सगळे आपल्या जातीला बनवायला ! निम्मे एका संततिनियमनाच्या हॉस्पिटलसाठीं आणि निम्मे बाळंत-पणाच्या हॉस्पिटलला ! बारीक सारीक देणग्या आहेत कांहीं-आमच्या फ्रांसीस बट्लरला त्यांची आंगठी व शंभर रुपये, पिराजी माळ्याला एक शंभर रुपये आणि पुतण्याला एक हजार !"

"तुला खर्चायला तर खूप देत होते तुझे काका ?"

"भरपूर"

"मग असें कसें झालें ? दुसरा कोणी वारस ?"

"कोणी नाहीं-पिरोज-एका मित्राची पोरकी मुलगी पाळली होती ना त्यांनीं ? तिच्याहि तोंडावर एक शंभराचा तुकडा फेकला आहे ! मलाहि शंभरच कां ठेवले नाहींत कोण जाणे-शंभराची विल्हेवाट कशी तावडतोब लागते-चार दोस्तांना घेऊन 'ताज' ची एक खेप, कीं खपले शंभर ! अडचण पडते ती सगळी या हजार रुपयांची वाट लावायच्या वेळीं !"

"हजार रुपये" एदलजी स्वतःशीं पुटपुटला, "हजार रुपयांत संजानला एक प्लॉट घेतां येईल घर बांधण्यापुरता. कुटुंबाला घेऊन एक सीझन माथेरानला काढतां येईल; धर्मादायांत खुबीनें खर्च केले तर निदान वीस वर्तमानपत्रांत तरी नांव येईल; एका गरिबाच्या मुलाचा कॉलेजचा खर्च निघेल-अर्धा पारशीबाजार एक

दिवस उठवतां येईल. एका मजुराला उचलतां येणार नाहीं इतकें चंदन एक हजार रुपयांत येईल, दहा हजार कस्त्या येतील, विलायतेला जाऊन—हाय कमिशनरच्या खर्चानें परत येतां येईल. कावसजी जहांगीर हॉल तीन दिवस भाड्यानें घेतां येईल —व त्यांत मृत्युपत्रावर अवलंबून राहण्याचे तोटे म्हणून लेक्चर देतां येईल."

"हें पहा कावसजी, मला पुराण नको आहे, सल्ला पाहिजे."

"मग तुला रुचेल अशी सल्ला देतों. हजार रुपयांचा एक ब्रूच नाहीं तर साडी-पिन घे आणि त्या दादीबा भांडुपियाच्या पोरीमागें धांवतोस ना? तिला नजर कर."

"थँक्स, मला ठाऊकच होतें कीं कांहींतरी योग्य तें सांगशील, एका दमांत मला ते पैसे खर्च करायचे होते; म्हणजे हिशेबाची कटकट नको;"

एक टॅक्सी करून नेपियनसी रोडवर 'भांडुप हौस' कडे होमी गेला. दहा मिनिटांनीं गुल बाहेर आली.

"नेमका माझ्या गर्दीच्या वेळीं कसा आलास? मी ग्रीन्समधें चाललें आहें. शापुर शेववाल्याबरोबर—नवीन रुमानियन ऑर्केस्ट्रा ऐकायला—"

"गुल, हजारएक रुपयांपर्यंत तुझ्या आवडीचा ब्रूच कुठें दिसला असला तर सांग, ही वेळ आहे—"

"उंः! हजार रुपयांच्या ब्रूचला काय घेऊन बसला आहेस; परवां फेणीरा-मकडे अठ्ठावीसशेंची पाचूंची वेळ पाहिली—इतकी सुंदर होती! आज शापूरला पण दाखवणार आहें मी ती."

तिचा निरोप घेऊन होमी निघाला. टॅक्सींत बसल्यावर त्यानें टॅक्सीवाल्याला विचारलें,

"हजार रुपये मिळाले तर तूं काय करशील?"

"दुसऱ्या दोन गाड्या चालवीन शेठ—मीं पाहून ठेविल्या आहेत. सौदा निव-ळक आहे अगदीं—दोन पोरं तयार आहेत माझ्याजवळ—लैसन ताबडतोब काढून देईन, रोज बारा पंधरा रुपयांना मरण नाहीं—कां, प्रॉमिसरीवर देतां का मला?"

"छे, छे, उगीच विचारलं! बरं, आस्ते आस्ते फोर्टच्या बाजूला चल, मीं तासाप्रमाणें भाडं देईन."

## एक हजार रुपये

मोटर चर्चगेट स्टेशनजवळून फाउंटनकडे वळली. कोपऱ्यावर एक पांगळा हात पसरून बसला होता. त्याच्याजवळ जाऊन होमीनें हळूच विचारलें,

" कायरे तुला हजार रुपये दिले तर काय करशील तूं ? "

तो पांगळा रागावला,

" गरीब समजून चेष्टा करतां होय शेठ ? तुम्हांला काय वाटलं ? महिना पन्नास रुपयांची मनीआर्डर मी मुलखाकडे पाठवीत असतों ! "

होमी परतून टॅक्सींत चढला, त्यानें फर्मावलें, " मेडोज स्ट्रीटकडे–उदवाडा चेंबर्ससमोर घे."

घाईघाईनें ' दाबू अँड धोंडी सॉलिसिटर्स ' च्या ऑफिसांत शिरून होमी थेट मंचरशाकडे गेला.

" माफ करशो बावाजी," तो धांपा टाकीत म्हणाला, " एक थोडीशी चौकशी करायची आहे, काकांच्या विलमध्यें पिरोजला शंभर रुपयांखेरीज कांहीं ठेवलं आहे का त्यांनीं ? "

मंचरशानें नकारार्थी मान डोलविली.

" मेहेरबानी; साहेबजी " म्हणून होमी पुन्हां सटकला.

"भायखळा," त्यानें टॅक्सीवाल्याला सांगितलें.

राणीच्या बागेजवळील एका शांत गल्लींत मरहूम सर सोराबजी शिवरीवाला यांचा बंगला होता. हॉलमध्यें पिरोज पत्रें लिहीत बसली होती. आतुर दृष्टीनें तिच्या नाजुक सौंदर्याकडे पहात होमी तिच्याजवळ गेला.

" आतां इतक्यांत मी सॉलिसिटरकडे गेलों होतों," तो म्हणाला. पण तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. " मंचरशानें मला एक काम सांगितलें–काकांच्या विलला एक ताजा कलम सांपडला. त्यांत तुला हजार रुपये देण्याविषयीं लिहिलें आहे— मंचरशानें ते माझ्याजवळ दिले–याच बाजूनें जात होतों, घेऊन आलों येतां येतां –हे घे, मोजून म्हणजे बरें "

ती गोरीमोरी झाली 'आ—' इतकाच उच्चार तिनें केला.

होमी अर्धा एक मिनिट नुसता उभा राहिला; त्यानें एकदां शून्य दृष्टीनें खिडकी-

बाहेर पाहिलें व पुन्हां अत्यंत कळवळ्याच्या नजरेनें तिच्याकडे पहात तो हलक्या आवाजांत म्हणाला,

" पिरोज, "

तिनें त्याच्या नजरेला नजर भिडविली नाहीं. ती निश्चल उभी राहिली.

" पिरोज, माझें तुझ्यावर—प्रेम आहे, तुला कांहींच कल्पना नाहीं का ? "

" मला दिलगिरी वाटते. " तिनें उत्तर दिलें, व पैशांचें पाकिट उचललें.

" मला आशेला कांहीं जागा नाहीं का ? "

" मी दिलगीर आहें " ती पुन्हां म्हणाली.

छातीवरचा भार कमी झाल्यासारखें होमीला वाटलें.

" मला एक चिठी लिहायची आहे. " तो म्हणाला, तिनें त्याला लिहिण्याचें सामान दिलें व ती दूर गेली. त्यानें लिहिलें.

' खर्च—तपशील—

रु. १०००—जगांतील प्रियतम आणि सर्वोत्तम स्त्रीच्या सुखाप्रीत्यर्थ यथाशक्ति अर्पण—'

एका पाकिटांत हा कागद बंद करून पिरोजचा निरोप घेऊन होमी निघाला.

त्या एका दिवसांत तिसऱ्या खेपेला तो मंचरशापुढें आला.

" हजार रुपये खर्च झाले—हा त्यांचा हिशेब " म्हणून मघां दिलेल्या कागदाचें पाकीट त्यानें मंचरशाच्या टेबलावर टाकलें.

मंचरशा उठून गेले व पार्टिशनपलीकडचे भागीदार बेहरामजी यांना घेऊन आले. त्यांना बाजूच्या खुर्चीवर बसल्यावर मंचरशा गंभीरपणें म्हणाले,

" होर्मसजी शिवरीवाला, तुझ्या मरहूम काकांनीं विलला एक शेवटचें कलम करून तें आमच्याजवळ खासगी रीतीनें ठेवलें होतें. त्याचा आशय असा कीं, तुला दिलेल्या हजार रुपयांचा विनियोग सद्बुद्धीनें, निःस्वार्थीपणानें किंवा उदात्त हेतूनें तूं केलास तर आमच्याजवळ शिलकेंत विलमध्यें उल्लेख न केलेले वेगळे अडीच लाख रुपये आहेत ते तुझ्या स्वाधीन करायचे. उलटपक्षीं तूं ते हजार रुपये चैनींत

उडवलेस, मूर्खासारखे खर्चिलेस किंवा वांया घालवलेस तर आमच्याजवळचे ते अडीच लाख रुपये पिरोज, तुझ्या काकांची मानीव मुलगी, हिला द्यावयाचे."

" मी व बेहरामजी तुझे हजार रुपये योग्य खर्च झाले कीं नाहीं हें ठरविणारे पंच तुझ्या काकांच्या इच्छेनें नियुक्त आहोंत, तेव्हां हें पाकीट उघडून—"

" थांबा," होमीनें चटकन् तें पाकीट उचललें व तें फाडून त्याच्या बारीक बारीक चिंध्या करून खिशांत टाकल्या, " तुम्हांला त्रास देण्याची माझी इच्छा नाहीं. मी ते हजार रुपये वेगवेगळ्या घोड्यांवर लावून हरलों. त्याचा तपशील तुम्हांला कळायचाही नाहीं; अच्छा येतों मी ! साहेबजी !"

तो निघून गेला. दोघां सॉलिसिटर भागीदारांनीं एकमेकांकडे पाहून खेदानें माना हालवल्या.

## २४. कल्पनेबाहेर यश

वयाच्या तेराव्या वर्षी दगडूशेटच्या पुतण्याचा हात धरून पळून गेलेली विठाबाईची राही अदमुरें गांवचे लोक विसरूनहि गेले असतील—त्यांना कल्पनाहि नसेल कीं 'डाकोर पिक्चर्स' च्या एकामागून एक येणाऱ्या वैभवशाली बोलपटांत चमकणारी 'मिस रोहिणी' ही दगडूशेटच्या घरीं चारपांच वर्षांपूर्वी भांडीं घांसणारी मोलकरीण राहीच होती. तिच्यांत फरकहि तसाच पडला होता. मुंबईला आणून एक वर्षानें टेकचंदानें (दगडूशेटच्या रंगेल पुतण्यानें) कंटाळून तिला सोडून दिली खरी, पण त्यावेळीं त्याच्या मध्यस्थीनें ओळख झालेल्या लल्लूभाईंनीं तिला आपल्या मूकपटांत काम करायला बोलावून घेतलें होतें. मूकपट बोलके होईपर्यंत तिची राहणी व भाषा बरीच बदलली होती. ती थोडेंसें गाणें शिकली होती व हिंदुस्थानी बोलण्याचा सरावहि तिला बराच झाला होता. नंतर तिच्या पहिल्याच बोलपटाला चांगले पैसे मिळाल्यामुळें तिला सातआठशेंपर्यंत पगार झाला होता, मोटार, क्रबरोडला बंगला, घरीं एक दोन 'आग्र्या,' असा तिचा परिवारहि वाढला होता. आज सिनेमाच्या जगांत 'अस्सल काश्मिरी कुटुंबांतील कुलीन सुशिक्षित नटी' अशी तिची जाहिरातहि, तिचे नवे शेठ रंगलाल हे करूं लागले होते.

पण तिच्या पूर्वपीठिकेची थोडीबहुत कल्पना सर्वांना होती; रंगलाल शेठजींना तर तिचा इत्थंभूत इतिहास माहित झाला होता. संपत्ति, स्तुति व कीर्ति यांच्या रोषणाईत कधीं कधीं असंतोषाची छाया रोहिणीच्या चेहऱ्यावर कां दिसते याचा एकंदर अदमास करूनच शेठजींनीं आपल्या पुढल्या बोलपटाचा विषय 'खेड्यांतील

जीवन' हा ठरवला; आपल्या पाळीव पंडिताकडून त्यांनीं "खेडुतनो खेत याने किस्सा—इ किसान" हें कथानक लिहून घेतलें; नवे भरजरी पोषाख करविण्यास आरंभ केला; तीन नाचांसाठीं निमगोऱ्या नाचणारणींच्या ताफ्याशीं बोलणें सुरू केलें; एक डझन पिस्तुलें, दोन मोटारी व विलायती दारूच्या रिकाम्या बाटल्या या साहित्याची व्यवस्था केली.

पण आयत्या वेळीं मिस रोहिणीनें एक 'वांधा' काढला, बाकीच्या नटनटी आपल्या पसंतीनें ठरविण्याचा तिनें हट्ट घेतला; ती कांहीं केल्या ऐकेना; तिचा मोटर ड्रायव्हर, तिच्या समोरचा पानवाला, तिच्या विशेष आवडीचा सेटिंगवरचा मजूर 'मारत्या,' या सर्वांना काम देण्याची तयारी शेठजींनीं दाखविली, पण तिनें सांगितलें कीं, खेड्याला शोभतील अशींच माणसें, निदान असाच 'हीरो' मी माझ्या आवडीनें निवडणार. कुरळ्या केसांचा मास्टर डिच्चू, डोळ्यांत काजळ घालणारा मास्टर वेणीचंद्र, गाणारा मास्टर एरवशा भपू या सगळ्या 'हीरोंना' तिनें नापसंत ठरवलें: अस्सल खेडवळ हीरो पाहिजे हा तिचा आग्रह होता.

एके दिवशीं मास्टर विभाकर (ऊर्फ तुकाराम तोडगे) हा (हीरो) रंगलाल शेठकडे आला, व गांवढळ नायकाचें काम मागूं लागला. ते म्हणाले,

'रोहिणीकडे अर्जी कर, ते पार्ट तिची पसंदगीवर हाय. पर तुमी तिला चालणार नाय, मी चोक्कस सांगते. ते मांगते असली गामडिया जेवो हीरो पाहिजे, मुंबईमधी नाय मिळेल तर गमे तेथी लावायला बोलते. गामढासून आवेला पटेल जेवा माणस ते हवा सांगते—हीमत होसेल तो जा कोसीस कर, माज्या भलामणचा कायबी फायदा नाय.'

या बैठकींत रोहिणीची मिळेल तितकी माहिती तुकारामानें मिळवून घेतली. दोनतीन दिवसांत तो आदमुरें गांवाला गेला. तिथें तो आठ दिवस होता. अगदीं साध्याभोळ्या माणसाच्या वेषांत जाऊन, गांवांतल्या लोकांशीं दोस्ती करून त्यानें हळूहळू बरीच माहिती गोळा केली. राही पळून गेल्यापासूनच्या चारपांच वर्षांत गांवांत फरक असा कांहीं पडलाच नव्हता. राहीच्या आईची, तिच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांची सगळी बारकाईनें चौकशी करून त्यानें पुष्कळ गोष्टी आपल्या आठवणींत सांठवून ठेवल्या व आठ दिवसांचे शेवटीं तो मुकाट्यानें मुंबईस परतला.

× × ×

## चोरबाजारांतील चिजा

वर्लीच्या नव्या चौपाटीवर नियमितपणें हवा खायला जाणाऱ्या रोहिणीची मोटर एका ठराविक ठिकाणीं रोज उभी राहात असे; आजहि ती मोटार तेथेंच उभी होती. मागच्या बाजूला रंगलालशेठ व त्यांचे मॅनेजर रसिकलाल यांच्या मध्यें स्वतः रोहिणी, विराजमान झाली होती; पुढल्या बाजूस ड्रायव्हरशेजारीं कंपनीचा एक दुय्यम गायक, कायम लाचार स्मिताची मुद्रा मागें वळवून बसला होता. मोटरचा टप खालीं पाडलेला होता, व केशरी जॉर्जेटचें पांचवारी गोल पातळ, बिनबाह्याचा जंपर, उंच टाचांच्या सँडल्स, उपटलेल्या भुंवया, रंगलेले ओंठ व नखें ह्या थाटांत रोहिणी बाजूच्या फरसबंदीवरून येणाऱ्या जाणाऱ्याकडे कंटाळल्या दृष्टीनें पहात होती.

इतक्यांत 'खड खड खड खड' करीत एक अत्यंत जुनी फोर्ड गाडी समोर येऊन रांकेमध्यें उभी राहिली. गाडीच्या निर्विकार ड्रायव्हरकडे शेजारून एक इसम विस्फारित डोळ्यांनीं आजूबाजूला पाहत होता. आश्चर्यानें त्याची मुद्रा मूर्तिमंत उद्गारचिन्हासारखी दिसत होती. गाडी थांबल्यावर तो एकदम दचकून म्हणाला,

'आँ ! अन् आली वरळी ?'

त्याचा आवाज कठोर आणि पहाडी होता. तो उगीच खूप मोठ्यानें हांसला, अंगाला आळोखेपिळोखे देऊन गाडींतून उतरला, आणि उद्गारला,

'हथवी समिंदर ? अन् कांहो धोंडिबा, चोपाटीचाबी समिंदरच नव्हं का ? अगदीं थेट त्येच्या वाणी ह्योबी दिसतुया.'

'तोच हावी' निर्विकार ड्रायव्हरनें उत्तर दिलें.

'हात्त्याच्या !' म्हणून दुसरा पुन्हां खूप मोठ्यानें खदखदला.

रोहिणीची दृष्टि त्या माणसावर खिळून राहिली होती; त्यानें एक भडक पटका डोक्याला बांधून मागें शेमला सोडला होता, त्याच्या अंगांत हिरवा सनप्रूफचा लांबलचक हंटिंग कोट होता व खांद्यावर एक चौकटीचा मफलर उगाच टाकलेला होता. त्याच्या मुंडेछाट पैरणीच्या गुंड्या चांदीच्या सांखळीनें जोडलेल्या होत्या. पंचरंगी नेसलेल्या धोतरावर भगवी छटा होती. पायांत करकर वाजणाऱ्या भक्कम वहाणा होत्या. खेड्यावरून पहिल्यानेंच मुंबईला आलेल्या व त्यासाठीं मुद्दाम नटलेल्या माणसाचें तें हुबेहूब चित्र होतें.

त्या भोळ्या इसमानें कुतूहलानें आजूबाजूला पाहिलें. रोहिणीची चकचकीत मोटर पाहून त्याचे डोळे आणखी मोठे झाले. मोटारीवरून आंतल्या माणसाकडे त्याची नजर गेली. रोहिणीकडे सुमारें अर्धे मिनीट त्यानें टक लावून पाहिलं. तो चार पावलें पुढें, अगदीं मोटारीच्या दाराजवळ आला आणि उद्गारला,

'कोन, राहीबाई—इटाबायची राही ?'

अस्तन्या वळीत ड्रायव्हरशेजारच्या उठू पाहणाऱ्या दुय्यम नायकाला रोहिणीनें खुणेनें खालीं बसवलं. शक्यतितक्या नैसर्गिक व प्रेमळ आवाजांत ती म्हणाली,

'व्हय राहीच मी, पण आपन कोन, वळखत नाहीं मला.'

'वा जी वा !—पर न्हाईच वळखायचा मी, मोठा झालोय नव्हका—शिरपती शेलार मी—त्या महादु पाटलाच्या शिवारालगत माझ्या बाबाचं घर—ग्यानबा शेलाराला उभं आदमुरं वळखतं, अन् तूं जनुं येवढी होतीस तवा आमच्याच बांधावून चाफ्याचीं फुलं न्यायला यायचीस नव्हं-तूं अन् तुझ्यासंग ती नाम्या पवाराची शेवंती—'

'लगीनबी झालं असल तिचं येव्हांना—'

'लगीन ? लगीनबी झालं, दोन प्वारंबी झाली, नवराबी गमावला पटकीनं-आतां फिरून गणबा सावताशी म्होतुर लावलायान्'

'गांवातली माणसं—म्हतारी झाली असत्याल जनूं ?'

'त्ये काय सांगायचं ? तरणीताठीं म्हतारी व्हायचीं, लहानी मोठी व्हायची—बहिऱ्या शिंद्या, तो त्या वेशीमागच्या लिंबाच्या झाडाखालचा ? त्याची घरधनीण बाळातीण हाय—दहावी खेप ! महादु पाटलाचा मंगळ्या बैल दगावला. सराफाच्या मळ्यांत नवी मोट बसवलिया. येसू खेशा पोलिसांत ग्येला—यम्या महाराचं समदं दांत बी पडून गेलं ! त्यो नारायणराव बामन ? त्याची गाय पठाणानं बांधून नेली, आन् त्या रंगी गौळणीच्या म्हशीला पांडरी पारडी झालीया—'

रोहिणी मोटारींत उभी राहिली होती; ती शेटजींना म्हणाली, 'थांबा हं पंधरा मिनिटं-माझ्या गांवचा आलाय—' ती मोटरींतून उतरून 'शिरप्या शेलारा' ला म्हणाली,

'चला आपन तथं बसूं, सांगा समदी खबर !'

'चला,' म्हणून तिच्याबरोबर जातांना वळून त्या इसमानें शेठ लोकांकडे डोळे मिचकावले.

फरसबंदीच्या कट्टयावर बसून आठ दिवसांत घडलेली आदमुरें गांवाची सगळी हकीकत तुक्यानें तिला सांगितली. अखेर त्यानें आपलें हुकमी पान काढलें,

'चारच दिवस झालं, इठाबाईला भेटल्याला, भागलीया बिचारी म्हातारी फार'

'माझी याद होत असल कंदी—'

'पानी काढती डोळ्याला! म्हंती सोन्यासारखी पोर-अजूनबी आली तरी घरांत घेईन. तुजी साडी धुऊनशान घडी घालून उशाला घेते, तुझा न्याहारीचा वाडगा ठेवलान् संभाळून-'

डबडबलेल्या डोळ्यांनीं रोहिणीनें वर पाहिलें.

'—अन् झोपडीबाहार मेंदी मोकाट वाढलीया जनुं! ह्यो एक तुरा तोडुनशान् आनलाय् मीं—

तिनें एकदम मान फिरवली.

अंधार पडूं लागला होता. दहा मिनिटें निश्चल बसून अखेर रोहिणी उठली, ती हलक्या आवाजांत म्हणाली,

'चला माझ्या संग, माझं घर पाहून ठेवा, अन् उद्यां सकाळीं या पुन्हां'

दुसऱ्या दिवशीं एका चकचकीत दोनमाणशी मोटरींतून क्रबरोडवरील एका बंगल्यापुढें एक अप-टु-डेट पोषाखाचा, तिरपी हॅट ठेवलेला तरुण उतरला. शीळ वाजवीत तो बंगल्याच्या पायऱ्या चढला. एक आय्या पुढं आली.

'मालकन् है?' त्यानें विचारलें

'नही' ती म्हणाली

'कहां गयी?'

'अरे वो तो मुलुख चली गयी-कल रातको गई-उसको माकी बहोत याद आयी-उसने फिल्मका धंदा भी छोड दिया कहेती थी! अब क्या करें—अब हम लोगोंको दूसरी नौकरी ढूंडना पडेगा—ये सिनेमावालोंका बिलकुल भरोसा नहीं......

## ‘शुद्ध परदेशी चित्रें:’—

फ्रेममेकरच्या दुकानांत, किंवा निव्वळ चित्रें विकणाऱ्या व्यापाऱ्यांकडेही भव्य विलायती देखाव्यांच्या गांवठी आवृत्ति पाहण्यास सांपडतात. विलायती विषयांचें खुबीदार देशी-करण फक्त रविवर्मा यांनींच बेमालूम केलें होतें [ उदाहरणार्थ, फ्रेंच चित्र Rendezvous=यतिवेषधारी अर्जुन सुभद्रा ]. त्या मानानें अलीकडचे नक्कलचितारू आपली चोरी झांकण्याचा थोडादेखील प्रयत्न करीत नाहींत. शेबाची राणी सॉलोमनला भेटायला आल्याचें दृश्य थोडा फरक करून (ईजिप्शन पार्श्वभूमि कायमच ठेवून !) ‘कृष्ण-सुदामा’ म्हणून छापण्यांत येतें. अठराव्या शतकांतल्या सतराव्या लुईच्या फ्रेंच दरबारचे रंगेल देखावे वेष पालटून ‘कृष्ण-गोपीं’च्या पावित्र्याप्रत पोहोंचतात. ‘सॅमसन-डेलिला’ हें (प्रतिभेच्या कव्हरावर येऊन गेलेलें) चित्र तर एका कल्पक कारागिरानें ‘नरसिंहावतारां’तच वटवलें आहे ! पुष्कळदां या चित्रांचा व्रात्यस्तोमविधी थेट जर्मनीहूनच होऊन येतो.

आणि हीं चित्रें घेणारे आश्रयदातेही त्याच लायकीचे असतात. फ्रेमला भपका आणील अशी जंगी तसबीर चांगल्या भावानें खरीदणारा शेठिया स्कूल ऑफ आर्टच्या प्रदर्शनांतलें वीस रुपयांना मिळूं शकणारें एकादें अस्सल रम्य निसर्गचित्र डोळे उघडून पाहणारही नाहीं. कारण विधात्यानें ती बाजू त्याला दिलेलीच नसते.

हेंच परवाङ्मयांतल्या आडगिऱ्हाइकी वाङ्मयाला लागू आहे. मागणी तसा पुरवठा या तत्त्वानें रेशमी वाणांचे व्यापारी जर ‘इमिटेशन’ आणि ‘मर्सेराइज्ड’ विकूं लागले, तर ते गिऱ्हाइकाच्या सोइसाठींच तसें करतात असें म्हटलें पाहिजे. ग्राहकाला ऊर्फ आश्रयदात्याला जर अस्सलापेक्षां स्वस्त व सवंग नकली माल—साहित्याच्या बाजारांतला—पसंत पडूं लागला, त्याला जर चोरून भ्रष्ट केलेलीं भडक चित्रें, आडगिऱ्हाइकी विचार व अलगद उचलून हास्यास्पद रीतीनें मांडलेलीं यांत्रिक घडणीचीं तत्त्वें आवडूं लागलीं, तर हा सगळा माल पुरवणें नियतकालिक साहित्याच्या कारखान्याला भाग आहे.

मात्र सदसद्विवेकबुद्धीच्या समाधानासाठीं एवढेंच करायला हरकत नाहीं कीं कच्चा माल परदेशी म्हणून कबूल करून प्रांजलपणें तो देशी स्वरूपांत मांडायचा. तदनुरूप येथें इतकाच इशारा द्यायचा, कीं यापुढें शुद्ध करून टांगलेलीं चित्रें मूळचीं फ्रेंच आहेत.

## २५. शास्त्रीय दृष्टि

मॅट्रिक नापास झाल्यावरसुद्धां वशिल्यानें त्याला पन्नास रुपयांची नोकरी लागली होती. ( गेले ते दिवस ! ) एका जुनाट बिल्डिंगमध्यें मागच्या बाजूची एक काळोखी खोली त्याला बारा रुपये भाड्यांत मिळाली होती. बाहेर तो मोठ्या भपक्यांत रहायचा—कडक कॉलर, झिरझिरीत धोतरें आणि पंपशू, थोडा पेटीही वाजवायचा, गांवांत हिंडायचा, कोणाची ओळख करायची संधि सोडायचा नाहीं कधीं.

त्याच्या बिल्डिंगमध्यें बाकीचीं बिऱ्हाडें अगदीं गरीब आणि निरुपद्रवी होतीं, घरवालीला टरकून असत बिचारीं, पण हा मात्र त्या चाळींत वाघ होता—कारण तो भाडें अगदीं पहिल्या तारखेला चुकतें करायचा. इतर बिऱ्हाडकरूंपुढें कालिकामूर्ति असलेली घरवाली याच्यापुढें नमून होती; कारण हा तिला दाद देत नसे. दोघें भांडायचीं पण एक प्रकारची विरोधी मैत्री या दोघांत होती. कधीं कधीं घरवाली आजीबाईचा आव आणून त्याला उपदेश करायची—हा नुसता हांसून तिला चिडवायचा.

तो बरेच दिवस आपल्या ओढाळ मनाला बांधायला एखादा खुंट शोधीत होता. अखेर महालक्ष्मी बॅटरीवर फिरायला जातां जातां एक दिवस एका तरुण मुलीची आणि त्याची ओळख झाली. ( त्यानें कोणत्या तंत्राचा अवलंब केला हें सांगण्याची ही वेळ नव्हे ! )

ओळखीचें रूपांतर लौकरच निकट स्नेहांत झालें. आतां त्यांना जगाच्या दृष्टी-आड एकमेकांचा सहवास अनुभवण्याची आवश्यकता भासूं लागली. एकदोनदां

त्यानें तिला आपल्या खोलीवर चहाला आणलें. अखेर एके दिवशीं जिवाचा हिय्या करून त्यानें दिवेलागणीनंतर शेजाऱ्यापाजाऱ्यांना चुकवून तिला खोलींत घुसवलें.

प्रेमी जनांच्या कूजनांत दहा केव्हां वाजले तें कळलें नाहीं. तीं दोघें हळूहळू बोलत होतीं—कारण घरवाली मोठी कडक, जहांबाज बाई होती; अशी कांहीं गडबड झाल्याचें कळल्यास बिल्डिंगमधून आपली हकालपट्टी होईल हें तो पुरतें ओळखून होता.

घरवाली अगदीं वरच्या माळ्यावर रहात होती. दहानंतर एकदां बिल्डिंगमधून फेरी मारून मोठ्या फाटकाला बंदोबस्तानें कडीकुलूप लावून ती झोंपायला परत जायची.

प्रणयीयुग्माच्या गप्पा अगदीं रंगांत आल्या होत्या, इतक्यांत दारावर थाप पडली. तरुणी अगदीं घाबरून गेली.

'कोण आहे ?' त्यानें उसनें अवसान आणून दरडावलें.

'मी आहें मालकीण, दार उघडा पाहूं.' त्यानें कांहीं वेळ अळंटळं केली—

'उघडा लौकर ! ' ती कडाडली, दिवा मालवून त्यानें दार उघडलें. मालकिणीनें आंत येऊन दार आपल्यामागें लोटून घेतलें. दिव्याचें बटन दाबलें.

भयभीत हरिणीसारखी थरथर कांपत ती तरुणी एका कोपऱ्यांत उभी होती, तिला केंस बांधायचें किंवा पदराचेंही भान नव्हतें. हलक्या पण कठोर आवाजांत मालकीण उद्गारली.

'हे धंदे करतां काय इथं ?'

'माझ्या नात्यांतली आहे ती, चहा प्यायला आली आहे—'

मालकीण भेसूरपणें हांसली,

'कुणाला सांगतां या गप्पा ? तमाशा करायचा नसला तर मुकाट्यानें हिला घराबाहेर काढून पोहोंचती करा.'

ती मुलगी रडायला लागली होती. तिनें कसे बसे आपले कपडे नीट केले व ती खोलीबाहेर पळाली.

'थांब थांब जाऊं नको ' म्हणेपर्यंत ती निघूनही गेली. काळोखी जिन्याच्या तोंडाशीं तो हताशपणें उभा राहिला.

'जाईल सरळ, दार उघडंच आहे पुढचं–' मालकीण विजयी आवाजानें म्हणाली.

तो निमूटपणें परत येऊन खालीं मान घालून आपल्या बिछान्यावर बसला. हकालपट्टीचें फर्मान सुटायची वाट पहात होता तो.

'तुम्हांला चार गोष्टी सांगायच्या आहेत मला,' खुर्ची ओढून घेऊन ती खालीं बसली.

'माझ्या बिल्डिंगचं नांव खराब करायचं आहे का तुम्हांला? इथं सगळीं गिरस्त माणसं राहतात, तुम्ही जर अशा गोष्टी करायला लागलांत.......' इ-इ.

उपदेश, बोधामृत, हिताच्या गोष्टी, धाकदपटशा, बजावण्या—काय येईल तें त्या करड्या आवाजांत ऐकायला त्यानें आपलं मन घट्ट केलं. दोन हातांत डोकें धरून तो बसला होता.

हळूहळू त्याला वाटलं कीं बाईच्या आवाजांतला करडेपणा जाऊन भाषाही सौम्य झाली आहे—

'—मग हें चांगलं का बरं? कोणाला कळलं तर ते काय म्हणतील? केवढी छाकटी होईल? तुम्ही एवढे सुज्ञ, चांगले, हे—' इ. इ.

त्यानें चोरून वर पाहिलं. घरवालीच्या नजरेंत एक वेगळीच चमक त्याला दिसली. चाळिसाच्या उमरीच्या मानानें ती चांगली सुदृढ आणि रेखीव होती. तिचे केंस थोडे अस्ताव्यस्त झाले होते, तिनें पोषाख काळजीपूर्वक केला नव्हता...

त्यानें जळजळीत डोळ्यांनीं रोखून तिच्याकडे पाहिलं. तिची बडबड एका-एकीं बंद पडली; इष्टापत्तीची धास्ती तिच्या चेहऱ्यावर आली......

त्याला आपली खोली कित्येक वर्षें सोडावी लागली नाहीं...फ्रॉइडचें नांवही माहीत नसतां त्याला इतकी शास्त्रीय दृष्टि आली होती.

## .२६.

## कौमुदी

तीस सालच्या सत्याग्रहांत 'स्वातंत्र्य-वीरां'चें जें सवंग पीक निघालें त्यांतलेच एक खुंट म्हणून बाबा शिल्लक राहिले होते. त्यावेळीं चळवळींत पडलेल्या रिकामटेकड्या व संधिसाधू इसमांत हा प्रामाणिक व निष्ठावंत मनुष्य सांपडला होता; त्या चळवळीची जी प्रतिक्रिया झाली त्यांत लोकांकडून इतर देशभक्तांबरोबर बाबांचीही टवाळी पुष्कळ झाली होती. पण कालांतरानें त्यांचे खरे गुण लोकांच्या लक्षांत आले होते व बाबांना योग्य तो मान मिळूं लागला होता.

तेहतिशीच्या उमरीला त्या राजकीय लढ्यांत पडण्याचे वेळीं बाबा ब्रह्मचारी होते व नंतरही ब्रह्मचारीच राहिले होते. त्यांचें ब्रह्मचर्य चेष्टेखोरांना गप्प बसविण्याइतकें कडक होतें; त्याबद्दल कोणाला संशयही येणें शक्य नव्हतें, कारण तें टिकविण्यासाठीं त्यांची होत असलेली मानसिक कुचंबणा त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत असे ! आतां अडतिसाव्या वर्षाच्या सुमाराला, मनाला जिंकल्याचा भयानक कठोरपणा त्यांच्या चेहऱ्यावर आला होता. मोहावर मात करण्यास त्यांना जबर मोल द्यावें लागलें होतें. वैय्यक्तिक वागणुकींत सावधगिरी ठेवून त्यांच्या ठायीं एक रुक्ष अतिमानवता आली होती. निर्दय तत्त्वनिष्ठा व तीव्र ध्येयवाद यांनीं त्यांच्या शरीराप्रमाणेंच त्यांच्या मनाचीही आंवळकाठी करून टाकली होती.

जीवनांत जितकें कांहीं सुंदर, कोमल, मधुर असेल तिकडे कसोशीनें डोळेझांक करण्याची कडक शिस्त बाबांनीं स्वतःला लावून घेतली होती. सत्याग्रहांतला आग्रह आणि हठयोगांतला हठवाद तेवढा त्यांचे अंगीं पुरा बाणला होता. देश, देव

आणि सेवा हा त्रिविध कार्यक्रम त्यांनीं स्वतःसाठीं आंखला होता. सूत कांतून आणि गरिबांच्या मुलांना शिकवून ते आपल्या परीनें आपलें व्रत उत्तम प्रकारें पाळीत होते.

बाबा आपल्या एका वयस्क विधवा मामेबहिणीच्या वाड्यांत थोडीशी जागा घेऊन राहिले होते. गंगूताईंना बाबांसाठीं यत्किंचितही तोशीस पडत नसे. एका पुरुषमाणसाची सोबत होती इतकेंच. बाबा कच्चीं धान्यें भिजत ठेवून खाणारे, स्वतःचे कपडे घरीं धुणारे व झाडलोट दिवाबत्ती हातानें करणारे होते. गंगूताईची छबी म्हणून पंधरासोळा वर्षांची मुलगी होती. आईची लाडकी, निर्बुद्ध व आनंदी अशी ती पोर बाबांच्या घरांतून हवी तशी हिंडत असे. ते भावनाहीन सौम्यपणानें तिच्याशीं वागायचे, कधीं तिच्या कन्याशाळेच्या अभ्यासाला मदत करायचे, कधीं देश, गरिबी, सेवा वगैरे विषयांवर तिला गंभीर व्याख्यानें द्यायचे. पण ती एक उथळ बुद्धीची लडिवाळ पोर होती. त्यांच्याशीं देखील ती थिल्लरपणें वागायची. ब्लाऊज, 'रिबिन,' पिना अशा गोष्टी बोलायची, त्यांना खेटून बसायची, कधीं त्यांच्या मांडीवर डोकें ठेवून निजायची—अशा वेळीं बाबा आंतल्याआंत खूप चिडायचे.

बाबांना स्नेही असा कोणी नव्हता. नाहीं म्हणायला एक मध्यमवयीन, गिड्डी, काळी, निब्रट, कुरूप, जाड चष्मेवाली देशसेविका कधीं कधीं त्यांच्याकडे येऊन सूत कांतीत बसायची. अशा वेळीं बहिष्कार, निरोधन, आश्रम, हरिजनोद्धार वगैरे विषयांवर गप्पा व्हायच्या. बहुतेक बोलणें वारूबाईच करायच्या, बाबांचा नुसता हुंकार यायचा.

एके दिवशीं अशाच एका बैठकीला, वारूबाई थोड्या हलक्या आवाजांत म्हणाल्या,

'बाबा, छबीवर तुमचं लक्ष नाहीं वाटतं ?'

'काय संबंध !'

'पुरुष माणूस म्हणून जरा देखरेख हवी—'

'कां ?'

'या अलीकडच्या पोरी अल्लड असतात—'

'मग ?'

‘ तिची आई फार लाड करते—’

‘ करीना बापडी—’

‘ मुलगी फसेल एकादे वेळीं—’

‘ काय, म्हणतां काय ? ’

‘ तिची शाळा केव्हां सुटते आणि ती घरीं केव्हां येते, हें माहीत आहे का तुम्हांला ? ’

‘ नाहीं. ’

‘ पुन्हां ती कोणत्याशा क्लासला जाते—’

‘ उगीच अनमानधपक्क्यानं—’

‘ मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलं आहे–

‘ काय ? अहो आतां असंच चालायचं, मुलांमुलींच्या ओळखी या व्हायच्याच–’

‘ आतां स्पष्ट सांगितल्याखेरीज तुमची खात्री पटायची नाहीं. गंगूताईची छबी नुसती दिवसाढवळ्या भटकत नाहीं, तिन्हीसांजा होऊन गेल्या तरी घरीं परत येत नाहीं; आईला वाटत असेल कीं क्लासाला उशीर होतो, पण ती अन् तो एक मास्तर नदीकाठीं एका बाजूला जातात. मीं स्वतः पाहिलं आहे–त्या काटदऱ्याच्या खंडोबा पलीकडे—’

एरवीं बाबा इतरांची नीति सुधारण्याची जबाबदारी स्वतःवर घेत नसत, पण आतां भाचीचीच भानगड निघाल्यावर त्यांनीं मनावर घेण्याचें ठरविलें. वारूबाईच्या साळसूदपणाची नकळत आलेली चीड, इच्छा नसतांना सहवासामुळें छबीबद्दल वाटणारा त्रासदायक आपलेपणा व अनपेक्षितपणें ही हालचाल करावी लागण्याचा राग, या कारणांनीं बाबांचा सात्विक संताप संध्याकाळपर्यंत बराच चढला. रास्त प्रतिकार देखील न करण्याच्या व्रतामुळें इतके दिवस अडगळींत धूळ खात पडलेला आपला सोटा त्यांनीं बाहेर काढला. खादीच्या धोतराचा काचा मारला, व छबी अजून घरीं आली नाहीं, अशी खात्री करून घेऊन ते दिवेलागणीच्या थोडे आधींच निघून काटदऱ्याच्या खंडोबाकडे नदीच्या कांठाकांठानें जाऊं लागले.

ती पौर्णिमेची रात्र होती. फिरायला जाणारे लोक रेंगाळतच परत येत होते. चांदण्यांच्या अंधुक शान्त प्रकाशांत सृष्टीला एक सौम्य शोभा आलेली होती.

विचारी मनाला अस्वस्थ करणारीं दारिद्र्यासारखीं दृश्यें शान्तीच्या त्या मंद तेजांत संतुष्ट भासत होतीं. तीव्र प्रकाश किंवा घनघोर छाया अशा आत्यंतिक रूपांनींच परमेश्वराला मोजणारे बाबा या त्याच्या सौम्य स्वरूपानें बावरून गेले. कठोर व्रताचें दैवत कठोरच असावें ही त्यांची अंधुक अपेक्षा या रमणीय निसर्गसौंदर्यानें फोल ठरली. वस्तुमात्रांत अशी ढिलाई आल्यावर आपल्या कडवेपणांतच तर प्रमाद नाहीं, अशी दुष्ट शंका त्याना येऊं लागली. त्या शीतल आणि अस्फुट चन्द्रप्रकाशानें चराचर सृष्टीला एक कल्पनातीत मार्दव आलें होतें. दूरवरच्या टेकड्या, अलीकडच्या वृक्षराजि, त्यांच्यामधून रूपेरी चमक मारणारा नदीचा नागमोडी प्रवाह या सर्व गोष्टी आज निराळ्याच जगांतल्या दिसत होत्या. हवेंत देखील अशी कांहीं वेगळीच माधुरी होती, कीं श्वासोच्छ्वासानें शरीरांत नवीन स्वर्गीय चेतना निर्माण होत होती...

बाबा ज्या हेतूनें–पापी गुन्हेगारांना पकडण्याच्या हेतूनें–जात होते, तो हेतु ते क्षणभर विसरून गेले. एका अजिबात नवीन रम्य अनुभवांत ते इतके गुंगले होते कीं, नदीच्या कडेला एका उंचवट्यावर दोन अस्पष्ट आकृति शेजारींशेजारीं पाहून पहिल्यानें त्यांना कांहींच वाटलें नाहीं; मग एकाएकीं चपापून ते जागच्या जागीं थबकले. निर्विकारपणें त्यांनीं तें दृश्य पाहिलें.

त्या पुरुषाचा हात तरुणीच्या भोंवतालीं होता. तिनें त्याच्या खांद्यावर डोकें टेकलें होतें. कांहींतरी कुजबूज होऊन तिनें तोंड वर करून आपल्या वल्लभाकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत दोन तारका चमकत होत्या. तरुणानें तिला जवळ ओढून भाविकपणें तिचें चुंबन घेतलें. त्या एकंदर पार्श्वभूमीचें साफल्य या दृश्यानें झालें, असें एक प्रकारचें समाधान बाबांच्या मनाला वाटलें. ते परत फिरले. पापाचे साक्षीदार झाल्याची लज्जा किंवा चीड आपल्याला वाटली नाहीं हें त्यांचें त्यांनाच आश्चर्य झालें; उलट एकाद्या पवित्र मंदिरांत आपण चोरासारखे घुसलों अशी त्याची भावना झाली.

शान्त मनानें परत जात असतां आपला सोटा त्यांनीं दूर एका झुडुपांत फेंकून दिला.

## २७. संगमावरचा पुजारी.

इसवी सन १८१७ चा सप्टेंबर महिना चालू होता. जूनमध्यें रावबाजींनीं वसईच्या तहावर जुलुमाची सही दिली होती. पण लढाईचीं कारस्थानें सर्व बाजूंनीं शिजत होतीं. पेशव्यांना पुण्याहून हांकून देऊन कुंपणी सरकार शांततेचें राज्य केव्हां स्थापणार याची मराठेशाहीचे हितचिंतक वाट पाहात होते.

सप्टेंबर महिन्याच्या सुरवातीलाच रेसिडेंटसाहेब आपल्या लवाजम्यासह तांतडीचें खलबत करण्यासाठीं मुंबईस रवाना झाले होते. रावबाजी एकदम काय करतील याचा नेम नसल्यामुळें संगमावरच्या रेसिडेन्सीचे सर्वाधिकार मेजर स्मिथला देण्यांत आले होते. त्याचे हाताखालीं कॅप्टन ब्राउन, लेफ्टनंट जोन्स आणि एन्साइन कार्सन हे अम्मलदार, एक गोऱ्या सोजिरांची तुकडी व नेटिव्ह शिपायांची एक कंपनी होती.

त्या दिवशीं मुसळधार पाऊस लागल्यामुळें अम्मलदारांना घोडदौड किंवा कसलेच मैदानी खेळ खेळण्याची सोय नव्हती. दुपारीं दोन वाजल्यापासून कंटाळून बंगल्यांतल्या बंगल्यांत ते नुसत्या येरझाऱ्या घालीत होते. बाकीचे तीन अम्मलदार शुद्धीवर असले म्हणजे थोडे तरी ठीक असत, पण एन्साइन कार्सनची करमणूक नेटिव नोकरांना बुटाच्या लाथा मारण्यानें चालत होती. चौघेही दारूचा एक नवीन आलेला खोका फोडून बाटल्यामागून बाटल्या खलास करीत होते.

सगळ्या नोकरांचा छळ झाल्यावर कार्सनलादेखील कंटाळा आला.

## चोरबाजारांतील चिजा

'संध्याकाळला कांहीं मैफल पाहिजे आज,' तो जोन्सला म्हणाला. जोन्सनें कॅप्टनसाहेबांना सुचविलें, कॅप्टनसाहेब मेजरच्या कानाशीं कुजबुजले व ताबडतोब हर्षनिर्भर मुद्रेनें त्यांनीं नेटिव नाईक अस्गरखांला बोलावणें पाठविलें.

थोड्याच वेळांत अस्गरखां एक धमणी घेऊन दगडी पुलावरून पुण्याकडे रवाना झाला. त्याची वाट पाहात असतां, कार्सननें कांहीं वेळ संगमाच्या टोंकावर असलेल्या एका लहानशा शंकराच्या देवळावर बंदुकीचा नेम मारण्याची हातचलाखी करून पाहिली. सहाव्या गोळीला त्या देवळाचा कळस त्यानें उडविलेला पाहून त्याच्या सवंगड्यांनीं त्याला शाबासकी दिली.

त्या देवळाच्या पुजाऱ्यावर कार्सनचा मोठा राग होता, तिथली पिंडी काढून त्या देवळाचें चर्च करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा रेसिडेंटनें कडक शब्दांनीं जागच्याजागीं थंड करून टाकली होती. तेव्हां निदान दर रविवारीं पुजाऱ्यानें देवळांतली घंटा सकाळभर वाजवावी असा कार्सनचा आग्रह होता—पण तोही रेसिडेंटसाहेबांनीं धुडकावून लावला होता. जरूरीपेक्षां जास्त जुलमीपणानें वागायचें नाहीं असा रेसिडेंटचा नियम होता. धार्मिक बाबतींत तर अगदीं जपून वागण्यास त्यांनीं सर्व अम्मलदारांना फर्मावलें होतें, व पुजाऱ्याला रोज सकाळ संध्याकाळीं पूजेच्या वेळीं घंटा हवी तशी वाजविण्याची मोकळीक होती. रविवारीं घंटा अजिबात वाजत नसे. पण आज रेसिडेंट मुंबईला होते व म्हणूनच त्या देवळाचा कळस बंदुकीच्या गोळ्या मारून कार्सननें बेदरकारपणें उडवून दिला होता.

नाईक अस्गरखां धमणी परत घेऊन आठाच्या सुमाराला आला. त्यानें बावन खाणींतल्या धीटांतल्या धीट चार नाइकिणी आणल्या होत्या. तिघी परदेशणी होत्या. एक मात्र पवळी म्हणून महारीण होती. मेजवानीच्या थाटांत टेबल मांडलेलें होतें. मोठ्या बहुमानानें अम्मलदार लोक चौघीजणींना एकापलीकडे एक घेऊन जेवायला बसले. त्या बायांशीं हळूहळू मोडक्या उर्दूत त्यांनीं चेष्टामस्करी सुरू केली. त्या पहिल्यापहिल्यानें लाजत होत्या. पण सुरवातीला भीतभीत चाखलेली गोड पोर्टवाइन जसजशी जास्त खपायला लागली तसतशा त्यांच्या जिभा सैल सुटूं लागल्या. अम्मलदारांच्या विनोदाला सवाई ग्राम्य जबाब मिळूं लागले.

पाळीव खानसामे यंत्रासारखे निर्विकारपणें वाढीत होते. दारु जास्तजास्तच खपत होती. हळूहळू चौघी नायकिणी चौघां अम्मलदारांच्या मांडीवर बसून खिदळूं लागल्या. एनसाइन कार्सनच्या मांडीवर पवळी महारीण होती.

कॅप्टन ब्राऊननं तोल संभाळीत उठून आपला ग्लास उंच धरून ' पाहुण्यांच्या प्रीत्यर्थ ' झोंकून दिला.

लेफ्टनंट जोन्सनं ' विजया ' प्रीत्यर्थ सर्वांनीं एक ग्लास प्यावा असें सुचविलें.

कार्सन हळूहळू उठून उभा राहिला. त्याचा चेहरा गाजरासारखा लाल झाला होता, डोळे जळत होते, एकाद्या माजलेल्या पशूसारखा तो दिसत होता.

' जिंकून आणलेल्या छबेल्यांच्या नांवानें एक ग्लास ' तो ओरडला.

हांसत खेळत सर्वांनीं एक प्याला झोंकून दिला.

तो अडखळत हिंदुस्तानींत म्हणाला,

' आम्हीं हिंदुस्थान जिकलं, राजे जिकले, लूट जिकली-आतां पोरी जिकल्या-'

' रांडा जिकल्या,' पवळी पुटपुटली.

' नायकिणी, गरती, सगळ्या जणी आमच्या या हिंदुस्थान जिंकणाऱ्या तरवार-बहाद्दरांच्या बटकी आहेत—'

' खबरदार ! ' चवताळलेल्या नागिणीसारखी पवळी उठून उभी राहिली, ' आमच्या गरती बायकांचं नांव काढूं नको ! आम्ही तर समद्या मेल्या मांसाच्या हौती, आम्ही कसबिणी म्हनजे कांई या मुलखाच्या अब्रा नव्हत—'

' अरे, अलम हिंद हमारा है-राण्यादेखील आमच्या बटकी आहेत—'

क्षणार्धांत तो प्रकार झाला. झिंगून भडकलेल्या पवळीनं टेबलावरची सुरी उचलून कार्सनला मारली, ती त्याच्या मानेंत घुसली. तो एकदम खालीं पडला. मानेंतली धमनी तुटल्यामुळें त्याचा तावडतोब प्राण गेला होता.

तिघे अम्मलदार तिच्या अंगावर धांवले, पण आडवणाऱ्या लोकांना हिसडा देऊन ती पळत सुटली. बंगल्या बाहेरच्या अंधारांत धोधो पावसांत ती नाहींशी झाली. अम्मलदारांनीं अंधारांत आपले तमंचे झाडले, बिगूल वाजवून शिपायांना गोळा करून पाठलागाला पाठवलें, पण व्यर्थ ती पूर आलेल्या नदींत वाहून गेली असें

सर्वांनीं अनुमान केलें. कारण आसपास त्या दिवशीं व नंतरही कसून शोध करून ती कुणाला सांपडली नाहीं. मेजरनें आसपासच्या लोकांना बेदम धाकदपटशा दिला, पण उपयोग झाला नाहीं... त्यानें चिडून मंदिराची घंटा मात्र बंद केली.

रेसिडेंटसाहेब परत आल्यावर हा सर्व प्रकार त्यांना कळला. त्यांनीं लष्करी अम्मलदारांची कडक कानउघाडणी केली; मंदिराच्या पुजाऱ्याला देखील बोलावणें पाठविलें, पण तो तेथें नव्हता.

पवळीचा कसून शोध चालू असतां आठ दिवस मंदिराखालच्या तळघरांत तिला लपवून त्यानें अन्नपाणी पुरवलें होतें; व जरा शान्तता झाल्यावर दोघेंही निसटून गेलीं होतीं. हिंदुधर्माप्रमाणें त्या ब्राह्मणाला तिच्याशीं लग्न लावतां येत नव्हतें तरी कर्नाटकांत जाऊन दोघेंही कित्येक वर्षे नवराबायकोसारखीं राहिलीं. तें देऊळ मात्र आतां तेथें नाहीं—

## .२८. तो भुक्कड भीमराव !

"पुन्हां तुम्हीं 'भुक्कड भीमराव' म्हणालांत; जेव्हां जेव्हां त्यांचें नांव उच्चारतां तेव्हां तेव्हां त्या नांवामागे 'भुक्कड' जोडण्याचें कारण तरी काय?"

"बराच लांब इतिहास आहे तो," रा. रा. बापूराव जोशी ( एम्. एल्. सी. ) संपादक, 'साम्राज्य' म्हणाले.

"होऊन जाऊं द्या, मला वेळ आहे ऐकायला—"

× × × ×

मंगळवार पेठेंतलें भीमरावाचें मोठें कापडाचें दुकान माहित आहेच तुला ( बाबुराव सांगूं लागले ). त्या दुकानासाठीं खरेदीच्या निमित्तानें ही स्वारी दर दोनतीन महिन्यांनीं मुंबईला एक खेप टाकायची. बाहेरगांवाहून एकदोन दिवस थोडा रंग उडवायला मुंबईला येणारा मनुष्य साधारणपणें जें करतो तें भीमराव करीत असे!

चैन करून मुंबईहून परत जाणारा मनुष्य जरा खुषींतच असतो. त्याप्रमाणें त्या रात्रीं मेलमध्यें इंटरच्या डब्यांत भीमराव जो चढला तो 'कालच्या' गोड आठवणींच्या जणुं काय अगदीं मिटक्या मारीत होता! डब्यांत सुदैवानें कोणी नव्हतें, पण गाडी अगदीं निघायच्या वेळेला एक तरुणी घाईघाईनें आली. बरोबरच्या पोक्त बाईचा तिनें निरोप घेतला व गाडी सुरू होतांच आपला होल्डॉल पसरून ती झोपीं गेली.

ती फारच सुंदर मुलगी होती. भीमरावाच्या मनांत हाच विचार रात्रभर घोळत होता. कल्पनासृष्टींत तिच्याशीं ओळख करण्याचे अनेक मार्ग काढून शेवटीं तो जेरीस आला. निजला बिचारा शेवटीं!

सकाळीं तो जागा झाला तेव्हां ती उठून बसली होती. सूर्याचीं कोंवळीं किरणें डब्यांत येत होतीं. भीमरावानें तिच्याकडे पाहिलें–तिच्या चेहऱ्यावर एक मधुर स्मित विलसत होतें !

रात्रींच्या विचारांनीं विकृत झालेल्या त्याच्या मट्ठ बुद्धीला वाटलें कीं ही आपल्याकडे पाहूनच हांसते आहे; जणुं काय तिचे डोळे म्हणत आहेत, 'एवढी सोन्यासारखी रात्र होती, पण तुझ्या मंद बुद्धीला ओळख करायची कांहीं युक्ति सुचली नाहीं !' इतकें वाटल्यावर मग काय ! हा आचरट धडपडत उठून तिच्याकडे गेला, आणि बुडणारा माणूस वांचवायला येणाऱ्याला जसा पकडतो, तशा मगर-मिठींत पकडून त्यानें तिचें चुंबन घेतलें–तें तिच्या कानावरच पडलें !

चवताळलेल्या वाघिणीसारखी ती त्याच्या हातांतून निसटली व तिनें सांखळी ओढली, गाडी हळूहळू थांबली. त्याबरोबर तिनें 'धांवा, धांवा !' म्हणून किंकाळ्या फोडण्यास सुरवात केली !

तिच्या पायां पडून 'माफ करा चुकलों !' म्हणण्याचे त्यानें पुष्कळ प्रयत्न केले, पण तिनें त्याला झिडकारून टाकलें. अखेरीस गार्ड व इतर एकदोन माणसें डब्बांत चढल्यावर तिनें एकच हुंदका दिला—

"या–या माणसानें मला–!" एकाएकीं ती मूर्छित पडली !

× × ×

त्यावेळीं मीं 'साम्राज्य' पत्र नवीनच सुरू केलें होतें. सिटी लायब्ररींत मला भीमराव नेहमीं भेटायचा. एके दिवशीं स्वारी लांब चेहरा घेऊन माझ्याजवळ आली. आणि ही सगळी रडकथा माझ्यापुढें झाली. त्या पोरीची जबानी घेऊन पोलिसांनीं याच्यावर विनयभंगाची केस करायचें ठरविलें होतें !

"आतां कसं करूं ?" तो विवळूं लागला, "गांवांत तोंड दाखवायची सोय राहिली नाहीं, बाजारांत अब्रू गेली, गिऱ्हाईक जाणार आणि बायकोनं तर आकाश-पाताळ एक केलं आहे !"

"भीमराव तूं अगदीं भुक्कड आहेस. तुझी अक्कल कुठें गेली होती ?" मी म्हणालों.

पण तो अगदीं काकुळतीला आला. त्यानें माझ्यापुढें पदर पसरला. कसेंही करून सोडवा म्हणून धरणें धरून बसला.

तेव्हांही सरकारदरबारीं वजन ठेवण्याचा माझा शिरस्ता होता. मी केस दाखल झालेल्या गांवीं गेलों. मॅजिस्ट्रेटसाहेबांना भेटलों; त्यांनीं सांगितलें कीं, 'तक्रार जर मागें घेण्यांत आली तरच भीमरावावर खटला होणार नाहीं.' आणि ती तक्रार केली होती मुलीच्या वडिलांनीं.

भीमरावाच्या घरीं जाऊन मीं परिस्थिति त्याला सांगितली. मुलीच्या बापाला भेटणें प्राप्त झालें. भीमरावाची बायको ( भयंकर संतापलेली ) तेथेंच उभी होती.

" मोठे दिवे लावून आले आहेत, निस्तरा आतां ! " ती कडाडली.

अखेर वेळ पडल्यास नुकसानभरपाईसाठीं वगैरे म्हणून भीमरावानें पांचशें रुपये माझ्या स्वाधीन केले व रदबदली करायला मी व एक स्नेही त्या मुलीच्या बापाकडे गेलों !

आम्ही त्या गांवीं संध्याकाळीं पोहोंचलों. चांगली सुस्थितींतलीं माणसें होतीं तीं. मुलगी कॉलेजांतून सुट्टीसाठीं घरी आलेली होती. तिला पाहून मीं माझ्या स्नेह्याला हलकेच म्हणालों, 'भीमरावाला अगदींच कांहीं दोष देतां येत नाहीं !'

सुदैवानें तिचे वडील 'साम्राज्य' पत्राचे एक वर्गणीदार व चहाते होते. त्यांनीं आमचें स्वागत केलें. तक्रार परत घेण्याबद्दल असें ठरलें, कीं मुलीची आई गांवीं गेली होती ती दोनचार दिवसांनीं परत आल्यावर सर्वांच्या विचारानें काय तें नक्की ठरवायचें.

मग आम्हीं सगळे फिरायला गेलों. चर्चेच्या भरांत तिचे वडील व माझा मित्र पुढें जायचे व ती व मी असे मागें राहायचे. मी एकदम सुरवात केली.

" भीमराव भुक्कड खरा, पण असं सौंदर्य पाहिल्यावर त्या बिचाऱ्याला दोष द्यावयाची माझी छाती होत नाहीं—"

" पाठ करून आलांत वाटतं हें ? "

" त्याच्या ऐवजीं मीदेखील आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा राहीन—पण त्याचा गुन्हा मला करायला मिळाला तर ! "

" बरेच फाजिल आहांत कीं ! " ती म्हणाली—पण ती हांसली.

स्तुतीनें परमेश्वर देखील खूष होतो. मग त्या भोळ्या पोरीची गोष्ट कशाला–त्यांतून एक लटपट्या संपादक आपल्या भाषेची मोहिनी टाकायला लागल्यावर ?

परत येतांना मीं चोरून तिचा हात हातांत घेतला.........

मित्राला व मला दिलेल्या खोलीबाहेर एक उघडी गॅलरी होती. रात्रीं बऱ्याच उशिरां, झोंप येईना म्हणून मी त्या गॅलरींत जाऊन उभा राहिलों. कर्मधर्मसंयोगानें तिच्याही खोलीबाहेर तीच गॅलरी होती, व तीही बाहेर उभी राहिली होती.

"काय करतां आहां ?" मीं हळूच विचारलें.

"चांदण्याची शोभा पाहतें आहें–

नंतर आम्ही दोनचार रात्रीं रोज त्या गॅलरींतून चांदण्याची शोभा पहात होतों!

शेवटीं माझा मित्र चिडला. "त्या भुक्कड भीमरावासाठीं आलों, आणि तूं रोमान्स करतांना मी मात्र त्या बुढ्ढयाचं डोकं धरून बसूं काय ?" तो म्हणाला. अखेर मुलीची आई आल्यावर सर्व व्यवस्थित झालें. भीमरावानें पांचशें रुपये धर्मादाय म्हणून एका अनाथालयाला द्यावे व मुलीच्या वडिलांनीं तक्रार परत घ्यावी अशी व्यवस्था करून आम्ही ( यांत मी स्वतः मोठ्या नाइलाजानें ) परतलों.

दरम्यान गांवांत सगळीकडे ही बातमी पसरली होती. परत आल्यावर सगळे आमच्या भोवतीं गोळा होऊन विचारूं लागले,

"काय बुवा, त्या भुक्कड भीमरावाला सोडवलात का एकदांचा ?"

त्यानंतर कित्येक वर्षांनीं मला दळणवळण खात्याच्या सेक्रेटरीसाहेबांना बंगल्या-वर भेटायचा प्रसंग आला. हॉलमध्यें वाट पहात बसलों असतां बंगल्याची मालकीण तेथें आली.

तिनें तावडतोब मला ओळखलें. ती दुसरी तिसरी कोणी नव्हती–भुक्कड भीम-रावाच्या आचरटपणाला बळी पडलेली मुलगी !

सेक्रेटरीसाहेबांकडचें काम अर्थातच उत्तम रीतीनें पार पडलें.

## २९. अवतार

तो एक विख्यात धर्मोपदेशक होता–कोणत्या धर्माचा, याच्याशीं गोष्टीचा कांहीं संबंध नाहीं. ज्ञान, विद्वत्ता, पापभीरुता, या गुणांप्रमाणेंच दुसऱ्याही एका गुणाबद्दल तो विख्यात होता. तो एका रतीसारख्या स्वरूपवती स्त्रीचा पति होता. धर्ममार्तंडाच्या बायका म्हाळसा असायच्या या नियमाचा त्याच्या बाबतींत अपवाद झाला होता; त्याच्या पत्नीच्या रूपाची ख्याति सर्व प्रांतांत झालेली होती. कोणत्याही सिंहासनावर शोभून जाईल अशी तिची आकृति होती. उंच, पुष्ट आणि प्रमाणबद्ध असा तिचा बांधा होता. केतकीसारखी तिची कांति होती; तिचे काळेभोर डोळे दाट पापण्यांखालून सुस्त दृष्टीनें पाहणारे होते. ही मस्तानी कोठें तरी गुलामांना हुकूम सोडीत असायची, कवि, चितारी किंवा मूर्तिकार यांच्या कलेचा विषय व्हायची, ती बिचारी या 'धर्म–शाळे'च्या एका कोठडींत डांबून पडलेली होती.

तिला संतान कांहीं नव्हतें; तिचा खाविंद अभ्यास किंवा प्रार्थना या कार्यांत सर्वकाळ घालवायचा. ती सुस्थितींत होती, घरांत लक्ष घालायची तिला कांहीं जरूरी नव्हती. तिच्याकडे भेटायला कोणी येत नव्हतें, ती कधीं घराबाहेर पडत नव्हती. ती नुसती आपल्या वाड्याच्या खिडकींत बसून, आकाशाकडे पहात, स्वप्नसृष्टींत दंग होऊन राहायची–आणि जांभया द्यायची.

× × ×

एके दिवशीं त्या शहरावरून एक मोठें वादळ गर्जून गेलें. बंद केलेलीं खिडक्या-

दारें पुन्हां उघडण्यांत आलीं. प्रकाश, मोकळी हवा, प्रसन्नता यांनीं त्या घरांत प्रवेश केला.

आपली सुस्त नजर एकदम चमकदार करून त्या तिलोत्तमेनें धर्मपुस्तकावर पेंगणाऱ्या आपल्या सहधर्मचाऱ्याला विचारलें,

'स्वामी, नवीन अवतार केव्हां येणार आहे?'

'येईल, योग्य वेळीं येईल.' त्यानें गंभीर आवाजांत उत्तर दिलें; 'जेव्हां मानवमात्र पूर्ण पुण्यवान् किंवा सर्वस्वी पापी होईल. त्यावेळीं नवीन अवतार होईल.'

'तमाम दुनिया पुण्यवान् होईल असें आपल्याला वाटतें का?'

'कसें वाटणें शक्य आहे?'

'मग सगळे पापी झाले म्हणजे अवतार येईल?'

धर्ममार्तंडानें परत पुढच्या ग्रंथांत लक्ष घातलें. ती सुंदरी पुन्हां एक निःश्वास टाकून खिडकीबाहेर आकाशाकडे पाहत बसली.

× × × ×

एके दिवशीं नजीकच्या दुसऱ्या गांवीं कर्मकांडाचा कांहीं महत्त्वाचा मुद्दा सोडवायला धर्मोपदेशक गेला होता. त्याच्या ज्ञानामुळें निवाडा लौकर द्यायला मिळून तो आपल्या गांवीं अपेक्षेपेक्षां बराच लौकर परत आला. तो एका ओळखीच्या श्रीमंताबरोबर त्याच्याच वाहनांतून आला होता. उतरल्यावर घराकडे तो पायीं एकटा गेला.

संध्याकाळची वेळ होती. घरभर रोषनाई केली होती. घरापुढें एक सैनिक पेहरावाचा मनुष्य उभा होता.

'कोण तूं?' धर्मोपदेशकानें गंभीरपणें विचारलें.

'मी शिपाई आहें; माझे सरदार वर त्या सुंदर स्त्रीकडे गेले आहेत. तिचा नवरा परत येईल त्याच्यावर लक्ष ठेवण्यास मला येथें उभा केलेला आहे.'

'अस्सें, ठीक आहे, नीट नजर ठेव.'

लौकरच पहारेकऱ्याची नजर चुकवून तो स्वतःच्या घरांत मुकाट्यानें शिरला.

दोघांचा आहार नुकताच झाल्याचीं चिन्हें भोजनशाळेंत दिसलीं. तो वर गेला तों त्याची पत्नी रोजच्या जागींच होती.

पण तिच्या गालांवर लाली होती; डोळ्यांत चमक होती; मुद्रेवर स्मित होतें; समाधान व हेटाळणी हे भाव तिचा चेहरा दाखवीत होता.

त्याच्या पायाला कांहीं लागलें; त्यानें वांकून तें उचलून उजेडांत पाहिलें. तें तरवारीचें म्यान होतें.

‘ येथें कोण आलें होतें ?’

तिनें नुसती मान उडवून दुसरीकडे पाहिलें.

‘ मीच सांगतों. स्वारदलाचा सरदार आला होता—’

‘ आणि कां येऊं नये त्यानें ?—’

‘ तुला वेड लागलें कीं काय ?’

‘ मी पुरी शुद्धीवर आहें.’ तिच्या नजरेंत अपूर्व उन्माद व हर्ष दिसत होता.

‘ पण धर्मांप्रमाणें आपलें कर्तव्य करायला नको कां ?’

‘ सगळे पापी झाले म्हणजे तरी तो अवतार लौकर होईल ना ?’

## ३०. पिंजऱ्यांतले काळे पोपट

आम्ही सगळे मिळून सव्वीसजण कोळसेवाले होतों. मिल मोठी होती, तिला शोभेल अशीच बायलरशेड होती आमची. सहा जंगी बायलर; त्यांच्यांत आळीपाळीनें कोळसा भरण्यासाठीं दर बायलरमागें आमच्या दोन दोन जोड्या होत्या; आमच्यावर देखरेख करायला दोघे मुकादम होते. आमची शेड एका बाजूनें अगदीं उघडी होती. पण त्या बाजूला शेठनें लोखंडी जाळी घातली होती—दुसऱ्या खात्यांतून जाऊन सुताच्या गुंड्या आम्ही चोरूं अशी मालकाला भीति वाटे, म्हणून ती जाळी त्यानें मुद्दाम घातली होती. शेडच्या आंत बायलरची भयंकर गरमी असे. भिंती सगळ्या काळ्या पडलेल्या होत्या. जिथेंतिथें काळी धूळ सांठलेली होती. सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्या धुरकट कैदखान्यांत काम करीत होतों आम्ही. बायलरांत कोळसा टाकून टाकून आम्ही पण यंत्रासारखेंच झालों होतों; कैफांत असल्यासारखें शिणलेल्या अंगानें काम चालायचें आमचें. ओळीनें निजलेले ते सहा बायलर आम्हांला राक्षसांसारखे वाटायचे; आपल्या लाल डोळ्यांनीं ते आमच्याकडे पाहताहेत अशी भीति पडायची; कोळसा टाकायच्या वेळेला त्यांच्या ज्वाळेच्या जिभा बाहेर पडल्यासारख्या दिसायच्या; कोळसा जळण्याचा आवाज गुरगुरल्यासारखा यायचा. कधीं कधीं वाटायचें कीं ' आपल्याला खायला घालणारे हे गुलाम ' म्हणून ते बायलर आमच्याकडे पाहतात; एकाद्या खत्रुंड पाळीव जनावराकडे पाहिल्यासारखें, नुसता वीट आल्याप्रमाणें कंटाळून बघतात—आम्हांला वाटायचें कीं हे बायलर सुद्धां आम्हांला नालायक समजतात.

# पिंजऱ्यांतले काळे पोपट

रोज सकाळच्या शिटीपासून संध्याकाळच्या शिटीपर्यंत कोळसा, धूळ, घाम, गरमी यांच्या लडबडाटांत आमचें काम चालायचें; मध्यें एक कलाक आम्ही शिदोरी खायला बसत होतों; तेव्हां एकमेकांशीं बोलण्याइतकें देखील आम्हांला त्राण राहायचें नाहीं. आमची आपसांत पुरी ओळख झाली होती; भांडणच झालें तर बोलाचाली व्हायची, एरवीं शब्दसुद्धां निघत नसे; पुढेंपुढें तर भांडण्याइतकी तरी मस्ती कोणाच्या अंगांत शिल्लक राहिली होती? एकाच घाण्याला लावलेले सगळे बैल, एकमेकांशीं झगडा करून तरी काय मिळविणार? पुन्हां अबोल्याचें भय कोणाला? ज्यांनीं आपल्या पोटांतलें सगळें बोलून टाकलें आहे, ज्यांच्या-जवळ एक शब्द शिल्लक नाहीं त्यांना, ज्यांना ढोरमेहनतीमध्यें तोंड उघडायलाच वेळ झाला नाहीं, एक गोड शब्द बोलण्यापुरतासुद्धां कधीं कंठ फुटला नाहीं, त्यांना मुकाटपणें काम चाललें असतांना कांहीं वाटत नाहीं. अबोलपणा त्यांच्या अंगवळणीं असतो. नाहीं म्हणायला कधीं कधीं आम्हीं गाणें म्हणत होतों. एकादा आपल्या घोगऱ्या फाटक्या आवाजांत एकादें गाणें सुरू करायचा, बाकीचे कांहीं वेळ मुका-ट्यानें ऐकायचे; थोड्या वेळानें दुसरा कोणी आपला आवाज द्यायचा–होतां होतां सगळेजण गाण्याचा एकच चरण घोळायला लागायचे. तें गाणें त्या बायलरशेडमधें कोंडलेल्या पक्षासारखें घोटाळायचें, त्या काळ्या दगडी भिंतीवर आमच्या सुरांचे जसे कांहीं पंखच फडफडायचे. कोळसा आणि फावडीं यांच्या खडखडांतून, बाहेरच्या मिलच्या यंत्रांच्या धडधड आवाजांतून, तापलेल्या बायलरच्या गुरकावणींतून, अखेर तें गाणें निसटून वर आभाळांत सुटून गेल्यासारखें भरारी घ्यायचें. आम्ही त्यांत पुरते रंगून गेलों असतांना मध्येंच एकाद्यानें थांबावें, डोळे मिटावे, आपल्या फव-ड्यावर टेंकून उभें रहावें व दुसऱ्या हातानें कपाळावरचा घाम पुशीत एक लांब सुस्कारा टाकावा—जसा कांहीं तो त्या गाण्याच्या सुरांबरोबर बाहेरच्या मोकळ्या जगांत भराऱ्याच घेतो आहे, जसा कांहीं घांटावरच्या वळणेंवळणें घेत जाणाऱ्या एकाद्या गाडीरस्त्यानेंच जातो आहे, जशी त्याच्या माथ्यावर पिंपरी जांभळीच्या पानाची दाट गर्दी आहे आणि त्या गर्दीतून माळरानावरचा वारा सळसळत जातो आहे, जणुं बाजूच्या कुंपणांतून चिमण्यांचें भांडण ऐकूं येत आहे आणि पलीक-डच्या शेतांतून मोटेचें चाक रेंकत आहे....

इतक्या थोरल्या आवाजांत बाहेर कुठें ऐकूं जात नव्हतें म्हणून आमच्या गाण्याचा

तेवढा निवारा तरी शाबूत राहिला, नाहीं तर सदा आमच्या कामांतच मरत रहायचे आम्ही—नाहीं म्हणायला एक विरंगुळा होता दुसरा, आमच्या बालयरशेडपाशींच बंगल्यांत वायडिंग खातें होतें; त्या खात्यांत पगी म्हणून एक पोरगी होती, ती रोज एकदां आमच्या चाळीजवळ यायची आणि हंसून विचारायची, "कां हो पिंज-ऱ्यांतले पोपट! पान तर द्याल?"

ती आली कीं आम्हीं सगळेजण क्षणभर आपलें काम विसरून जाळीकडे धावा-यचें, कोणाची चंची, कोणाची डबी, कोणाचा बटवा, पुढें व्हायचा. जाळीचें कवाड खोलून आम्ही तिला आंत घ्यायचे.

मोठी गोड पोरगी होती पगी, तिच्या केंसांना अंगचेंच सुरेख वळण होतें, तिचा गहिरा रंग नितळ होता, तिचे टपोरे डोळे नि पांढरेफेक दाणेदार दांत तिच्या रंगाला मोठे खुलून दिसायचे. तिची चिटाची साडी, कशी न्याहार नेसलेली असे, मानेला गोट लावलेली तंग चोळी, पण किती शोभायची तिला. हिरव्या बांगड्या, मंगळसूत्र आणि नथणी याशिवाय कधीं दागिना नसे तिच्या अंगावर; असलेंच तर डोकीत एखादें फूल.

आम्ही सगळे घामट, कळकट, काळवंडलेले मूर्दाड तिच्याभोंवतीं गोळा व्हायचे, तिच्याशीं बोलायची धडपड करायचे, तिच्याशीं बोलायची भाषा सुद्धां वेगळी होती आमची; किती हळू, शान्त, गोड शब्द निघायचे आमच्या तोंडांतून तिच्यापुढें! ती असतांना मोठ्या अदबीनें वागत होतों आम्ही. आमचे मुकादम देखील ती आली कीं आपला कडकपणा कमी करायचे—ग्यानबा मुकादम आपल्या डबींतला खास मोहिनी जर्दा द्यायचे तिला! आणि रोज हांसतखेळत ती आमच्याशीं बोलत असतांना आम्ही तिला बजावायचें, "पग्ये, पोरी सांभाळ बरं, शेठच्या नंदरं पडूं नको!" ती नुसती हांसून पळून जायची.

आणि ती गेल्यावर आमचें काम करतांना आम्ही तिच्याबद्दल बोलत राहायचे. नेहमीं त्याच त्याच गोष्टी आमच्यांत, आमच्या कामांत, आमच्या आजूबाजूला. त्याच त्याच गोष्टी कायमच्याच होत्या, कधीं फरक नाहीं का बदल नाहीं. तळघरांत कोंडलेलीं जनावरेंच आम्ही. एरवीं बायकांबद्दल बोलतांना आमच्या जिभेला हाड नसे—त्यांतून कधीं कुठें एकादादुसरा 'नवटांक टाकल्यावर' मग काय? आम्हीं ज्या

गोष्टी बोलत होतों त्या ऐकून गिरस्ती माणसाच्या अंगावर शहारेच आले असते. पण पगीबद्दल नव्हतों आम्ही कांहीं घाणेरडें बोलत. कधीं कोणीं तिची मस्करी काढली नाहीं का तिच्या अंगाला बोट लावलें नाहीं. बिजली चमकून गेल्यासारखी एका क्षणांत ती आमच्यांत येऊन जायची. तेवढ्यांत केव्हां तिच्याशीं लगट करण्याची वेळही येण्यासारखी नव्हती. ती किती सुकुमार, साधीभोळी पोरगी; एवढासा जीव, तिच्याबद्दल पाप तरी कसें करावें कोणी मनांत ? फिरून आम्हीं ढोरमेहनतीनें जरी अगदीं दगड झालों होतों, तरी आमचीं मनें पुरतीं मेलीं नव्हतीं, आणि मन असणाऱ्या सगळ्या माणसांसारखें, भक्ति करायला कोणी हवें होतें आम्हांला. भक्ति करायला आमची पगी बरी होती—आमच्या मालकीचीच समजत होतों आम्ही तिला ! रोज तिला पान द्यायचें म्हणजे देवीपुढें विडाच ठेवल्यासारखा जणूं; त्या पानाबरोबर तिला चार शहाणपणाच्या गोष्टीही सांगत होतों आम्ही. फार काळजी तिची आम्हांला. पण नुसती हंसायची; तिला हवें असेल तें आमच्याकडून करून घ्यायची. एकदां मात्र एकजणानें तिला आपल्या फाटक्या पैरणीला दोन टांके मारून दे म्हणून म्हटलें तर मान उडवून ती बोलली, " वाहवारे दादा ! घरधनणीला सांगा आपल्या ! मी काय असलीं कामं करायला येतें का इथं ? " त्या माणसालाच आम्ही हांसलों. तिला पुन्हां कधीं कोणी कांहीं काम सांगितलं नाहीं. फार माया होती आमची सगळ्यांची त्या पोरीवर. कोणी एकदां म्हणाला कीं, पोरीची फार मिजास वाढवतां तुम्ही; तेव्हां आम्ही त्याच्यावर तुटून पडलों अगदीं.

बायलरशेडच्या दुसऱ्या बाजूला वीव्हिंग खातें आलें होतें. त्या खात्यांतल्या लोकांशीं आमचें कधीं पटायचें नाहीं. आपलें काम मोठें निर्मळ म्हणून त्यांना शेखी वाटायची. आमच्याशीं ते वरचढपणें वागायचे. त्यांच्या खात्यांत उजेड, थंड केलेली हवा, स्वच्छ पांढऱ्या भिंती, तक्तपोशीची जमीन, अशा कितीतरी सोयी होत्या. आम्हांला त्यांचा हेवा वाटायचा. त्यांच्याशीं बोलत नव्हतों आम्हीं. त्यांना काम थोडें हलकें, आमच्यापेक्षां मजेदार. ते किती टापटिपीनें रहायचे. सणावाराला जरीचे शेमले लावून आणि लाल जाकिटें घालून हिंडायचे, सिनेमाला जायचे. आम्हीं कोणी मरतुकडे, कोणी फिकट, कोणी आडदांड, रानवट असे होतों. आमचे कपडे म्हणजे लक्तरें, अनवाणी नाहीं तर जाड पखाली वहाणा घालून रस्त्यानें

चोरासारखे जाणार, सिनेमाचें तिकीट देखील मिळायची मुष्कील व्हायची आम्हांला. वीव्हिंगखात्याची फेन्सी आणि जेकर्डची बाजू आमच्याकडे येत होती. फेन्सी खात्याच्या हेडजाबरनें मास्तरवर मवाली घातले म्हणून त्याला काढून टाकला होता. त्याच्या जागीं परदेशांत शांघाई कां कुठल्याशा शहरांत काम करून आलेला हेड-जाबर आला होता. तो लढाईवर पण जाऊन आलेला होता म्हणे, आणि मोठ्या रुबाबांत असायचा; करकर करणाऱ्या गोंडे लावलेल्या कोल्हापुरी वहाणा, करवत-कांठी, पंचरंगी धोतर, कमरेला चांदीचा गोफ, हातांत सोन्याचें कडें, अंगांत लाल रेघांची रेशमी पैरण, काळें जाकिट, आणि पोपटी मुंडासें असा त्याचा रुबाब होता. लिंबाजीराव त्याचें नांव. त्याला पाहण्यासाठीं आम्ही अगदीं टपून बसलों होतों.

एक दिवस तो आपण होऊनच आमच्या खात्यांत आला. मोठा उमदा माणूस दिसला तो. "रामराम मंडळी!" तो हांसून म्हणाला, "कसं काय है तुमचं खातं?"

मुकादमानें त्याला आंत बोलावून घेतलें. कामाचा त्रास, अपुरा पगार, शेठचा जाच, मास्तरची लुच्चेगिरी अशा खूप गप्पा मारल्या आम्हीं त्याच्याबरोबर. बोल-बोलतां मिशीला पीळ देत डोळे मिचकावून त्यानें विचारलें, "पाखरं कशीं काय आहेत या मिलमधीं?"

आम्ही कोणी आंबट तोंडें केलीं, कोणी शरमिंदे होऊन हंसलों. वायंडिंगमध्यें आणि स्पिनिंग खात्यांत कांहीं पोरी बऱ्या आहेत, असें त्याला कोणी सांगितलें.

"मग तुम्ही कोणी कांहीं शोक करतां कीं नाहीं?" त्यानें हंसत विचारलें.

आम्ही उगीच कांहीं तरी कुजबुजलों—आम्हांला कुठचा शोक!

"तुमचं काम हें असं पडलं, तुम्ही तरी काय करनार?" तो म्हणाला. "पण काम खराब म्हून मर्दासारखं राहायला कुणी नको म्हणलाया? पुरुष म्हनला म्हंजी ठाकठीक पाह्यजे, पोरींना रुबाब लई आवडतो, ताकद बी पाह्यजे." म्हणून त्यानें पैरणीच्या गुंड्या काढून आपली भरदार छाती बुक्क्या मारून दाखवली. चांगला मजबूत गडी होता तो. "ताकद, रुबाब नि हिम्मत, इक्तं असल्यावर, बिशाद कुनी आवा जवळ येणार नाहीं? आपल्यास्नी बा मालपान्याला तोटा नाहीं पडला कंदी." थोडा वेळ तिथें बसून त्यानें आपली बायकांतली बहादुरी सांगितली. नंतर तो उठून गेला.

तो गेल्यावर बराच वेळ आम्ही त्याच्याबद्दल आपापसांत बोलत होतों. या मिलमधल्या कोणकोणत्या पोरीची मिजास तो उतरून टाकील हा हिशेब आम्हीं करीत होतों. क्यालेंडरिंगमधल्या आणि घडीखात्यांतल्या छिनाल मैनांचीं नाकें तो खालीं करील तर बरें, असें आम्हीं म्हणत होतों; कारण त्या आमच्या पिंजऱ्याजवळ जायच्या त्या देखील कपाळाला आंठ्या घालून आणि तोंडें फिरवून; त्यांच्याबद्दल आम्ही इकडे जें बोलत होतों तें जर त्यांनीं ऐकलें असतें तर मात्र त्या भडकून गेल्या असत्या नुसत्या. बोलतां बोलतां मध्येंच मुकादम ग्यानबा म्हणाला,

"पर आपल्या पगीचं काय? त्या पोरीला तर नाहींना बिघडवायचा हा गुलहौशी मानूस?"

आम्हीं सगळे एकदम गप्प झालों. पुन्हां वाद निघाला, कोणी म्हणाले कीं पगी अशी कांहीं वाटेवर पडली नाहीं; दुसरे म्हणाले कीं हा शिपाईगडी हां हां म्हणतां तिला फितवील. शेवटीं आम्हीं ठरवलें कीं, हा रंगेल मनुष्य पगीला आपल्या जाळ्यांत पकडायला लागला तर आम्ही त्याची हड्डी नरम करूं—आणि पगीला पण इशारा देऊन ठेवूं.

एक महिना गेला. लिंबाजीरावाच्या मिशांचे आंकडे जास्तच वर चढले. त्याच्या वहाणा अधिक कर्रकर्र करायला लागल्या. तो नेहमीं वेगवेगळ्या पोरींना घेऊन हिंडायला लागला होता. आमच्याजवळ मात्र पोरींचें नांव काढीत नुसते डोळे मिचकावून हांसायचा. पगी रोज पान खायला यायची. आम्ही फेन्सी खात्याच्या हेडजाबरबद्दल बोलायला लागलों तर ती हेटाळणीनें हांसून म्हणायची "आहाहा! माहिती आहे मोठा मानाजी फांकडा!" आम्हांला धन्य व्हायची, कीं पोरगी किती नेक, कशी अस्सल अवलाद आहे. इतर छेलछबेल्या लिंबाजीरावाच्या गळ्यांत पडायच्या, पण ही मात्र त्याच्याकडे पहायचीहि नाहीं. मोठा अभिमान वाटायचा आम्हांला आणि तिचे पाठिराखे आम्ही. तिची ऐट पाहून आम्ही पण लिंबाजीरावाला 'कुठल्या झाडाचा पाला' समजत होतों.

एक दिवस चाराच्या सुमारालाच तो जरा 'तयार होऊन' बायलरशेडमध्यें आला. खालीं बसून हांसायला लागला—स्वारीनें पेग दोन पेग रम टाकल्याचा वास येत होता.

" आज घडीखात्यांत केवढी कुस्ती जुंपली होती ! दोघीजणींची मारामारी ! ती बानी अन् ती चन्द्री एकमेकींच्या झिंज्या उपटून भांडल्या माझ्यासाठीं ! हा हा हा ! " त्याच्या त्या बहादुरीच्या ऐटींत त्याला पाहून आम्हीं थोडेसें आखडलों.

" आपनास्नी ह्याचा कांई उलगडाच पडत नाहीं. कशापाई या समद्या जीव टाकतात यवडा माज्यावर ! " तो आपणच आपल्यावर खूष झाला होता अगदीं.

आम्हांला वाटणारी चीड मुकादमाच्या तोंडांतून बाहेर पडली.

" गाईम्हैशींची शिकार करण्यांत काय मोठी तरवार मारनं ? एकादी नागिन वलणावर आणली तर खरी बहादुरी—"

" मला म्हणतायसा ? "

" जी "

" त्यें कशापाई ? "

" पधा ध्यानांत आलं तर. चला रे—नंबर तीन बायलर—"

" हां थांबा दम धरा थोडा. तुमच्या म्हनन्यांतली मेख काय आहे ग्यानबा ? कंची नागीन ? "

मुकादम कांहींच बोलला नाहीं. कामांत रमून गेला होता तो आपल्या. लिंबाजीराव उठला, तीन नंबरच्या बायलरच्या धगीजवळ गेला अगदीं. मुकादमासमोर उभा राहिला अन् घोगऱ्या आवाजांत म्हणाला,

" बोला कंची नागीन ? माज्या हिंमतीचा शक घेतां तुम्ही ? मला नाहीं म्हनेल अशी आहे या मिलमध्यें एकतरी कुनी ? सांगा असली तर—"

मोठा अपमान झाल्यासारखा वाटत होता त्याला. जणुं दुनियेंत पोरींशीं ' जमवणें ' एवढेंच काय तें काम होतें त्याचें. आपल्या एकुलत्या एक फुशारकीच्या गोष्टीबद्दल कोणी शंका घेतल्याचा राग आला होता त्याला. बायका बिघडवण्याच्या आपल्या शक्तीला मोठा कुळधर्म समजत होता तो. एकाद्या पोटदुखीच्या माणसाला चारचौघांत आपल्या दुखण्याची बडबड करून भाव खायला मिळतो आणि त्याच्या पोटदुखीला कोणी किंमत दिली नाहीं तर तो भडकतो. मोठेपणा मिळवायला, आपल्याकडे सगळ्यांचें ध्यान खेचायला, तेवढीच गोष्ट असते त्याच्याजवळ. तसेंच पोरी

फसवायच्याबद्दल लिंबाजीरावाचें झालें होतें. मुकादमाच्या तोंडाजवळ तोंड नेऊन तो गुरगुरला,

" चला बोला कोन म्हंता ती—"

" ठीक आहे, बोलतों—"

" सांगा—"

" ऐका तर पगी माहिती आहे तुम्हांला ?"

" पगी ?"

" ऐका ! ठाऊक बी नाहीं पोरगी. एवढी हुषारी असेल तर तिलाच जिंकून दावा."

" असं ?"

" होय."

" उंः ! बघाल एका महिन्यांत—"

" वारे बहाद्दर, काय गोष्टी सांगतो हाये !"

" हरकत नाहीं; पगी ना नांव तिचं ? पंधरा दिवसांत—"

" बस्स करा बकवा–अन् रस्ता पकडा, काम हाय आमाला—"

मुकादम हे शब्द असे खकसून म्हणाला कीं लिंबाजीराव पहातच राहिला. अखेर हलक्या पण जड आवाजानें तो बोलला.

" ठीक. " तो निघून गेला. तो गेल्यावर कोणी तरी म्हणाला,

" मुकादम, खूप आग पेटवून दिलीत तुम्ही नी—"

"चूप –काम कर आपलं." मुकादम ओरडला.

आम्हांला भीति वाटत होती कीं आतां लिंबाजीराव पगीच्या मागें लागणार आणि मग ती पोरगी ठीक राहते आहे का नाहीं, देव जाणे. आपापसांत पुष्कळ कुजबुजून आम्हीं ठरवलें कीं, पगी काय दाद देणार आहे त्या अक्कडबाजाला. आमची पगी भली खंबीर पोरगी आहे.

तरी पण ती या कसोटीला कशी उतरते हें पाहायची फार ओढ लागली होती आम्हांला. एकदां वाटे कीं विषाची परीक्षा कशाला पहा, पुन्हां वाटे कीं पाहूं पोरीच्यामध्यें पाणी किती आहे. त्या रांड्या राघोजीला आणखी थोडा चिडवावा अन् मग पहावें काय होतें तें.

हळूहळू आमच्या कानावर बातमी आली कीं फेन्सीखात्याचा हेडजाबर वायंडिंगमधल्या पगीच्यामागें आहे. तें कळल्यावर आमच्यांत मोठी खळबळ उडाली. सारखी बोलाचाली व्हायला लागली. त्या गडबडींत आम्हांला मास्तरनें अर्धा कलाक काम वाढवलें तेंदेखील ध्यानांत आलें नाहीं. आम्ही तिला मात्र एक शब्दानें ओळख देत नव्हतों. ती रोज यायची, पान घ्यायची, जायची. आमच्या मनांतून मात्र 'काय चाललें आहे,' हें कळण्याची फार फार निकड लागली होती.

पंधरा दिवस भरले तसा मुकादम म्हणाला, "आज शेवटचा दिवस रे बाबांनों—"

आम्ही तें पुरें जाणून होतों.

"आज नीट बारकाईनें पाहा–तिच्या वागण्यांत कांहीं फरक दिसतोय का—"

"पाहून काय ध्यानांत येणार ?" कोणीतरी म्हणाला.

पुन्हां आम्ही कुजबुजायला लागलों. आज अगदीं आणीबाणीची वेळ असें आम्हांला दिसत होतें. पंधरा दिवस लिंबाजीरावानें पगीचा पिच्छा सोडला नव्हता. ती त्याला कबूल झाली कीं नाहीं हें आम्हांला कसें कळणार ! इतक्यांत ती आली,

"काय पिंजऱ्यांतले पोपट—"

आम्हीं सगळे तिच्याभोंवतीं गोळा झालों. एक शब्द न बोलतां चौकस नजरेनें तिला आम्हीं रोखून टाकली होती. नेहमींचें भाविकपणाचें हांसूं आमच्या तोंडावर नव्हतें.

"असं काय करताय सगळी जणं ! काय झालाया तुम्हांला ?" तिनें गोंधळून विचारलें.

"तुला काय झालाय् ?" मुकादमानें तिलाच पुसलें.

"मला ? म्हंजी ?"

" कांहीं नाहीं, कांहीं नाहीं—"

"चला आटपा, पान द्यायचं असलं तर द्या नाहींतर ही चालल्यें मी–"

"फार घाई झाली है तुला, नाहीं जनुं ?"

हें ऐकून ती मुकाट्यानें तोंड फिरवून निघून गेली.

"जमलं दिसतंय—" जमिनीवरचा एक कोळशाचा खडा ठोकरेनें उडवीत मुकादम म्हणाला. " साल्यानं खटवलीन् अखेर !"

आम्हीं सगळे एकदम बोलून गलबला करायला लागलों. कोणी म्हणाला, " छे छे, असं होणार न्हाई."

" आतां बोलून तरी काय होनार—" म्हणून मुकादम पुन्हां आपल्या कामाला लागला. तो शहाणा होता. त्याच्या बोलण्यांतला खरेपणा आम्हांला पटला, आणि तो पटल्यावर वाईट वाटलें आम्हांला सगळ्यांना.

बाराला न्याहरीच्या शिटीसरशी लिंबाजीराव आला. त्यानें आपली मुजोर नजर आमच्यावरून फिरविली. छाती काढून तो म्हणाला.

" गड्यांनो, माझ्या बढाईची तुम्हीं थट्टा केलीत, आतां बघाल, या जाळीपाशीं उभे राहा थोडा वेळ—" तो निघून गेला. चणे टाकणारा मनुष्य आल्यावर राणीच्या बागेंतलीं माकडें गजांपाशीं जमतात तसे आम्ही आमच्या पिंजऱ्याला चिकटून उभे राहिलों.

थोड्या वेळानें पगी लगबगीनें वायंडिंगमधून निघून गोदामच्या बाजूला जाऊन दिसेनाशी झाली. तिच्या तोंडावर अशी तळमळ पण अशी चमक दिसली, कीं ती आम्हांला पारखी झाली असा एक सुनेसुनेपणा आमच्या पोटांत वाटायला लागला. लौकरच ती गेली. त्याच बाजूला लिंबाजीराव वहाणा कर्रकर्र करीत मिशावर पीळ देत मोठ्या तब्येतींत चालून गेला. तितक्यांत एक उदास पावसाची सर येऊन सगळीकडे पाणी ठिबकायला लागलें. पाण्याची थारोळीं बाहेरच्या बाजूला जिथेंतिथें दिसायला लागलीं. चमत्कारिक शांतता पडली. आम्ही चिडलों होतों. आमच्या भक्तीचा अव्हेर करून त्या दीडदमडीच्या लिंबाजीरावाकडे जाणाऱ्या पगीला फाडून खायला टपल्यासारखे आम्ही उभे होतों.

थोड्या वेळानें पगी परत आली. तिच्या चेहऱ्यावर सुखाची, आनंदाची, समाधानाची छटा स्पष्ट दिसत होती. एखाद्या गोड कैफांत चालल्यासारखी ती चालत होती— बेशरम !

आम्हांला ते पाहून अनिवार संताप आला.

आम्ही सगळे एकच गिल्ला करीत पिंजऱ्याबाहेर धांवलों. आम्हीं तिला घेरली. तिच्यावर लाखोली मोजली. लांडग्यासारखे तुटून पडलों. जितका पाणउतारा, बेअब्रू करण्यासारखी होती तितकी केली.

ती पहिल्यानें थरथर कांपत उभी राहिली. तिच्या चेहऱ्यावरचा आनंद मावळला होता. आमच्या तोंडाकडे तिनें न्याहाळून पाहिलें. हळूहळू तिच्या चेहऱ्यावरचा संताप वाढत चालला, आम्ही शिवराळपणाची शिकस्त करीत होतों.—एवढी देवळांत पुजल्यासारखी ज्यांनीं ठेवली त्या आम्हांला झिडकारून ती त्या हरामखोराच्या गळ्यांत पडली होती—त्याला ती म्हणजे—हुंगून फेंकून द्यायच्या एका फुलासारखीच तिची किंमत होती.

एकाएकीं पगीच्या नजरेंत बिजलीसारखी चमक आली. तिनें आपले केंस साफसूफ केले, पदर सांवरला. ती कमरेवर हात ठेवून मोठ्या तोऱ्यानें उभी राहिली.

भोंवतालीं दुसरे लोक जमायला लागले होते.

तिनें मनस्वी तिटकाऱ्यानें आमच्याकडे पाहिलें व अखेर ती धीटपणें कर्कश आवाजांत म्हणाली,

" चला हटा, कंगाल ढोरें कुठलीं—व्हा दूर ! "

एखाद्या राणीसारखी ती सरळ आमच्यामधून सावकाश चालत गेली; तिला अडवायची एकाची छाती झाली नाहीं. थोडी पुढें गेल्यावर मागें वळून ती पुन्हां म्हणाली,

" थुत् ! कोळशाच्या खातेऱ्यांत लोळणारीं जनावरं—"

आपल्या जवानीच्या, रूपाच्या, प्रीतीच्या, तोऱ्यांत ती डौलानें निघून गेली...

आम्ही पुन्हां आमच्या कामाला लागलों. पुन्हां कधीं ती बायलरशेडमधें आली नाहीं. त्या दिवशीं आलेलें आभाळ नेहमींच तसें राहिलें...

[ गोर्कीवरून ]